## पहिल्या आवृत्तीची
## प्रस्तावना

'महाराष्ट्र-धर्म' साप्ताहिकांतील (सन १९२४-१९२७) विशिष्ट लिखाणाचा हा संग्रह आहे. 'महाराष्ट्र-धर्म' शब्दाचें संक्षिप्त रूप 'म. ध.' त्याला पाणिनीप्रमाणें 'उ' अनुबंध जोडून 'मधु' हा सांकेतिक शब्द साधला आहे. 'मधु' म्हणजे महाराष्ट्र-धर्मांतून निवडलेलें लिखाण. त्याचा संग्रह करणारें हें पुस्तक आहे. म्हणून ह्याचें नांव 'मधुकर.'

पुस्तकाच्या नांवाचा उलगडा केल्यानंतर प्रस्तावना अधिक लांबवण्याची अवश्यकता दिसत नाहीं. वस्तु वाचकांच्या समोर आहे च.

नालवाडी
१३-७-३६

विनोबा

# अनुक्रमणिका

# म्हातारा तर्क

एखाद्या माणसाचें वय मोठें असलें म्हणजे आपण त्यास म्हातारा म्हणतों. असे म्हातारे आपल्या देशांत अलीकडे फार थोडे आढळतात. आपल्या लोकांचें जगण्याचें सरासरी मान हल्लीं चोवीस वर्षांचें आहे. हें च मान विलायतवगैरे देशांत दुपटीच्या वर आहे असें सांगतात. तिकडे म्हातारे लोक त्या रीतीनें बरे च दिसून येतात.

पण आपल्याकडे असले म्हातारे कमी असले तरी दुसऱ्या एका तऱ्हेचे म्हातारे फार आहेत. हे म्हातारे कोण? नवीन गोष्ट शिकण्याची ज्याची उमेद गेली तो म्हातारा असें एका सत्पुरुषानें म्हटलें आहे. असले म्हातारे आपल्याकडे जिकडे जाल तिकडे दिसून येतील लहानपणीं जें काय नशिबाला लागलें तें खरें! त्यानंतर थोडा मोठा होऊन एखाद्या धंद्याला लागला म्हणजे मग एखादी गोष्ट शीक म्हटलें तर तें कांहीं व्हावयाचें नाहीं. हा जडपणा शिकलेल्या आणि न शिकलेल्या दोन्ही वर्गाच्या अंगांत, पुष्कळ वर्षांच्या गुलामगिरीमुळें, अगदीं मुरून गेल्यासारखा झाला आहे. शिकलेल्या लोकांत थोडा ज्यास्त च आहे पण कमी नाहीं.

एकदा एका राष्ट्रीय शाळेंतल्या शिक्षकाला सहज सुचविलें: "अहो, तुम्ही थोडें हिंदी शिकून घ्या. हिंदी आपण राष्ट्रभाषा

मानली आहे. राष्ट्रीय शाळेंत तरी हिंदीचा अभ्यास झाला पाहिजे. त्यांतून हिंदी कांहीं कठिण भाषा नाहीं. सोपी आहे. आणि म्हणून च ती राष्ट्रभाषा होऊं शकली आहे. एखाद्या उन्हाळयाच्या सुट्टींत हिंदीभाषा सहज मौजेनें शिकतां येईल. तुम्ही शिकून घ्याल तर आपल्याला मुलांना थोडें हिंदी शिकवितां येईल." त्यावर त्याच्याकडून सरळ जबाब मिळाला : "तुमचें म्हणणें खरें आहे. हिंदी कांहीं तशी कठिण भाषा नाहीं. पण आतां आमच्यानें नवीन कांहीं शिकून होईलसें वाटत नाहीं. आम्ही जें कांहीं शिकलों आहों त्यांतून तुम्ही वाटेल तितकें काम करवून घ्या. पाहिजे तर चार तासांच्या ऐवजीं पांच तास शिकवूं. पण नवीन शिकावयाचें सांगू नका. शिकून शिकून कंटाळलों बुवा!" बिचारा जगून जगून सुद्धां कंटाळलेला दिसला. ह्याचें नांव म्हातारा.

ही झाली साधी हिंदी शिकण्याची गोष्ट. त्याच्या पुढें जाऊन जर कोणी म्हणेल कीं—"हिंदुमुसलमानांची एकी मजबूत करावयाची तर दोघांनीं हि जवळ येऊन एकमेकांची नीट ओळख करून घेतली पाहिजे. तसें केल्यानें बरेचसे गैरसमज आपोआप च नाहींसे होऊन जातील. ह्यासाठीं देवनागरीलिपीबरोबर च राष्ट्रीय शाळेंत उर्दूलिपी शिकविण्यांत यावी. आणि तसें करावयाचें म्हणजे शिक्षकांनीं आधीं ती लिपी शिकून घेतली पाहिजे."— तर तो वेडयांत च काढला जाईल. "अहो, मुसलमानांचें सगळें च उलटें. आम्ही शेंडी ठेवतों तर ते शेंडी काढून टाकतात. आम्ही दाढी काढून टाकतों तर ते दाढी वाढवितात. तशी च त्यांची लिपी आहे असें म्हणतात. आम्ही डावीकडून उजवीकडे लिहिणार तर ते उजवीकडून डावीकडे लिहिणार! असली लिपी आमच्यानें कसली शिकून होणार?" हें त्यांचें उत्तर. हें कल्पनेनें लिहीत नाहीं. वरील उत्तर एका गृहस्थांकडून प्रत्यक्ष मिळालेलें आहे. त्यांत मुसलमानांविषयीं त्यांची बोलण्याची तऱ्हा गमती-

[आ]खल आलेली होती. तो त्यांच्या मनांतला भाव नव्हता. त्यांच्या [म]नांतली गोष्ट इतकी च कीं "नवीन शिकणें नको."

आणि सूत कांतावयाचें म्हटलें तर?—मग तर विचारूं च नका. "आधीं वेळ हि थोडा च मिळतो म्हणा. पण वेळ जरी कसाबसा काढतां आला तरी आजपर्यंत असलें काम कधीं च केलेलें नाहीं. तेव्हां तें आतां कसें होणार?" इथून सुरवात व्हावयाची. "जें आजपर्यंत झालें नाहीं तें ह्यापुढें होणार नाहीं" हा म्हातारा तर्क. ह्या म्हाताऱ्याला हें कसें समजत नाहीं कीं जें आजपर्यंत झालें नाहीं असें पुष्कळ ह्यापुढें व्हावयाचें आहे? आजपर्यंत माझ्या बाळयाचें लगीन झालें नाहीं, तें अजून व्हावयाचें आहे, हें मला समजतें. पण आजपर्यंत माझ्या हातून सूत कांतून झालें नाहीं, तें पुढें व्हावयाचें आहे, हें मला कां समजत नाहीं? ह्याचा जबाब उघड आहे: आजपर्यंत मीं स्वराज्य मिळविलें नाहीं, तें पुढें मिळावयाचें आहे, हें लक्षात नाहीं म्हणून. आणि त्याबरोबर च आजपर्यंत मी मेलों नाहीं, तरी ह्यापुढें मरावें लागणार आहे; फार कश्याला, आजपर्यंत मी मेलों नाहीं म्हणून च ह्यापुढें मरावें लागणार आहे, ह्या गोष्टीचें हि भान नाहींसें झालें म्हणून.

माझ्या मना, आजपर्यंत मेलों नाहीं म्हणून पुढें मरणार नाहीं असल्या म्हाताऱ्या तर्काला बळी पडूं नको. नाहींतर फसगत होईल.

---

# जश्यास तसें

" तलवारीशीं तलवारीनें च लढलें पाहिजे. त्याशिवाय चालावयाचें नाहीं." असा आपल्यापैकीं बऱ्या च लोकांना वहीम आहे. त्यांतलें खरें कारण हें आहे कीं आज आपल्यापाशीं तलवार नाहीं. पुष्कळ वेळां जी वस्तु आपल्यापाशीं नसते तिची किंमत आपण उगीच वाढवीत असतों. तशी आपली दशा झाली आहे. आपल्या मनांत तलवार कां ? म्यानांत नाहीं म्हणून. खरोखर आपल्या म्यानांत जर तलवार असती तर तिच्याविषयीं आपल्या मनाला इतका मोह वाटला नसता.

मोह वाटला नसता. कारण आपल्याला खरी गोष्ट समजली असती. 'तलवारीशीं तलवार' हें म्हणणें जर आपल्या वडिलांच्या कानावर आलें असतें तर त्यांना हंसू आवरतें ना. कारण त्यांना लढाईचा अनुभव होता. कसें लढावयाचें हें त्यांना माहीत होतें. त्यांनीं आपल्याला सहज समजावून सांगितलें असतें कीं "बाबा, तलवारीशीं ढालीनें लढावें लागतें." ज्या वेळेस लोक 'त' म्हटल्या 'तलवार' समजत होते त्या वेळेस ही गोष्ट लोकांना माहीत होती. आज आम्ही 'त' म्हटल्या 'ताकभात' समजतों, त्यामुळें ही गोष्ट आमच्या गळीं उतरत नाहीं.

आपण 'जश्यास तसें' पुष्कळ वेळां म्हणतों. पण आपल्याला त्यांतला मतलब च समजत नाहीं. 'जश्यास तसें' ह्याचा अर्थ इतका च करावा कीं दुश्मनाची तलवार जितकी मजबूत तितकी आपली ढाल मजबूत असली पाहिजे. 'जश्यास तसें' ह्याचा अर्थ तलवारीशीं तलवार लढवावयाची असा करणें मंद बुद्धीचें काम आहे. तलवारीशीं लढवावयाची तर ढाल च. पण त्या ढालीचा सहन करण्याचा जोर तलवा-

रीच्या मारण्याच्या जोरापेक्षां कमी पडतां कामा नये. दुश्मनाच्या सवालांत जर पांच शेर राग भरलेला असला तर आपल्या जबाबांत पांच शेरांहून कमी प्रेम नसावें.

शिक्षकाला मुलाच्या अज्ञानाशीं लढावयाचें असतें. तो जर भलत्या च अर्थानें 'जश्यास तसें' घेऊन बसला आणि मुलांना म्हणूं लागला कीं "तुम्हांला जर एवढी साधी गोष्ट समजत नाहीं तर मला तरी कां समजावी? तुम्ही माझ्या सवालाचा जबाब देऊं शकत नाहीं. मी तुमच्या सवालाचा जबाब कां द्यावा? तुम्ही आपल्यापाशीं अज्ञान बाळगतां तर मीं च तेवढें काय म्हणून ज्ञान बाळगत बसावें?" उत्तर इतकें च कीं "मुलें अज्ञान बाळगतात म्हणून च तुझ्यावर ज्ञान बाळगण्याची खास जबाबदारी आहे." अज्ञानाशीं लढावयाचें तर ज्ञानानें च लढतां येईल. 'जश्यास तसें' ह्याचा अर्थ एवढा च कीं 'तोडीस तोड' पुरती झाली पाहिजे. समोरच्या माणसाचें अज्ञान जितकें खोल त्या मानानें आपलें ज्ञान हि खोल असलें पाहिजे. म्हणून च अगदीं खालच्या वर्गाला शिकविणारीं माणसें फार च वरच्या दर्ज्याचीं असावीं लागतात. मागें पुराणकाळांत ज्या लढाया झाल्या त्यात सुद्धां एका बाजूनें मेघाचें अस्त्र फेंकलें गेलें तर दुसऱ्या बाजूनें त्यावर वायूचें अस्त्र फेंकीत. वाऱ्यानें ढगांना पिटाळून लावावयाचें कीं ढगांवर ढग आपटवीत बसावयाचें? अज्ञानाच्या कपाळावर दुसरें अज्ञान घांसावयाचें कीं ज्ञानानें अज्ञान दूर करावयाचें?

ज्याला व्यवहाराची थोडीफार माहिती आहे त्याला ही गोष्ट समजण्याला कांहीं च अडचण पडूं नये. विस्तव विझवावयाचा तर पाणी ओतावें, अंधार पडला म्हणजे दिवा लावावा, ह्या गोष्टी कोणाला समजत नाहींत? आणि जर ह्या गोष्टी समजतात तर क्रोधाला प्रेमानें जिंकावें, बुराईला भलाईनें जिंकावें, कंजूषपणाला दिलदारपणानें जिंकावें, खोटयाला खऱ्यानें जिंकावें, हें संतांचें म्हणणें कां समजूं नये?

ह्या हि गोष्टी व्यवहाराच्या च आहेत. पण आपण विचार करीत नाहीं म्हणून आपल्याला त्या समजत नाहींत. आपल्या च मनांत जरा तपास घ्यावा म्हणजे सगळया गोष्टी निवळूं लागतील.

---

# त्याग आणि दान

एका माणसानें भलेपणानें व्यवहार करून पैसा मिळविला आहे. त्यावर तो आपला प्रपंच सुखानें चालवीत आहे. बायकामुलांवर त्याची माया आहे. देहाविषयीं ममता आहे. साहजिकपणें च पैश्यावर त्याचा भर आहे. दिवाळीचे दिवस आले म्हणजे आपल्या जमाखर्चाचा तो काळजीनें आढावा काढतो. एकंदरींत खर्च जमेच्या आटोक्यांत राहिला आहे आणि त्यामुळें 'पुंजी' कांहींशी वाढली आहे असें पाहून तो राजी होतो. मोठया थाटानें पण तितक्या च भक्तिभावानें तो लक्ष्मीची पूजा करतो. त्याला द्रव्याविषयीं लोभ असला तरी त्याबरोबर च लौकिकाची म्हणा, परोपकाराची म्हणा, बरी च चाड आहे. देवाधर्मासाठीं— ह्यांत च देशासाठीं हि समजा— खर्च केलेल्या पैश्याची फेड सव्याज होते असा त्याचा विश्वास आहे. त्यामुळें त्या कामीं तो सढळ हातानें खर्च करीत असतो. आणि लहान मुलांना जसा आईचा तसा आसपासच्या गरीब-गुरिबांना त्याचा मोठा आधार वाटत आहे.

दुसऱ्या एका माणसानें असा च सचोटीनें पैसा मिळविला होता. पण त्यांत त्याचें समाधान नव्हतें. त्यानें एकदा बगीच्यासाठीं विहीर खणवून घेतली. विहीर फार खोल झाली. तिच्यांतून थोडी माती, कांहीं मुरूम आणि पुष्कळ दगड निघाले. त्यांचा ढीग हि तसा च उंच झाला

होता. तो आपल्या मनाशीं विचार करूं लागला, "माझ्या तिजोरींत हि पैश्याची अशी च एक टेंकडी झाली आहे. त्या मानानें दुसरीकडे कुठें एखादा खळगा तर झाला नसेल?" विचाराचा धक्का विजेसारखा असतो. एवढ्या विचारानें तो खडबडून जागा झाला. ती विहीर त्याचा गुरु बनली. त्या विहिरीकडून त्याला जो मंत्र मिळाला त्याच्या कसोटीवर त्यानें आपली सचोटी घांसून पाहिली. पण ती कसाला उतरत नाहीं असें च त्याला दिसलें. 'धंदेवाईक सचोटी' मीं राखली असली तरी असल्या वाळूच्या पायावर माझें घर कितीसें टिकणार? ह्या विचारानें त्यास पुरतें पछाडलें. शेंवटीं दगडमाती आणि माणिकमोतीं ह्यांत त्याला कांहीं च फरक दिसेनासा झाला. नसता केरकचरा भरून ठेवण्यांत काय हंशील आहे असा विचार करून तो एका सुंदर पंहाटे उठला. सगळी संपत्ति गाढवांवर भरून गंगेवर घेऊन गेला. "आई, माझें पाप धुऊन टाक" इतकें म्हणून त्यानें ती कमाई आईच्या ओटींत रिकामी केली आणि बिचारा स्नान करून मोकळा झाला. त्याला कोणी विचारतात, "दान तरी कां केलें नाहींस?" तो असें उत्तर देतो : "दान करावयाचें म्हणजे 'पात्र' पहावें लागतें. अपात्रीं दान करण्यानें धर्म करतां अधर्म होऊन बसण्याची धास्ती असते. मला आयतें च गंगेचें 'पात्र' मिळालें. तेथें मीं दान केलें." ह्याहून थोडक्यांत तो इतकें च म्हणतो, "केरकचऱ्याचें का दान करावयाचें असतें?" त्याचें शेंवटचें उत्तर म्हणजे मौन. अश्या रीतीनें त्यानें संपत्तीचा त्याग केल्यामुळें आज सगळ्या 'जिवलगांनीं' त्याचा त्याग केला आहे.

पहिला दाखला दानाचा आहे. दुसरा त्यागाचा आहे. हल्लींच्या काळांत पहिला दाखला जसा मनांत भरतो तसा दुसरा भरत नाहीं. पण हा आपला कमकुवतपणा आहे. म्हणून च शास्त्रकारांनीं देखील दानाचा महिमा कलियुगांत सांगितला आहे. 'कलियुग' म्हणजे काय? कलियुग म्हणजे मनाचा कमकुवतपणा. कमकुवत मनाला द्रव्याचा

लोभ अजीबात सुटत नाहीं. त्यामुळें त्या मनाची फार च उंच उडी झाली तरी ती दानापर्यंत पोंचते. त्यागाइतकी तिची मजल जाऊं शकत नाहीं. लोभी मनाला त्याग म्हटला म्हणजे कसेंसें च वाटतें. त्यामुळें त्याच्यापुढें शास्त्रकारांनीं दानाचे गोडवे गाइले आहेत.

त्याग अगदीं मुळावर घाव घालणारा आहे, दान वरून वरून पालवी खुडण्यापैकीं आहे. त्याग पोटांत घेण्याची दवा आहे, दान कपाळावर फांसण्याची सुंठ आहे. त्यागांत अन्यायाची चीड आहे, दानांत लौकिकाची भीड आहे. त्यागानें पापाचें मुद्दल फिटतें, दानानें पापाचें व्याज चुकतें. त्यागाचा स्वभाव दयाळु आहे, दानाचा स्वभाव मायाळु आहे. दोन्ही धर्म च आहेत. त्यागाची वस्ती धर्माच्या माथ्यावर आहे, दानाची वस्ती धर्माच्या पायथ्याशीं आहे.

पूर्वीं माणूस आणि घोडा अलग राहत असत. कोणी को[illegible]ज्या ताब्यांत नव्हता. एकदा माणसाला कांहीं उतावळीचें काम पडलें. तेव्हां त्यानें घोड्यापाशीं त्याची पाठ थोड्या वेळापुरती भाड्यानें मागितली; घोड्यानें हि शेजारधर्म आठवून माणसाच्या म्हणण्याला कबुली दिली. माणूस म्हणाला, "मला तुझ्या पाटीवर तसें च बसतां येणार नाहीं. लगाम घालूं देशील तर च तुझी पाठ मला वापरता येईल." त्यानें हें हि म्हणणें कबूल केलें. माणसानें लगाम घालून घोड्यावर स्वारी केली. घोड्यानें हि थोड्या वेळांत कामगिरी बजावून दिली. आतां करारा-प्रमाणें घोड्याची पाठ मोकळी करावयाची. पण माणसाचा लोभ सुटे ना. तो म्हणतो: "हें बघ गड्या, तुझी पाठ कांहीं मला सोडवत नाहीं. तेव्हां तेवढी गोष्ट तूं मला माफ कर. बाकी तूं माझी चाकरी केली आहेस—आणि ह्यापुढें हि करशील– ही गोष्ट मी कधीं हि विसरणार नाहीं. त्याबद्दल मी तुझी चाकरी करीन. तुझ्यासाठीं तबेला बांधीन. तुला दाणा देईन. पाणी पाजीन. खरारा करीन. काय म्हणशील तें करीन. पण तेवढी गोष्ट काढूं नको." घोडा बिचारा काय करणार!

मोठयानें विंकाळून त्या मुक्या जनावरानें आपली फिर्याद देवाच्या दरबारीं रुजू केली. घोडयाला त्याग पाहिजे होता. माणूस दानाच्या गोष्टी सांगत होता. भल्या माणसा, हा तरी बोल खरा होऊं दे !

---

# ऋषितर्पण

## १

मनुष्य हा देव आणि पशु ह्यांच्या मधोमध उभा आहे. एका रीतीनें तो त्यांच्या मधला सांधा आहे किंवा त्यांना जोडणारा तो दुवा आहे असें हि म्हणतां येईल. त्यानें इच्छा केल्यास तो पशूहून पशु होऊं शकतो हा अनुभव पावलोंपावलीं येत च आहे. पण त्यानें इच्छा केल्यास देव बनण्याची ताकद त्याच्या अगीं आहे. हा हि अनुभव जगाला, थोडा का होई ना, आलेला आहे. 'नरका नारायण' होणें अशक्य नाहीं. ही गोष्ट आजपर्यंत अनेक थोर पुरुषांनीं आपल्या करणीनें जगाला दाखविली आहे. अश्यांपैकीं च अलीकडच्या काळांत लोकमान्य टिळकाचें उदाहरण आहे. जीं माणसें आपलें कर्तव्यकर्म बजावून देवकोटींत दाखल होतात त्यांना वेदानीं 'कर्म-देव' अशी पदवी दिली आहे. ही पदवी टिळकानीं आपणां सर्वांच्या डोळयांदेखत मिळविली. त्या प्रसंगाचें स्मरण तर अजून ताजें आहे. पण नुसतें स्मरण बस नाहीं. स्मरणाबरोबर अनुकरण पाहिजे.

आकाशाच्या पोकळींत असंख्य तारे भरलेले आहेत. दुर्बिणी-शिवाय नुसत्या डोळयानें त्या सर्वांचें दर्शन होऊं शकत नाहीं. दुर्बिणीनें

सुद्धां सर्वांचें दर्शन नाहीं च होत. पण नुसत्या डोळ्यापासून लपून राहिलेले कांहीं बारीक तारे दुर्बिणीला दर्शन देतात. जीवन हें आकाशा-सारखें पोकळ भासणारें आहे. पण हें पोकळ भासणारें जीवन अनंत भरीव सिद्धान्तांनीं भरलेलें आहे. नुसत्या बुद्धीला त्यांतले फार च थोडे सिद्धान्त गम्य आहेत. पण तपश्चर्येची दुर्बीण लावली म्हणजे कांहीं सूक्ष्म सिद्धान्त डोकावूं लागतात. असा एखादा नवीन सिद्धान्त किंवा तत्त्व जो पाहूं शकला त्याला मंत्र-दर्शन झालें म्हणावयाचें. त्याचें च नांव ऋषि. 'ऋषि' म्हणजे मंत्र पाहणारा असा मूळ अर्थ आहे. विश्वामित्र ऋषींनीं घोर तपश्चर्या करून गायत्रीमंत्र मिळविला ही कथा प्रसिद्ध आहे. टिळक हे हल्लींच्या काळचे असे च एक ऋषि होते. कारण त्यांनीं हि तपश्चर्या केली होती. त्यांना हि मंत्र मिळाला होता. हा मंत्र कोणता? "स्वराज्य माझा जन्मसिद्ध हक्क आहे आणि तो मी मिळविणार" हा तो मंत्र. ह्या मंत्राचा उच्चार तर आम्हीं बरा च केला आहे. पण नुसता उच्चार बस नाहीं. उच्चारा-बरोबर आचार पाहिजे.

ह्या आचाराचें धोरण कसें असावें हें हि टिळकांनीं सांगून टाकलें आहे. त्यांना तसें करणें भाग च होतें. कारण नुसतें तत्त्व सांगून चालत नाहीं, त्याबरोबर च त्याचा उपयोग केव्हां व कसा करावयाचा वगैरे मुद्दे हि खुलासेवार सांगणें जरूर असतें असें त्यांचें मत होतें. त्यामुळें केवळ वरील मंत्र सांगून त्यांचें समाधान झालें नाहीं. त्या मंत्राचें भाष्य हि त्यांनीं स्वतः च लिहिलें. भगवंतांनीं गीतेंत अर्जुनाला सांगण्याचें निमित्त करून जगाला उपदेश केला असें शंकराचार्यांनीं म्हटलें आहे. तसें च टिळकांनीं 'गीतारहस्यांत' गीतेचें निमित्त करून वरील मंत्राचें विवरण केलें आहे. पण ही गोष्ट आमच्या लक्षांत आली नाहीं. त्यामुळें गीतारहस्याचा गीतेच्या श्लोकांशीं मेळ घालण्याची आम्हीं नसती भानगड उभी केली आणि विनाकारण आपला घोटाळा करून

घेतला. गीतारहस्य हें वरील स्वराज्यमंत्राचें रहस्य आहे हें जर आम्हीं लक्षांत ठेवलें तर आम्हांला गीतारहस्याचा अर्थ समजेल. पण नुसतें समजणें बस नाहीं. समजण्याबरोबर उमजणें पाहिजे.

२

"स्वराज्य माझा जन्मसिद्ध हक्क आहे" हा झाला हक्काचा भाग. ह्याला च "आणि तो मी मिळविणार" हा कर्तव्याचा भाग जोडलेला आहे. आसुरी संपत्ति म्हणते, "हक्काचें रक्षण करणें हें माझें कर्तव्य आहे." दैवी संपत्ति म्हणते, "कर्तव्य करीत राहणें हा माझा हक्क आहे." पश्चिमच्या संस्कृतीला आसुरी संपत्तीचा हव्यास आहे. पूर्वेच्या संस्कृतीला दैवी संपत्तीविषयीं प्रेम आहे. संस्कृत भाषेंत तर 'हक्क' अशा अर्थाचा निराळा शब्द च आढळत नाहीं. तो अर्थ दाखविण्यासाठीं आपण 'अधिकार' शब्दाचा उपयोग करतों. पण 'अधिकार' शब्दाचा अर्थ मुळांत 'वांटयास आलेलें काम' किंवा 'कर्तव्य' असा च आहे. "तुझा कर्म करण्याविषयीं अधिकार आहे, फलाविषयीं नाहीं" ह्या गीतेच्या वचनात 'अधिकार' शब्दाच्या अर्थाबरोबर दैवी संपत्तीच्या वळणाचा हि चांगला खुलासा झालेला आहे. वरील स्वराज्यमंत्राची एकंदर ठेवण, आणि त्यांतल्या त्यांत पूर्वार्धाची, अगदीं पश्चिमच्या थाटाची झाली आहे हें काहीं खोटें नाहीं. पण सदर मंत्राचा अवतार साधारणपणें पश्चिमच्या संस्कृतीनें भारून गेलल्या लोकांसाठीं च असल्यामुळें तसें होणें एकपरी साहजिक च होतें. आणि जी गोष्ट मंत्राची ती च भाष्याची असणार हें उघड आहे. त्यामुळें गीतारहस्यावर पश्चिमच्या वळणाची चांगली च छाप पडलेली दिसते. पण शिष्य किती हि विद्वान असला तरी गुरुजनांच्या हाताखालीं नांदतांना विद्वत्ता मावळते च; किंवा भडक रंगाची वस्तु सुद्धां चांदोबाच्या राज्यांत फिकी पडल्यावांचून राहत नाहीं. तसें च

गीतारहस्यांत श्रीकृष्णाचें योगशास्त्र सांभाळून प्रवचन करावयाचें असल्यामुळें मूळच्या राजस वळणाला पुष्कळ आळा बसला आहे. त्यामुळें मंत्रांत पूर्वार्धावर जोर दिसला तरी भाष्यांत उत्तरार्धावर जोर आहे. "स्वराज्य हा माझा जन्मसिद्ध हक्क आहे" खरा. पण आळशी हक्काला पुसतो कोण? म्हणून ह्या पूर्वार्धांतील सिद्धान्तापेक्षां "आणि मी तो मिळविणार" हा उत्तरार्धांतील संकल्प अधिक महत्त्वाचा आहे. स्वराज्य आज कां नाहीं? आणि उद्यां कसें मिळवावयाचें? हे च मुद्द्याचे सवाल आहेत. आणि त्यांचा टिळकांनीं गीतारहस्यांत दिलेला जबाब अक्षरशः खरा आहे.

टिळकांचें म्हणणें थोडक्यांत असें आहे; "स्वराज्य मिळवावयाचें तर ज्ञान आणि कर्म ह्यांची जोडी फुटतां कामा नये." आजपर्यंत शहाणपणा आणि कर्तबगारी ह्यांची एकमेकांना ओळख च नव्हती. एकाचें तोंड पूर्वेकडे तर दुसऱ्याचें पश्चिमेकडे अशी दशा होती. त्यामुळें स्वराज्य दिसलें नाहीं. शहाणपणाला कर्तबगारीचा स्पर्श देखील सहन होई ना. ही अस्पृश्यता दूर केली म्हणजे स्वराज्य जवळ च आहे हें म्हणणें किती खरें आहे! आज वृद्धांचा अनुभव आणि तरुणांचा उत्साह वेगळीं झालीं आहेत. स्त्रियांचें शहाणपण आणि पुरुषांची कामगिरी ह्यांची ताटातूट झाली आहे. ब्राह्मणांचें शास्त्र आणि ब्राह्मणेतरांची कला ह्यांत तड पडली आहे. हिंदूंचें धोरण आणि मुसलमानांचा जोम ह्यांची जूट राहिली नाहीं. अग्रजांची सभ्यता आणि अंत्यजांची सेवा ह्यांचा स्पर्श नाहीं. भिक्षुकाचा धर्म आणि गृहस्थाचें कर्म ह्यांचा मेळ बसत नाहीं. ही स्थिति जर सुधारतां आली, ज्ञान आणि कर्म ह्यांचा 'समुच्चय' जर साधला, तर स्वराज्य म्हणजे हातची गोष्ट आहे हें काय सांगावयास पाहिजे?

पूर्वींच्या इतिहासांत महाराष्ट्रानें स्वराज्याची मोठी चळवळ

केली होती. त्या चळवळीच्या पुढाऱ्यांचा हि टिळकांनीं गीतारहस्यांत जो मुद्दा मांडला आहे त्या च मुद्द्यावर जोर होता. "चित्तीं नाम हातीं काम" हें त्या वेळच्या चळवळीचें ब्रीदवाक्य होतें. गोरोबा हे पुढाऱ्यांचे गुरु मानले जात असत. एवढी त्यांच्या ज्ञानाची ख्याति! पण म्हणून कच्चीं मडकीं भाजून पक्कीं करण्याचा त्यांचा कारखाना कधीं च बंद पडला नव्हता. सेना न्हावी हे हि चळवळींतले महान सेनापति होते. तरी डोक्यावरचा मळ काढून आरसा दाखविण्याचें काम त्याचें नेमानें चाललें च होतें. नामदेव तर चळवळीचा प्राण च म्हणावयाचा. नामदेवाचें नांव देव जपत असत तितकें कदाचित देवाचें नांव नामदेव जपत नसेल. असें असून फाटलेलीं शिवण्याचें त्याचें 'कुल-व्रत' कायम च होतें. आणि असें होतें म्हणन च त्या वेळीं महाराष्ट्राला थोडा वेळ तरी स्वराज्य दिसलें.

'ज्ञानी' म्हणविणाऱ्या लोकांना कर्म करण्याचा कंटाळा वाटूं लागला किंवा कर्माची लाज वाटूं लागली म्हणजे राष्ट्राच्या पडतीचा काळ सुरू होतो. हा नियम गिब्रननें रोमच्या इतिहासांत स्पष्ट नमूद करून ठेवला आहे. आणि आपल्याकडील सर्व संतांनीं, कवींनीं, आचार्योनीं ही च गोष्ट एका आवाजानें सांगितली आहे. "जे कर्माची खंती करतात ते गांवढळ आहेत," ज्ञानी नव्हेत. हें वाक्य तर 'ज्ञानियांचे राजे' ज्ञानेश्वर बोलून गेले आहेत. आणि मी पूर्वीच्या संतांना 'वाट पुसत' बोललों अशी त्यांनीं च ग्वाही देऊन ठेवली आहे. टिळकांना ती च गोष्ट सांगावयाची होती. पण त्यांना असा भास झाला कीं, ही गोष्ट सांगण्याच्या कामीं मला कोणाची च मदत नाहीं, मी अगदीं एकटा पडलों आहें. आणि तसें वाटल्यामुळें अगदीं चिडून जाऊन आवेशानें त्यांनीं आपलें म्हणणें मांडलें आहे. ह्याबद्दल जबाबदार कोण? गुलाम लोकांचा बावळा प्रपंच आणि नेभळा परमार्थ.

## ३

खरोखर ज्ञानाला कर्माची भीति हि वाटत नाहीं आणि खंती हि वाटत नाहीं. सामान्य ज्ञानाला च नव्हे पण ब्रह्मज्ञानाला हि हा नियम लागू आहे. जो ज्ञानांत जितका मुरला तो तितका कर्मांत हि रंगला म्हणून समजावें. ज्ञान उगवलें कीं कर्माची 'कटकट' मावळते हें खरें आहे. पण कर्माची कटकट मावळते म्हणजे कर्म मावळतें असा अर्थ नाहीं. कर्म सहज होऊन जातें असा अर्थ आहे. आपण ज्ञानी लोकांच्या च कांहीं साक्षी घेऊं.

पहिली साक्ष श्रीकृष्णाची. ते म्हणतात, "मनुष्याच्या चित्तांत ज्ञानाचा उदय झाला म्हणजे त्या च क्षणाला 'मी' मावळून जातो. त्यामुळें लोकांचा कळवळा वाटूं लागतो. बरें, धैर्याचे आणि उत्साहाचे किरण फांकल्यामुळें भीतीचा किंवा खंतीचा सवाल च राहत नाहीं. अश्या स्थितींत ज्ञानी दुप्पट जोरानें कर्म आचरूं लागतो. भूतदयेमुळें लोकसंग्रहाचें त्याच्या देहाला सहज वळण लागतें." ह्या बाबतींत त्यांनीं जनकमहाराजांचा जुना दाखला दिला आहे आणि आपला अनुभव भरीस घातला आहे. शिवाय "श्रेष्ठ पुरुष कर्म न करतील तर लोकांना धडा मिळणार नाहीं" अशी सामाजिक युक्तिवादाची पुस्ती जोडली आहे.

दुसरी साक्ष आचार्यांची. ते म्हणतात, "ज्ञानाचा अग्नि पेटला म्हणजे कर्में जळून जातात असें जें म्हणतात तें संसारांतल्या कर्माविषयींचें बोलणें आहे. परमार्थाच्या कर्माला तें लागू नाहीं. पारमार्थिक कर्में आचरल्यामुळें च मनुष्याला ज्ञान प्राप्त झालेलें असतें. म्हणजे पर्यायानें ह्या कर्माच्या पोटीं ज्ञानाचा जन्म झालेला असतो. त्यामुळें तें कर्म ज्ञानाला आईसारखें आहे. अश्या स्थितींत जर ह्या हि कर्मावर ज्ञानानें हत्यार उपसलें तर त्याला मातृहत्येचें पातक लागेल! म्हणून साधकावस्थेंत सुरू केलेलें 'प्रारब्ध' कर्म ज्ञान झाल्यानंतर शिल्लक राहतें."

ह्या मुद्द्याचा खुलासा करतांना 'कुंभाराचें चाक मडकें तयार झाल्यावर हि कांहीं वेळ फिरत राहतें' असा त्यांनीं व्यावहारिक दृष्टान्त दिला आहे.

तिसरी साक्ष समर्थांची. ते म्हणतात, "जरी साधकाला ज्ञानाचें 'गूज' प्राप्त झालें तरी पुन्हां पूर्वींसारखा च तो प्रयत्न करीत राहतो. कारण हें गूज झालें तरी गंजून जाणार नाहीं ह्याबद्दल काय पुरावा? असा विचार करून सत्कर्मांच्या योगानें तो आपल्या ज्ञानाला घांसत असतो. त्यामुळें गंज चढण्याची धास्ती राहत नाही. हालवून खुंटा बळकट करण्यासाठीं ज्ञानी सावधान वृत्तीनें आपली उपासना चालवितो आणि शेंवटपर्यंत सत्कर्म आचरीत राहतो."

चवथी साक्ष तुकोबांची. ते म्हणतात, "आधीं होता गांवजोशी. त्याच्या गळयांत हत्तीनें माळ घातली. त्यामुळें बिचारा 'राजा' झाला. तरी पण त्याचें 'पंचांग' राही ना." ज्ञानी मनुष्याची स्थिति ह्या 'राजा'-सारखी च असते. त्याला तरी साधकावस्थेंत लागलेलें वळण कसें चुकणार? ह्या म्हणण्याच्या पुष्टीसाठीं त्यांनीं आपला च अनुभव सांगितला आहे, "मी नुसता 'तुका' होतों त्या वेळीं संतांची संगत लागून भजनाचा छंद लागला. आज मी 'राम' झालों आहें खरा पण माझें भजन कांहीं राहत नाहीं. मूळ स्वभाव जात नाहीं त्याला मी तरी काय करूं?"

४

असो. मोठया लोकांच्या नादीं लागून आपण फार च मोठया गोष्टी केल्या. ह्या गोष्टी आपल्या अधिकाराबाहेरच्या आहेत. पुष्कळांना त्या समजणार हि नाहींत. पण कांहीं हरकत नाहीं. आज ज्या गोष्टी समजत नाहींत त्या उद्यां समजूं लागतील. संतांच्या कृपेनें आपला अधिकार हि हळूं हळूं वाढेल. त्यांतून कधींमधीं अश्या गोष्टी कानांवर आल्यानें कांहीं नुकसान नाहीं. ऐपत नसली तरी लोक सणावारीं

सावकाराचें ऋण काढून सण नाहीं का करत ? तसें च लोकमान्यांच्या पुण्यतिथीच्या दिवशीं आपण संतांच्या पायांपाशीं भीक मागून चार तुकडे गोळा केले ह्यांत कांहीं चूक झाली नाही. तसें न केलें तर गरिबांना गोड घांस तरी कधीं खावयास मिळणार ? शिवाय आपण सावकाराचें ऋण काढलेलें नाहीं. संतांचें ऋण काढलें आहे. त्यामुळें आपण सुरक्षित आहों. संत आपल्याला नाडतील अशी तर भीति नाहीं च. सवाल काय तो एवढा च आहे कीं आपण हें मिष्टान्न पचवूं शकूं कीं नाहीं.

---

# तीन गृहदेवता

कोणाच्या हि स्वतंत्रतेला बाध येऊं नये, मर्यादा तुटूं नये आणि समाजाचा गाडा हि सुरळीत चालून होतां होईल तों सर्व काम शांतीनें व्हावें हा मुद्दा डोळ्यांपुढें ठेवून हिंदुसमाजाची रचना झाली आहे. त्यामुळें अगदीं नेहमींच्या जरूरीसाठीं कोणी कोणावर अवलंबून राहूं नये असा नियम हिंदुसमाजानें घालून दिला. हा नियम सरळ चालावा म्हणून हिंदुसमाजानें कांहीं संस्था उभ्या केल्या. आणि त्यांच्या रक्षणासाठीं त्यांचा समावेश धर्मांत करून घेतला. अश्या संस्थांपैकीं अगदीं अव्वल दर्ज्याच्या तीन संस्था आहेत.

पहिली संस्था चूल ही होय. आज आपल्याला ह्या संस्थेचें महत्त्व समजत नाहीं. कारण सुदैवानें आपल्या घरांतील चूल अजून विझली नाहीं. वस्तूचें महत्त्व अतिपरिचयामुळें कळत नाहीं. शाळेंतून 'आई थोर तुझे उपकार' म्हणून किती हि घोकलें असलें तरी आई जिवंत

असतांना तिच्या उपकाराची कल्पना उन्मत्त मुलाला येऊं शकत नाहीं. पण आई मरून आपण पोरके झालों ही गोष्ट लक्षांत आल्यानंतर मग आई म्हणजे काय चीज आहे हें उमगतें. युरोपच्या लोकांची चूल विझत चालल्यामुळें चुलीच्या गोड उबेविषयीं तिकडच्या कवींनीं काव्यें लिहिलीं आहेत. आपल्याकडे अजून असल्या काव्यांची गरज उत्पन्न झालेली नाहीं. जरी मुंबईसारख्या ठिकाणीं मिलमध्यें किंवा कॉलेजमध्यें गद्धा-मजुरी करणारे कांहीं प्राणी चुलीच्या उबेला पारखे झाले आहेत हें विसरून चालणार नाहीं. आतां च सावध होऊन ह्या नवीन लागवडी-चा बींमोड केला पाहिजे. राष्ट्राची चूल विझविण्याइतकी गंभीर भूल दुसरी क्वचित च असूं शकेल.

दुसरी महत्त्वाची संस्था म्हणजे 'चक्की'. चक्की नुसती आटा च पिसत नाहीं. घरांतला आळस आणि रोग हि पिसून काढते. ही संस्था आतां शहरांतून बहुतेक नाहींशी होत चालली आहे. जनाबाईबरोबर पांडुरंग दळूं लागले होते ह्या गोष्टीचें कौतुक अलीकडली शहरांतली बाई करूं शकत नाहीं. उलट मुलीला स्थळ असें शोधून काढावें कीं तिच्या नशिबाला दळण लागूं नये अशी बापाची इच्छा आणि खटपट असते. दळतांना म्हणण्यासाठीं तुकाराममहाराजांनीं ओंव्या लिहून ठेवल्या आहेत. मोरोपंतांनीं रुक्मिणीगीत, सीतागीत, सावित्रीगीत अशीं तीन गीतें रचून ठेवलीं आहेत. पण बहकलेल्या लोकांना ह्याचें काय होय ? श्रम वांचवून काय कराल ? प्राण वांचणार नाहीं. पण प्राण वांचला नाहीं तरी बेहेत्तर, श्रम वांचला पाहिजे, इतका श्रम करण्याचा कंटाळा वाटूं लागला आहे. गिरणीचें पीठ जळून गेलेलें असतें. त्याच्या योगानें रोग फैलावतात. छात्रालयांत, खाणावळींत वगैरे कधीं कधीं महिन्यामहिन्याचें शिळें पीठ वापरलें जातें. सोन्यासारखे गहूं गिरणींतून दळवून आणणें म्हणजे गव्हांची च नव्हे पण स्वतःच्या शरिराची हि माती करवून घेण्यासारखें आहे. ह्याविषयीं सगळ्या डॉक्टरांचें एक च

मत आहे. त्यामुळें चक्कीचा जीर्णोद्धार करणें अगत्याचें आहे, हें सर्वांस कबूल झालें पाहिजे.

तिसरी संस्था चरख्याची चात. चरख्याविषयीं ह्यापुढें पुष्कळ ओंव्या म्हणावयाच्या आहेत. तरी आज नमनाची ओंवी म्हटली च पाहिजे. पूर्वीं हरएक कुटुंबांत चरखा चालत होता. त्यामुळें 'एका रोटी' प्रमाणें 'दो लंगोटी' चा हि सवाल आपोआप सुटला होता. खेडेगांवच्या बलुत्यांपैकीं विणकर हें एक बलुतें होतें. घरीं कांतलेलें सूत ह्या विणकऱ्यांकडून विणवून घ्यावयाचें. आणि त्याच्या मोबदल्यांत त्याला वर्षाकांठीं थोडा दाणा मिळावयाचा. ह्या पद्धतीचा आतां अजीबात विसर पडला आहे. चरखा घरांत दाखल झाला म्हणजे चक्कीचा आणि चुलीचा सवाल देखील उरणार नाहीं. पोटाला पुरेसें न मिळाल्यामुळें खेडेगांवांतल्या लोकांना शहरांत यावें लागतें. हें त्यांचें शहरांत येणें जर बंद करतां आलें तर आपोआप चूल पेटेल आणि चक्की हि चालू करणें सोपें जाईल. खेडेगांवच्या लोकांचा शहराकडे वाहणारा ओघ बंद करण्याची ताकद एका चरख्याची आहे. त्यामुळें चरख्याची स्थापना झाली म्हणजे चक्कीसाठीं आणि चुलीसाठीं निराळें कांहीं च करावें लागणार नाहीं. चूल, चक्की आणि चात ह्या तीन गृहदेवता आहेत. त्यांची उपासना करणाऱ्या गृहस्थाचें सदा कुशल होईल. शान्तिस्तुष्टिः पुष्टिश्चास्तु ।

---

# मुलें निघून जातील

सहा महिन्यांपूर्वी भुसावळची राष्ट्रीय शाळा बंद करून आलों. परवां हिंगणघाटची राष्ट्रीय शाळा बंद करून आलों. दोन्ही ठिकाणचे आवरण-समारंभ माझ्या हातून पार पडले. मी 'आवरण-समारंभ' म्हणतों. 'अन्त्यविधि' म्हणत नाहीं. कारण राष्ट्रीय शाळा मेली तरी तेवढ्यानें राष्ट्रीय शिक्षण मरत नाहीं. आत्म्याच्या अमरत्वाप्रमाणें राष्ट्रीय शिक्षणाच्या अमरत्वावर माझा विश्वास आहे. कारण, त्याचा मीं अनुभव घेतला आहे. प्रत्येक राष्ट्रीय शिक्षकाला त्याचा अनुभव घेतां येण्यासारखा आहे. राष्ट्रीय शिक्षणाला मृत्यु आहे ही गोष्ट कोणी हि राष्ट्रीय शिक्षक स्वतः जिवंत असतां कल्पूं शकणार नाहीं. ज्याप्रमाणें आई म्हणजे घर त्याप्रमाणें राष्ट्रीय शिक्षक म्हणजे राष्ट्रीय शिक्षण. सबंध दुनियेला राष्ट्रीय शिक्षणाचा मृत्यु दिसला तरी राष्ट्रीय शिक्षकाला तो कधीं च दिसूं नये. लोकांच्या डोळ्याला जिथें अंधार दिसतो तिथें सूर्याला अंधार दिसला आहे काय? किंवा एवढी मोठी उपमा कश्याला! एखाद्या लहानश्या दिव्याला तरी अंधार दिसला आहे काय? राष्ट्रीय शाळा हें राष्ट्रीय शिक्षणाच्या अनेक शरिरांपैकीं एक शरीर मात्र आहे. शरीर मेलें तरी आत्मा मरत नाहीं. उलट कधीं कधीं तर शरिराच्या बंधनांतून सुटला म्हणजे आत्मा अधिक च खुलतो. ती च आज राष्ट्रीय शाळांची स्थिति आहे. मरतुकड्या शाळांत राहण्याचा लोभ सोडून देणें हें आज राष्ट्रीय शिक्षणाचें कर्तव्य होऊन बसलें आहे. त्यामुळें राष्ट्रीय शिक्षणाचा रात्रंदिवस जप करणाऱ्या माझ्यासारख्या माणसाला राष्ट्रीय शाळेचा (लौकिक दृष्टीनें) अन्त्य-विधि करतांना हि दुःख होत नाहीं.

एकदा एक राक्षस आणि एक माणूस कांहीं करार करून मुसाफरीला निघाले. चारदोन दिवस त्यांचें नीट चाललं. पुढें राक्षस कराराच्या अटी एकामागून एक मोडूं लागला आणि माणसावर एक एक नवीन नवीन शर्त लादूं लागला. माणसानें जरा तक्रार केली कीं, 'खाऊन टाकतों'. त्यानें कांहीं दिवस सहन करून पाहिलें पण त्यामुळें मंत्राचा जप अधिक च होऊं लागला. शेंवटीं त्यानें जिवाचा धडा केला आणि 'खाऊन टाकतों, खाऊन टाकतों म्हणतोस तर खाऊन टाक' असें एकदाचें राक्षसाला सांगून टाकलें.

राष्ट्रीय शाळांच्या पाठीशीं असा च एक राक्षस लागून राहिला आहे. राष्ट्रीय शिक्षणाच्या करारांतील कोणती हि अट तो पाळीत नाहीं. भलभलत्या अटी लादूं पाहतो. आणि जरा कांहीं त्याच्या मर्जीविरुद्ध झालें कीं एका मंत्राचा प्रयोग करतो, "मुलें निघून जातील". इंग्रजीचा जुलूम कमी करावा तर "मुलें निघून जातील". एक वेळ चरखा, एक वेळ शिक्षण म्हटलें तर "मुलें निघून जातील". ह्याचा अर्थ काय? राष्ट्रीय शिक्षणाचें कोणतें हि तत्त्व दाखल करावें तर "मुलें निघून जातील!" पण मुलें निघून जायला आधीं आलीं च होतीं कशाला? राष्ट्रीय शाळांतून राष्ट्रीय शिक्षणाचीं तत्त्वें पाळावयाचीं नाहींत मग पाळावयाचीं तरी कोठें? राष्ट्रीय शाळेंतून राष्ट्रीय शिक्षणाचीं तत्त्वें वजा करावयाचीं मग शिल्लक राहिलेल्या शेणगोळ्याचा उपयोग काय? उपयोग इतका च: देशसेवेच्या दंभावर सारवण.

बरें, इतकें करून फळ काय निघालें? भुसावळची राष्ट्रीय शाळा काय किंवा हिंगणघाटची राष्ट्रीय शाळा काय, कां मेली? मुलें निघून जाण्याच्या रोगानें च. म्हणजे जो रोग होईल होईल म्हणून धास्ती बाळगली होती त्या च रोगानें. पुष्कळ वेळां रोगाचा इतर कारणांपेक्षां भावनेशीं च ज्यास्त संबंध असतो असें मानसशास्त्रानें ठरविलें आहे. म्हणून एखाद्याला क्षयरोग लागू झाला म्हणजे आपण

त्याला 'क्षयाची भावना' झाली आहे असें म्हणतों. त्या च भाषेंत बोलावयाचें तर ज्या राष्ट्रीय शाळा मेल्या त्या मुलें निघून जाण्याच्या 'रोगानें' मेल्या असें म्हणण्यापेक्षां मुलें निघून जाण्याच्या 'भावनेनें' मेल्या असें म्हटलें पाहिजे. जशी भावना तसें फळ हा ठरलेला सिद्धान्त आहे.

म्हातारे लोक गोष्ट सांगत असतात : एका वेळीं दुपारच्या उन्हांत चालून थकून गेलेला एक प्रवासी एका झाडाखालीं विसांवा घेण्यासाठीं बसला. थोडा विसांवा घेतल्यानंतर "आतां जर थंड गार पाणी मिळालें तर काय बहार होईल!" असा विचार त्याच्या मनांत आला. त्याबरोबर जमीन दुभंग झाली आणि पाताळांतील पाण्याची गोड धार त्याच्या तोंडांत येऊन पडली. ज्या झाडाखालीं तो बसला होता तें सामान्य झाड नसून तो कल्पवृक्ष होता हें त्याला माहीत नव्हतें. त्यामुळें त्या प्रवाश्याला आश्चर्य वाटलें. थोडया वेळानें आश्चर्याचें रूपांतर भीतींत झालें–"हें भूतबीत तर नसेल?" समोर एक अकराळविकराळ भूत उभें राहिलें. "आतां मला हें खाल्ल्या-शिवाय राहत नाहीं!" झालें, प्रवास संपला!

समाज हि असा च एक कल्पवृक्ष आहे. त्याच्या सावलींत बसून "राष्ट्रीय शाळा मुलांनीं भरून जातील" अशी जोरदार भावना करण्यात आली. त्या वेळीं राष्ट्रीय शाळा मुलांनीं गजबजून गेल्या. "पुन्हां मुलें निघून जातील" ही दुबळी भावना पैदा झाली. मुलें ओसरून गेलीं. त्यांत समाजाचा काय दोष? "मुलें उत्तरोत्तर वाढत जातील" अशी भावना ठेवून जर राष्ट्रीय शिक्षणाच्या तत्त्वांचा नीट अंमल केला असता तर मुलें निघून गेलीं च नसतीं. निदान, "मुलें निघून जातील तर जाऊं देत" असा राक्षसाला सडेतोड जबाब देऊन टाकला असता तर आजच्या सारखी "तत्त्वें गेलीं, मुलें गेलीं, लुडबुड तेवढी हातीं आली" अशी दशा झाली नसती.

टीका करण्याचा उद्देश नाहीं. झालें तें होऊन गेलें. त्यापासून बोध घेतला पाहिजे. समाज एकमुखी असणें शक्य नाहीं. समाजांत निरनिराळ्या विचाराचे अनेक लोक असतात. त्या सर्वांचें समाधान करण्याचा प्रयत्न फुकट आहे. कांहींतरी—कमींत कमी कां होई ना—तत्त्वें निश्चित करून त्यांचा व्यवस्थित अंमल करीत राहिलें पाहिजे. आपण राष्ट्रीय शिक्षणाच्या तत्त्वांकडे तर दुर्लक्ष केलें च पण लोक-संग्रहाच्या नादीं लागून सामान्य शिक्षणाचीं तत्त्वें हि झुगारून दिलीं : "दिली परीक्षा घेऊन मुलें भराभर पास करून घेतों. कोणत्या हि मुलाला तो म्हणेल त्या वर्गांत दाखल करतों. कोणीकडून मुलांचे पाय एकदाचे शाळेला लागोत म्हणजे झालें!" शेंवटीं लोकांचें समाधान झालें नाहीं च. उलट "राष्ट्रीय शाळेंतल्या शिक्षणांत आणि सरकारी शाळेंतल्या शिक्षणांत फरक काय?" असा आक्षेप मात्र डोक्यावर आला. ही सारी लोक-संग्रहाची लीला आहे.

शंकर आणि पार्वती नंदीवर बसून फिरावयास निघालीं होतीं. तें पाहून "बैल झाला तरी त्याला असें ताबडावें काय?" असा एकानें आक्षेप घेतला. त्याचें समाधान करण्याकरितां पार्वतीमाता खालीं उतरून पायीं चालूं लागल्या. त्यावर "सुकुमार अबलेची दरकार न करणारा हा धटिंगण कोण हो?" अशी शंकरांना शिवी मिळाली. नंतर मातुःश्री नदीवर बसल्या. शंकर चालूं लागले. "नवरा चालत असतां नंदीवर बसणारी निलाजरी बाई आज च पाहिली" असा आईसाहेबांना टोमणा मिळाला. मग दोघे नंदीबरोबर चालूं लागले. तेव्हां दोघे नंदीबैल ठरले. शेंवटीं नारदांनीं नंदीला डोक्यावर घेण्याची सल्ला दिली. तेव्हां दोघांनीं पूर्वींप्रमाणें सरळ नंदीवर आसन ठेवलें. कारण, मुद्दा त्यांच्या लक्षांत येऊन चुकला. "हातचीं तत्त्वें सोडून पळत्या लोकसंग्रहाच्या पाठीं लागण्यांत कांहीं हशील नाहीं" एवढा बोध आपणांस मिळाला तरी बंद झालेल्या राष्ट्रीय शाळांचें सार्थक होईल.

# स्व-रूप पहा

श्रीमंताचा मुलगा. कधीं एकदा खेळायला घराबाहेर निघाला होता. इकडे सूर्यनारायणाची आकाशांत शांत तपश्चर्या चालू च होती. बाळया पडला नाजुकसाजुक. पाय पोळूं लागले. त्यामुळें दुनियेचा दोस्त सुद्धां त्याला दुश्मनासारखा दिसला. श्रीमंताचा च पोर तो.–डोक्यानें काम करण्यांत मोठा पटाईत होता. त्यानें शक्कल काढली कीं सगळया जमिनीवर चामडें आंथरून द्यावें म्हणजे पाय भाजणार नाहींत. लागलीं च घरीं येऊन त्यानें आपली कल्पना बापाला सांगितली. बापाला बाळयाचें कौतुक तर वाटलें. पण तें आवरून तो त्याला म्हणाला, "अरे खुळया, सगळया पृथ्वीला नेसविण्यापेक्षां तूं च आपल्या पायांत जोडे घाल म्हणजे झालें!"

आमची स्थिति ह्या श्रीमंताच्या खुळया पोरासारखी आहे. त्यामुळें आकाशाला गंवसणी घालणाऱ्या मोठ्या मोठ्या 'कल्पना' आम्हांस सुचतात. पण साधे, सरळ, सोपे इलाज सुचत नाहींत. कोणत्या हि प्रश्नाचा आंतून विचार न करतां बाहेरून विचार करण्याची आम्हांला संवय च लागत चालली आहे. गांठ सोडावयाची म्हणजे आंतून उकलावी लागते, बाहेरून ओढाताण करण्यानें ती सुटण्याऐवजीं अधिक च मजबूत होऊन बसते हें आम्हांस समजत नाहीं. एशिया खंडाचें ऐक्य करण्याची कल्पना आम्ही शोधून काढतों पण आपल्या मनांतला क्रोध जिंकण्याला आम्हांला वेळ मिळत नाहीं. कोणती हि गोष्ट जगाला कशी लागूं करावी ह्याची 'स्कीम' करण्यांत आम्ही डोकें खर्च करतों, पण आपल्या स्वतःला ती लागू करण्याचें मात्र अचूक विसरतों. व्हावयास पाहिजे ह्याच्या उलट. जी गोष्ट जगाला लागू करावी असें

आपणांस वाटतें तिचा अंमल आपण स्वतः ताबडतोब सुरू केला पाहिजे. आचार हें च प्रचाराचें एकमात्र साधन आहे.

पृथ्वीची प्रदक्षिणा सर्वांत लवकर कोण करतो अश्याविषयीं एकदा देवांच्या सभेंत चर्चा निघाली. हरएकानें लांबलचक गणित करून "मी अमुक वेळांत प्रदक्षिणा करून येतों" असें उत्तर काढलें. त्याप्रमाणें सर्वांनीं प्रदक्षिणा करून विष्णूला नमस्कार घालावा असें ठरलें. जो तो धावूं लागला. नारद स्वस्थ होते. त्यांनीं चर्चेंत हि भाग घेतला नाहीं आणि पायपिटींत हि घेतला नाहीं. ब्रह्मवीणेच्या नादांत ते रंगून गेले होते. पण अगदीं पहिला देव धापा टाकीत परत येत आहे असें पाहतां च त्यांनीं स्वतःभोंवतीं गिरकी मारून विष्णूला नमस्कार घातला. सर्व देव परत आल्यावर विष्णूनें परीक्षेचा निकाल लावून नारदांचा पहिला नंबर लावला. विष्णु म्हणाला, "'पिंडीं तें ब्रह्मांडीं' ह्या सूत्राप्रमाणें नारदांनीं पृथ्वी–प्रदक्षिणा पुरी केली आहे असें माझें मत आहे."

आम्ही जग सुधारण्याचा ठेका घेऊन बसतों आणि जगांत 'आमची' हि गणना होते एवढी मुद्द्याची गोष्ट लक्षांत घेत नाहीं. त्यामुळें आमचें सारें चरित्र म्हणजे 'विरोधालंकाराचें' उदाहरण झालें आहे. आम्ही मौनाच्या प्रचारासाठीं व्याख्यानें देतों आणि प्रचार झाला नाहीं म्हणजे विचारांत पडतों. पण उलगडा होत नाहीं. उलगडा होईल कसा?

वेदान्तांत गोष्ट प्रसिद्ध आहे:—दहा माणसें यात्रेला निघालीं होतीं. जंगलांतून पसार व्हावयाचें होतें. वाट जरा धोक्याची असल्यामुळें संगळ्या माणसांनीं एकत्र चालावें असा ठराव झाला. एकानें माणसें मोजून पाहिलीं तों नऊ च भरलीं. दुसऱ्यानें मोजून पाहिलीं. तरी नऊ च. असें कां? दहावा माणूस कोठें आहे? कांहीं पत्ता लागे ना.

शेवटीं "दहावा माणूस हरवला" असा दहा जणांनीं एकमतानें ठराव पास केला!

हल्लीं आमचा हा च घोटाळा आहे. "काम करावयाला माणसें नाहींत" असें म्हणणारीं 'माणसें' ठिकठिकाणीं आढळतात. जो तो स्वतःला मोजण्याचें सोडून देतो आणि हिशोब करावयाला बसतो. त्यामुळें कामाचा कांहीं च मेळ बसत नाहीं. स्वतःला वगळून विश्वाचें कोडें सोडविण्याची खटपट फुकट आहे. त्यानें हाताला कांहीं च न लागतां माणूस नुसता गांगरून जातो. अर्जुनाला विश्वरूप-दर्शनाची हौस वाटली होती. भगवंतांनीं ती हौस चांगली च पुरविली. बिचाऱ्यानें पुन्हां विश्वरूप–दर्शनाचें नांव काढलें नाहीं. स्व-रूप पहा. विश्व–रूप पाहूं नका.

"तीस कोटि लोकांचीं शरिरें खादीमय झालीं पाहिजेत. सहा कोटि कुटुंबांत सहा कोटि चरखे दाखल झाले पाहिजेत." हें खादीचें 'विश्वरूप'. "माझ्या शरिरावर संपूर्ण खादी असली पाहिजे. मला रोज एक तास तरी चरखा कांतला पाहिजे" हें खादीचें 'स्वरूप'. "हिंदु, मुसलमान, पारशी, खिस्ती, शीख इत्यादि सर्व समाजांत अहिंसक वृत्ति उत्पन्न झाली पाहिजे" हें अहिंसेचें 'विश्वरूप'. "माझें अंतःकरण प्रेमानें भरलेलें पाहिजे. माझ्या वाणीवर माझा ताबा पाहिजे" हें अहिंसेचें 'स्वरूप'. "सरकारनें सुरू केलेले तमाम सर्व हमालखाने बंद पडले पाहिजेत. सर्व शिक्षकांनीं व विद्यार्थ्यांनीं सरकारी शाळांचा त्याग केला पाहिजे" हें राष्ट्रीय शिक्षणाचें 'विश्वरूप'. "मी किंवा माझ्या मुलांनीं सरकारी शाळांत जाऊं नये. माझ्या हातून चारदोन मुलांना राष्ट्रीय शिक्षण मिळावें. माझें अध्ययन आणि चिंतन सतत चालू असावें" हें राष्ट्रीय शिक्षणाचें 'स्वरूप'.

हरएक प्रश्नाची स्वरूप दर्शन आणि विश्वरूप-दर्शन अशीं दोन अंगें असतात. पहिलें अंग मनुष्याच्या हातचें आहे. दुसरें परमेश्वराच्या

ताब्यांत आहे. मोठा 'ऑल-इंडिया-मॅन' उर्फ भारती-माणूस झाला तरी "औट हात तुझा जागा" ह्या तुकोबांच्या वचनांतून तो सुटत नाहीं च. अर्जुन काय लहानसहान पुरुष होता? त्याच्या काळीं तो एक च 'नर' म्हणविला जात होता. पण विश्वरूप-दर्शन त्याच्या पचनीं पडलें नाहीं. तरी भगवंतांनीं 'दिव्य' दृष्टि देऊन ठेविली होती. इतका सगळा योग असतांना अर्जुनाची ती दशा. मग किरकोळांची कथा काय? म्हणून आपण स्व-रूप सांभाळावें. विश्व-रूपाची काळजी करण्यास विठोबा समर्थ आहे.

शिवाय स्वरूपदर्शन हें च विश्वरूपदर्शनाचें उत्तम साधन आहे. स्वरूपदर्शन मध्यबिंदूसारखें म्हटलें तर विश्वरूपदर्शन परिधी-सारखें आहे. मध्यबिंदु पकडून ठेवल्याशिवाय परिधि हातीं लागावयाचा नाहीं. जोंपर्यंत मी अहिंसक बनलों नाहीं तोंपर्यंत जगाला मी अहिंसक बनवूं शकेन काय? परशुरामानें हा प्रयोग एकवीस वेळां करून पाहिला होता. परशुराम स्वतः क्षत्रिय बनला होता. आणि पृथ्वीला निःक्षत्रिय करूं पाहत होता! मॉन्टेस्क नांवाच्या फ्रेंच ग्रंथकारानें फ्रेंच लोकांच्या प्रचारक वृत्तीविषयीं एके ठिकाणीं असें म्हटलें आहे कीं "दुसरीकडचे लोक आपल्याला माहीत असलेले विषय शिकवितात त्यांत कांहीं नवल नाहीं. पण फ्रेंच लोक आपल्याला माहीत नसलेले विषय शिकविण्यांत प्रवीण आहेत!" तो च हा मासला झाला. परशुरामाच्या एकवीस प्रयोगांचा अनुभव काय सांगतो? स्वरूप सांभाळल्याशिवाय विश्वरूप सांभाळतां येणार नाहीं. "तुझें आहे तुजपाशीं। परि तूं जागा चुकलासी॥"

# कांतायला लाग

हिंदुस्थानांत कापसाचे हिमालय आहेत. त्यांतून खादीची गंगा निर्माण करावयाची आहे. भगीरथ–प्रयत्नाशिवाय इच्छा सिद्ध होणार नाहीं. भगीरथाचें नांव काढल्यामुळें कदाचित आपला धीर खचून जाईल. खरोखर भगीरथाच्या नांवांत अद्‌भुत स्फूर्ति सांठविलेली आहे. पण आपण दुबळेपणाची मूर्ति बनलों आहों. त्यामुळें असल्या नांवानें आपल्या शरिरांत स्फूर्तीचा संचार होण्याऐवजीं भीतीचा संचार होतो. तप म्हटलें कीं आपल्याला ताप च भरतो. कित्येकांना तर संताप येतो. हा कलियुगाचा महिमा आहे. कलियुगांतील माणसें ठेंगणीं. त्यांच्या कल्पना ठेंगण्या. हिमालयाच्या उंचीला त्यांना दुरून नमस्कार करावासा वाटतो. पण कापसाच्या हिमालयाला लँकशायरमधून नमस्कार केल्या-मुळें आपल्या शरिरांतली ऊब च नाहींशी होत चालली आहे. म्हणून आतां जवळून नमस्कार करणें भाग आहे. पण हें व्हावें कसें ?

एक इलाज आहे. कलि–युगांत व्यक्तीची शक्ति गेली असली तरी संघांत शक्ति उरली आहे. ह्या संघाच्या शक्तीनें खादीची गंगा निर्माण करणें अशक्य नाहीं. तीस कोटींचा मनोरथ एकवटला तर एक भगीरथ पुरा पाडतां येईल. पांच माणसांचें कुटुंब धरल्यास सहा कोटि कुटुंबांत सहा कोटि चरखे चालू झाले म्हणजे काम होईल. पण हें तरी कसें जमणार ? ह्याला उत्तर 'स्व–रूप पहा' म्हणून गेल्या अंकांत दिलें च आहे. रात्रीं जगभर अंधार होतो. तो कसा दूर करतां येतो ? माझ्या घरांत दिवा लागला म्हणजे माझ्या दृष्टीचा अंधार गेला. आणि दृष्टीचा अंधार गेला म्हणजे सृष्टीचा हि गेला च.

"मीं एकट्यानें सूत नाहीं कांतलें म्हणून काय बिघडलें?" असें म्हणून भागत नाहीं. 'मी'च्या च अनेकवचनाला 'आम्ही' म्हणतात. एकेक वगळला म्हणजे सगळे वगळले जातात. राजाला यज्ञासाठीं पुष्कळ दुधाची जरूरी होती. त्यानें शहराच्या मध्यभागीं एक भलें मोठें भांडें उभें करून हरएकानें एकेक शेर दूध त्यांत ओतावें अशी दवंडी पिटवून दिली. एकानें विचार केला, "इतक्या सगळ्या लोकांचें दूध येणार आहे त्यांत मीं शेरभर पाणी टाकलें म्हणून काय होणार आहे?" त्यानें शेरभर पाणी टाकलें. दुसऱ्याला हि तो च विचार सुचला. त्यानें हि तसें च केलें. हा च कार्यक्रम सर्वांस पसंत पडून तें भांडें शुद्ध गंगाजळानें तुडुंब भरून गेलें.—तूं जर सूत कांतलें नाहींस तर ही च तऱ्हा होईल. म्हणून दुसरे आपला धर्म पाळोत किंवा न पाळोत, तुला तो पाळला च पाहिजे.

पाण्यांत लहानसा थेंब पडला कीं त्याच्या भोंवतीं एक वर्तुलाकार लाट उत्पन्न होते. समाजांत हि एखादा मनुष्य निरुत्साही बनला कीं त्याच्या भोंवतीं निरुत्साहाचें एक वर्तुळ तयार होतें. निरुत्साहाचीं जशीं वर्तुळें असतात तशीं उत्साहाचीं हि वर्तुळें असतात. पण गुलामांच्या मानसशास्त्रांत उत्साहापेक्षां निरुत्साहाची प्रचारक-शक्ति विशेष असते. कलि–युगांत रोग लवकर फैलावतो. योग फैलावत नाहीं. नळराजाचें सर्व शरीर स्वच्छ होतें. फक्त पाय तेवढे अस्वच्छ राहिले होते. त्यांतून च कलीनें आपला शिरकाव करून घेतला. कलि-युगाची वृत्ति 'दोष–चुंबक' असते. तूं जर सूत कांतलें नाहींस तर कलि तुझ्या द्वारानें समाजांत शिरेल. म्हणून तुला सावध राहिलें पाहिजे.

शिवाय माझें जेवण जसे दुसरे जेवूं शकत नाहींत तसें च माझें स्वराज्य दुसरे मिळवूं शकणार नाहींत. स्वराज्य हें ज्याचें त्यानें च मिळविलें पाहिजे. आप मेल्याशिवाय स्वर्ग दिसत नाहीं ही म्हण

स्वर्गाइतकी च स्वराज्याला हि लागू आहे. मला जें स्वराज्य पाहिजे त्याची साधना मी करणार नाहीं तर कोण करील? ज्याला रोग झाला त्यानें च औषध घ्यावयास नको काय? ऊठ तर मग. लेख पुरा करून आपला कांतायला लाग कसा!

---

# नाग–पंचमी

"मंगळवारीं नागपंचमी असल्यामुळें छापखान्याला त्यांनीं रजा दिली आहे. त्यामुळें महाराष्ट्र–धर्माची 'मॅटर' लवकर तयार करावी लागेल. कां उगीच छापखान्याला रजा दिली आहे, कांहीं समजत नाहीं बुवा? त्यांतून चारदोन मुसलमान कंपॉझिटर असते तरी बरें झालें असतें!"

"हिंदु-मुस्लिम-युनिटीचा हा फायदा हि बरा च मोठा आहे ह्यांत शंका नाहीं! पण छापखान्याला रजा 'उगीच' दिली कां म्हणतां? नागपंचमीचा सण फार महत्त्वाचा मानलेला आहे. कचेऱ्यांना, शाळांना–सगळीकडे च रजा देत असतात."

"अहो, शाळाचिळांना च रजा देतात असें नाहीं. शहाणपणाला हि रजा देतात."

"इतके उसळतां कां? 'महाराष्ट्र–धर्माच्या' अडचणीसाठीं दुनियेला दोष कायम्हणून?"

"काय सांगावें? बोलून चालून जो दुष्ट म्हणविला गेला, ज्याच्या नाशासाठीं जनमेजयाला 'सर्प–सत्र' करावें लागलें, दूध

पिऊन विष ओकण्याचा ज्याचा स्वभाव, त्याच्या पूजेचा स्वतंत्र दिवस आणि तेवढ्यासाठीं रजा!"

वरील संवाद इतिहासांतला नाहीं. पण तो इतिहासाला शोभण्या-सारखा आहे. 'साप' म्हटला कीं काप, अशी लोकांची वृत्ति बनली आहे. भुताखेतांच्या गोष्टीसारखा सापांच्या गोष्टींचा हि खास एक वर्ग आहे. कोंकणांत वगैरे सापांचा सुळसुळाट असतो. पण सापांच्या गोष्टींचा तर त्याहून विशेष च असतो. ब्रह्मविद्येप्रमाणें सर्पविद्येंत हि प्रत्यक्षापेक्षां शब्दप्रमाणाला अधिक मान आहे. सगळे च साप विषारी नसतात. आणि जे असतात त्यांत हि ज्यांच्या दंशानें मनुष्य हटकून मरावयाचा असे जहरविषारी थोडे. म्हणून च मांत्रिकांची चांगली सोय झाली आहे. त्यांतून सापाचा स्वभाव अतिशय भित्रा आहे. एखादा साप निघावा आणि त्याला मारण्यासाठीं पांचपंधरा माणसें काठ्याबिठ्यानिशीं सज्ज होऊन बाहेर पडावीं, हा देखावा पाहिला म्हणजे मनुष्याच्या अज्ञानाविषयीं आणि दीर्घद्वेषाविषयीं दया वाटते. साप विषारी असला तरी मनुष्याच्या मनांतला हा दीर्घद्वेष कमी विषारी नाहीं. त्याची सापाच्या विषारीपणावर ताण आहे.

हा दीर्घ–द्वेष उतरविण्यासाठीं नागपंचमीचा तोडगा आहे. श्रावणमहिना पावसाचा मुख्य महिना आहे. 'श्रावण–झडी'बरोबर सापाचा हि संचार सुरू होतो. पावसापासून बचाव व्हावा म्हणून बिचारा नाइलाजानें मनुष्याच्या घराचा आसरा घेऊं पाहतो. सापाला एकांतासारखें प्रिय कांहीं च नाहीं. मुमुक्षूला जनसमूह टाळण्याच्या कामीं सापाचें उदाहरण दिलें आहे. पण पावसाचा मार सहन न झाल्यामुळें अतिशय संकोच–वृत्तीनें केवळ 'अतिथि' म्हणून तो मनुष्याजवळ रक्षणासाठीं आलेला असतो. पुष्कळ वेळां अतिथीच्या रूपानें परमेश्वर भक्तांचें सत्त्व पाहण्यासाठीं येत असतो. त्यामुळें अतिथि–पूजा हें धर्माचें फार च मोठें कलम मानलेलें आहे. त्यांतून

आलेल्या अतिथीची जर दुष्टपणाबद्दल ख्याति असली तर ही आपल्या सत्त्वपरीक्षेची वेळ आहे अशी मनांत पक्की खूणगांठ बांधून ठेवावी. "समोरचा जर अतिशय दुर्जन असेल तर आपलें सर्व सौजन्य एकत्र करून त्याचा सत्कार करावा" हें तत्त्व ठसविण्यासाठीं नाग–पंचमीची योजना आहे. शहाणपणाला रजा देण्यासाठीं नाहीं.

सेंट फ्रान्सिस ऑव्ह ॲसिसी ह्यांचे विषयीं असें सांगतात कीं त्याच्या मांडीवर साप झोंप घेत असत. अहिंसेच्या उत्कर्षाचें हें उत्तम उदाहरण आहे. पण ज्यानें सापाच्या बिछान्यावर झोंप घेतली त्यानें अहिंसेच्या उत्कर्षाची कमाल दाखविली असें म्हटलें पाहिजे. भक्ताच्या लक्षणांत "जो लोकांचा कंटाळा करीत नाहीं आणि लोक ज्याचा कंटाळा करीत नाहींत" अशी गीतेनें दुहेरी कसोटी मांडली आहे. पैकीं "जो लोकांचा कंटाळा करीत नाहीं" ही कसोटी त्यांतल्या त्यांत सोपी म्हटली जाईल. कारण, ती आपल्या हातची दिसते. पण "लोक ज्याचा कंटाळा करीत नाहींत" ह्या कसोटीची कल्पना कठिण आहे. सेंट फ्रान्सिसच्या ह्या उदाहरणांत मुख्यतः पहिली कसोटी दाखविली आहे. शेषशायीच्या [illegible] दुसरीचें चित्र आहे. दोन्हीकडे 'नाग–पूजा' आहे. एकीकडे 'नागाची' पूजा केली आहे. दुसरीकडे 'नागानें' पूजा केली आहे. 'शान्ताकारं भुजग–शयनम्' हें नाग–पंचमीचें थोडक्यांत वर्णन आहे.

ज्याच्या डोक्यावर सापानें फणा धरून सावली केली तो चक्रवर्ती राजा होतो अशी कल्पना आहे. कां नाहीं होणार? सापाच्या सावलींत शान्ताकार–वृत्तीनें शयन करणारा पुरुष अहिंसेचा पुतळा च म्हटला पाहिजे. त्यानें नाग–पंचमीचा निरोप ऐकला आहे. त्याच्या हृदयांत प्रेमाचें साम्राज्य आहे. आणि हा तर सनातन सिद्धान्त समजला पाहिजे कीं ज्याच्या हृदयांत प्रेमाचें साम्राज्य आहे तो दुनियेचा

एक च एक राजा आहे. तो 'सर्वलोकैकनाथ' आहे. कारण, तो स्वतःचा नाथ आहे.

जो कोणी हें नाग-पंचमीचें रहस्य विचारपूर्वक ग्रहण करील त्याला सर्पाचें विष बाधणार नाहीं, त्याच्या हृदयांतील द्वेषभाव दूर होतील आणि त्याला स्वराज्याची प्राप्ति होईल. इति श्रीभुजग-शयनार्पणमस्तु ।

---

# कृष्ण-भक्तीचा रोग

दुनिया पैदा करावी अशी ब्रह्मदेवाला इच्छा झाली. त्याप्रमाणें आतां घडण व्हावयाची. इतक्यांत त्याच्या मनांत काय आलें कोण जाणें. त्याला वाटलें, "आपल्या कामांतील बरेंवाईट सांगणारा कोणी तरी असला तर मोठी मौज होईल." त्यामुळें आधीं त्यानें एक चांगला तरबेज टीकाकार बनविला. "ह्यापुढें मी जें काय घडून काढीन त्याची तपासणी करण्याचें काम तुझें" असा त्या टीकाकारास अखत्यार देण्यांत आला. इतकी तयारी झाल्यावर ब्रह्मदेवानें आपला कारखाना चालू केला. ब्रह्मदेव एक एक चीज बनवीत गेला आणि टीकाकार तिच्यांतली चूक दाखवून आपल्या जन्माचें चीज करूं लागला. टीकाकाराच्या चांचणीपुढें बिनचूक म्हणून कांहीं निघे च ना. "हत्तीला वर पाहतां येत नाही, उंट वर च पाहतो, गाढवांत चपळ-पणा नाहीं, माकड अचपळ" अश्या रीतीनें टीकाकाराची टांकसाळ सुरू झाली. तो आपला शेरे मारत गेला. ब्रह्मदेवाची अक्कल गुंग

झाली. तरी त्यानें शेंवटचा प्रयत्न करून पाहण्याचें ठरविलें. आणि कारागिरीची कमाल करून 'माणूस' घडून काढला. टीकाकार निरखून पाहूं लागला. अखेर चूक निघाली च. "ह्याच्या छातींत एक खिडकी पाहिजे होती. म्हणजे ह्याचे विचार सगळ्यांना समजले असते." ब्रह्मदेव म्हणाला, "तुला बनविलें ही च माझी एक चूक आहे. आतां मी तुला शंकराच्या ताब्यांत देतों."

ही एक जुनी गोष्ट कुठेंशी वाचलेली आहे. तिच्या विषयीं शंका घेण्याला फक्त एक च जागा आहे. ती ही कीं गोष्टींत सांगितल्याप्रमाणें हे टीकाकार शंकराच्या ताब्यांत गेलेले दिसत नाहींत. कदाचित ब्रह्मदेवाला त्यांची दया आली असेल. किंवा शंकरानें आपली शक्ति त्यांच्यावर चालविली नसेल. कसें हि असलें तरीं त्यांची जात आज बरी च फैलावली आहे एवढें मात्र खरें. गुलामगिरीच्या काळांत कर्तृत्व न उरल्यामुळें वक्तृत्वाला संधि सांपडते. कामाचें बोलणें खुंटलें की बोलण्याचें च काम! आणि बोलायला तरी रोज रोज नवीन विषय कोठून काढावयाचे? त्यामुळें एक सनातन विषय ठरवून टाकला: "निंदा-स्तुति जनांच्या। वार्ता वधू-धनांच्या." पण निंदा-स्तुति म्हटलें तरी त्यांत वांटणी समजावयाची आहे. निंदा म्हणजे पर-निंदा आणि स्तुति म्हणजे आत्म-स्तुति. ब्रह्मदेवानें टीकाकाराला बरें-वाईट पहावयाला सांगितलें होतें. त्यानें स्वतःचें बरें पाहिलें, ब्रह्मदेवाचें वाईट पाहिलें. मनुष्याच्या मनाची ठेवण च अशी चमत्कारिक आहे की दुसऱ्याचे दोष जसे त्याला ठळठळीत दिसतात तसे गुण दिसत नाहींत. संस्कृतांत 'विश्व-गुणादर्श-चंपू' म्हणून एक काव्य आहे. वेंकटाध्वरी नांवाच्या एका दाक्षिणात्य पंडितानें तें लिहिलें आहे. त्या काव्याची कल्पना अशी आहे कीं कृशानु आणि विश्वावसु नांवाचे दोन गंधर्व विमानांत बसून फिरत आहेत. आणि जें जें दृष्टीस पडलें त्याविषयीं चर्चा करीत आहेत. कृशानु दोष-दृष्टि आहे. विश्वावसु गुण-ग्राहक

आहे. दोघे आपआपल्या दृष्टीनें वर्णन करीत आहेत. 'गुणादर्श' म्हणजे 'गुणांचा आरसा' असें काव्याचें नांव ठेवून कवीनें आपलें 'निर्णायक मत' विश्वावसूच्या बाजूला दिलें आहे. तरी एकंदर वर्णनाची घाटणी अश्या थाटाची झाली आहे कीं शेंवटीं वाचकांच्या मनावर कृशानूच्या मताची च छाप पडते. गुण घेण्याच्या इराद्यानें लिहिलें तरी ही दशा. मग दोष पाहण्याची वृत्ति असती तर काय झालें असतें!

चंद्राप्रमाणें हरएक वस्तूला शुक्ल–पक्ष आणि कृष्ण–पक्ष आहेत. त्यामुळें टीकाखोर मनाला स्वैर–संचार करण्यास हरकत येण्यासारखी नाहीं. सूर्य दिवसां दिवाळी करीत असला तरी "रात्रीं अंधार च देतो" एवढया वाक्यानें त्या सर्व दिवाळीची होळी होऊं शकेल. त्यांतून अवगुण च घ्यावयाचा नियम ठरला म्हणजे दोन दिवसांमध्यें एक रात्र न दिसतां एका दिवसाभोंवतीं दोन रात्री दिसावयाच्या. मग अग्नीच्या ज्योतीकडे लक्ष न जातां धुरावरून अग्नीचें अनुमान करणारें न्यायशास्त्र निर्माण व्हावयाचें. भगवंतांनीं ह्या सर्व मौजा गीतेंत सांगितल्या आहेत. अग्नीचा धूर, सूर्याची रात्र किंवा चंद्राचा कृष्ण–पक्ष पाहणाऱ्या 'कृष्ण–भक्तांचा' त्यांनीं एक स्वतंत्र वर्ग केला आहे. दिवसां डोळे मिटले म्हणून अंधार आणि रात्रीं डोळे उघडले म्हणून अंधार. असा स्थित–प्रज्ञाच्या कार्यक्रमावरहुकूम ह्या लोकांचा हि कार्यक्रम आहे. पण भगवंतांनीं स्थितप्रज्ञाला मोक्ष दाखविला आहे तर ह्यांची रवानगी कपाळमोक्षाकडे केली आहे. पण इतकें झालें तरी हा संप्रदाय एखाद्या सांथीच्या रोगाप्रमाणें वाढत च चालला आहे. बुबुळें काळीं असल्यामुळें म्हणा किंवा काळया रंगांत आकर्षण अधिक असल्यामुळें म्हणा, काळी बाजू जशी आमच्या डोळयांत भरते तशी उजळ बाजू भरत नाहीं. अश्या स्थितींत हा सांप्रदायिक रोग कोणत्या औषधानें बरा होईल हें पाहून ठेवणें जरूर आहे.

पहिलें औषध म्हणजे चित्तांत मुरलेल्या ह्या 'कृष्ण-भक्तीला' बाहेरचा कृष्ण दाखवूं नये आंतला कृष्ण दाखवावा. जगांतला काळे-पणा पाहण्यास सवकलेल्या नजरेला आपल्या मनांतला काळेपणा दाखवावा. विश्वाचे गुण दोष परीक्षण करूं पाहणारा माणूस बहुधा स्वतःस निर्दोष मानून बसलेला असतो. हा त्याचा भ्रम दूर झाला म्हणजे त्याच्या परीक्षणाची नांगी आपोआप मोडून जाईल. बायबलच्या नव्या करारांत ह्याविषयीं एक सुंदर प्रसंग वर्णिला आहे.

कोणा बाईच्या हातून कांहीं दुर्वर्तन झालें असेल. त्याची चौकशी करून त्या बाईला योग्य न्याय देण्यासाठीं 'महाजन'–मंडळ बसलें होतें. श्रवणभक्त हि बरे च जमा झाले असतील हें सांगण्याची जरूर च नाहीं. पण त्या बाईच्या सद्भाग्यानें खिस्तदेवांना तेथें खेंचून आणलें होतें हें विशेष. पंचांनीं निकाल फर्माविला; "बाईनें घोर अपराध केला आहे. सर्वांनीं दगड मारून तिला शरिरांतून मुक्त करावें." निकाल ऐकतां च माणसाचे हात सरसावले. आणि आसपासचे दगड थरथर कांपूं लागले. खिस्तदेवांना त्या दगडांची दया आली. त्यांनीं उभें राहून सर्वांना एक च वाक्य सांगितलें; "ज्याचें मन अगदीं चोख असेल त्यानें पहिला दगड मारावा." मंडळी क्षणभर स्तब्ध राहिली. हळूं हळूं एकेक जण तिथून चालता होऊं लागला. शेवटीं ती अभागी बाई आणि खिस्तदेव दोघे च उरले. त्यांनीं तिला थोडा बोध करून प्रेमानें निरोप दिला.

ही आख्यायिका निरंतर ध्यानांत वागवावी. "कासया गुणदोष वानूं आणिकांचे । मज काय त्यांचें उणें असे !"

दुसरें औषध मौन. दुसऱ्याचा दोष दिसूं च नये ह्यासाठीं पहिलें औषध आहे. नजरचुकीनें दोष दिसल्यानंतर हें दुसरें औषध खास उपयोगाचें आहे. ह्यानें मनाची आंतल्या आंत तडफड चालेल,

दोनचार झोंपा कमी होतील. पण शेवटीं थकून जाऊन मन शांत होईल. तानाजी पडल्यावर मावळे लोक पळ काढणार असा रंग दिसूं लागला. तेव्हां ज्या दोराच्या मदतीनें ते गडावर चढले होते आणि ज्याच्या मदतीनें ते आतां उतरण्याचा प्रयत्न करणार होते तो दोर च सूर्याजीनें कापून टाकला. "तो दोर मीं मघां च कापून टाकला आहे" ह्या सूर्याजीच्या एका वाक्यानें लोकांत निराशेची वीरश्री संचरली आणि गड सर झाला. दोर कापून टाकण्याचें तत्त्वज्ञान फार च महत्त्वाचें आहे. त्याविषयीं निराळें च लिहावें लागेल. सध्यांचा मुद्दा इतका च कीं मौनानें दोर कापून टाकल्यारखें होतें. दुसऱ्याचा दोष पाहण्याचें विसरून तरी जा, नाहींतर तडफडत बैस अशी मनावर पाळी येते. आणि तसें झालें म्हणजे मग सगळा रस्ता सरळ होतो. कारण, ज्याला जगावयाचें असतें त्याला फार वेळ तडफडत बसणें सोयीचें होत नाहीं.

तिसरें औषध कर्म-योगांत गढून जाणें. ज्याप्रमाणें आज सूत कांतणें हा एक च असा उद्योग आहे कीं जो सरसकट सर्वांना पुरवितां येईल त्याप्रमाणें कर्म-योग हा एक च असा योग आहे कीं ज्याची सर्वसामान्य लोकांना बिनधोक शिफारस करतां येईल. किंबहुना सूत कांतणें हा च आजचा कर्म-योग आहे.

हा सूत कांतण्याचा कर्म-योग स्वीकारला म्हणजे लोकनिंदेच्या गोष्टी किसत बसण्याला अवकाश च राहत नाहीं. ज्याप्रमाणें शेतकऱ्याला धान्याच्या एकेक कणाची खरी किंमत समजते त्याप्रमाणें सूत कांतणाऱ्याला एक एक क्षणाचें महत्त्व कळतें. "रिकामा जाऊं नेदी क्षण" ही समर्थांची सूचना किंवा "क्षणार्ध देखील व्यर्थ घालवूं नये" हा नारदांचा नियम काय सांगत आहे हें सूत कांततांना अक्षरशः लक्षांत येतें. कर्मयोगाचें सामर्थ्य अजब असल्यामुळें त्यावर जितका जोर देतां येईल तितका थोडा. ही मात्रा अनेक रोगांवर लागू आहे; पण ज्या

रोगाची उपाययोजना आतां चालली आहे त्यावर तिचा अद्भुत गुण अनुभवलेला आहे.

तीन औषधें सांगितलीं. तिन्ही औषधें रोग्याच्या तोंडाला कडू तर लागतील; पण तीं परिणामीं अतिशय मधुर आहेत. आत्मपरीक्षणानें मनाचा, मौनानें वाणीचा आणि कर्म-योगानें शरिराचा दोष झडून गेल्याशिवाय आत्म्याला आरोग्य मिळणार नाहीं. एवढयासाठीं औषध कडू म्हणून सोडतां येत नाहीं. शिवाय हें औषध मधांतून घ्यावयाचें आहे. त्यानें कडूपणा जिरून जाईल. सर्वाभूतीं भगवद्भाव हा मध आहे. त्यांत ह्या तीन मात्रा उगळून घ्याव्या म्हणजे सगळें च गोड होईल.

---

# देहपूजेची दास्यभक्ति

मराठी साहित्यसंमेलन यंदां नागपुरास भरणार आहे. इतर भाषांचीं हि साहित्यसंमेलनें भरतात. पण तीं प्रायः वार्षिक असतात. आमचें साहित्यसंमेलन अनियत-कालिक आहे. ह्याचें कारण असें सांगण्यांत येतें कीं महाराष्ट्र गरीब आहे. पण हें कारण योग्य दिसत नाहीं. अनियमितपणा, चेंगटपणा इत्यादि गुणांची गरिबीपेक्षां श्रीमंतीशीं च खास दोस्ती आहे. शिवाय हें कारण योग्य म्हणावें तर पंढरीची बारी कशी नियमित भरत असते? तेथें गरिबी कां आड येत नाहीं? त्यांतला मुद्दा असा आहे कीं पंढरीचा देव पुंडलिकानें मांडून दिलेल्या विटेवर भक्तांची वाट पाहत तिष्ठत उभा आहे. "काळी घोंगडी काळी काठी। काळा दोरा कंठीं॥ बोली महाराची थेट मराठी।....॥"

असा त्याचा थाट आहे. तो भाजीच्या पानावर राजी आहे. त्यामुळें त्याला नियमितपणा साधतो. आणि साहित्यसंमेलनाचा देव आहे 'वक्रतुंड महाकाय'. त्याच्या हातीं 'मोदकांची वाटी' दिली तरी त्याचें तोंड वांकडें तें वांकडें च. शिवाय भक्तजनांनीं दिलेल्या मोदकांच्या वाट्या खाऊन खाऊन त्याचें पोट विशाळ झालेलें. त्यामुळें त्याला नियमितपणा साधणें जड जातें. पंढरीच्या वारीला नियमितपणा साधला तरी साहित्य-संमेलनाच्या स्वारीला तो साधणें वरील स्थितींत शक्य च नाहीं. ह्यावर कोणी असा आक्षेप घेईल कीं—"विठोबाशीं तुलना करतांना गणपतीला निष्कारण मार बसला आहे. गणपति 'वक्रतुंड महाकाय' असला तरी वर दाखविलेली उपपत्ति नीट नाहीं. आपले भक्त गरीब म्हणवितां म्हण-वितां गब्बर होऊन बसले आणि मीठभाकरीच्या नांवानें मोदकांचा संहार करूं लागले ह्याचा तिटकारा येऊन त्याचें तोंड वाकडें झालें आहे. आणि इतकें असून भक्तांचे अपराध पोटांत घालण्याचें ब्रीद स्वीकार-ल्यामुळें पोट विशाळ बनलें आहे." हा आक्षेप अगदीं खरा आहे. विठोबा किंवा गणपति ह्यांत कांहीं च फरक नाहीं. फरक त्यांच्या भक्तांत आहे. पण 'शिष्यापराधे गुरोर्दण्डः।' ह्या न्यायानें गणपतीवर आळ आला. तो हि पोटांत घालणें त्याला सहज च शक्य आहे.

एक काळ असा होता कीं ज्या वेळेस गरिबी हा विद्वान लोकांचा बाणा होता. कार्लाईलनें म्हटल्याप्रमाणें तो विद्वान लोकांचा पवित्र अधिकार मानला जात होता. समाजाची ज्यास्तींत ज्यास्त सेवा करून समाजापासून कमींत कमी दक्षिणा घ्यावयाची अशी त्याची वृत्ति होती. पण आज उलट स्थिति आहे. आज विद्वानांची विद्या लिलावांत निघाली आहे. "माझा मुलगा इतकें शिकला आहे त्या अर्थीं त्याला इतका हुंडा पाहिजे" असें कोष्टक तयार झालें आहे. मुलगा शिकला कीं विकला च. कलकत्त्याच्या विश्वविद्यालयांत 'पोस्ट ग्रॅज्युएट क्लासेस' म्हणजे बी. ए.च्या पुढचें शिक्षण देणारे वर्ग काढले. पण ह्या अति-

शहाण्या शिक्षणाचा बैल रिकामा राहण्याची पाळी आली. अतिशहाणें शिक्षण द्यावयाचें म्हणजे अध्यापक विद्वत्तेचे 'आल्प्स' लागतात. हे आल्प्स फार महाग पडतात. गरीब गांजलेली प्रजा ह्यांच्या भाराखालीं चिरडून जाते.

अति-शिक्षण घेणारे विद्यार्थी फार च थोडे असावयाचे आणि तेवढ्यासाठीं इतके महाग अध्यापक ठेवावयाचे. गरीब हिंदुस्थानला हें कसें झेंपणार? जो जितका अधिक विद्वान तितका तो अधिक निरपेक्ष अशी जुनी पद्धत होती. त्या वेळीं असा पेंच खडा होत नसे. चारदोन विद्यार्थी घेऊन एखादा विद्वान त्यांच्यावर अतिशिक्षणाचीं पुटें चढवूं लागला तरी समाजाला त्यांत तकरार करण्यासारखें नव्हतें. कारण, विद्वान लोक बाजारभावांत सांपडले च नव्हते. अश्यांना पूर्वी 'ब्राह्मण' म्हणत. त्यांचा समाजाला भार वाटत नसे. आभार वाटे. आजची ब्राह्मणांची स्थिति "झालें लोभाचें मांजर। भीक मागे दारोदार" अश्यासारखी बनली आहे. त्यामुळें ब्राह्मण शब्दाचा अर्थ बदलून गेला आहे. श्रीमंतांच्या घरीं ब्राह्मण 'ठेवलेला' असतो.

हे ब्राह्मणांचे ठेवे श्रीमंतांना परवडले तरी गरिबांना कसे परवडतील? कलि-युगांत क्षत्रिय आहेत ही गोष्ट आतां 'सिद्ध' करण्यांत आली आहे. ब्राह्मणांचें अस्तित्व तर 'सिद्ध च' आहे म्हणतात. पण जोंपर्यंत ब्राह्मण्याची बैठक पैश्यावर बसली आहे तोंपर्यंत हें 'सिद्ध' काय कामाचें? साहित्य-संमेलनाची बैठक ही ब्राह्मण्याची बैठक नव्हे असें कोण म्हणेल? पण तिथें 'तांदुळाचें प्रस्थ' आहे. पंढरीची वारी उपवासावर उभी आहे. आणि साहित्य-संमेलन तांदुळावर बसलें आहे. ज्वारीची भाकर देखील चालत नाहीं.

साहित्य-संमेलनाच्या दोन बैठकी बडोद्यास झाल्या. ह्याचें कारण असें सांगतात कीं बडोद्यास महाराजांच्या कृपेनें 'साहित्य' चांगलें मिळालें.

म्हणजे 'ब्राह्मण' शब्दाप्रमाणें 'साहित्य' शब्द हि आम्हीं बडोद्याला जाऊन बाटविला. त्या प्रसंगीं "पंडित, वनिता आणि लता आश्रयाशिवाय शोभत नाहींत" अश्या अर्थाच्या एका संस्कृत वचनाचें आवाहन करण्यांत आलें होतें. आम्हांला भोजराजाच्या दरबारचें भोजन फार आठवतें. म्हशीपुढें आंबोण ठेवलें म्हणजे म्हैस दूध देते. तश्या रीतीनें आम्ही साहित्य देणार असलों तर तें साहित्य घेऊन समाजाला काय उपयोग? त्यानें दास्यभक्तीचा मात्र प्रचार होणार. राष्ट्राला आज सख्य-भक्तीची भूक लागली आहे. गुलामाचें नातें तोडून मित्राचें नातें जोडण्यासाठीं राष्ट्र चळवळ करीत आहे. राष्ट्र सख्य-भक्तीची कणखर भाकर मागत आहे. त्याला दास्य-भक्तीचा गुरगुट्या भात नको आहे. साहित्याचें साध्य काय असावें असा कांहीं वर्षांपूर्वीं विद्वान लोकांत प्रश्न निघाला होता. जुने गुरु म्हणाले, 'देव-पूजा'. नवीन गुरु म्हणाले, 'देश-पूजा.' विद्वान शिष्यांनीं ऐकलें 'देह-पूजा!' देह-पूजा साध्य आणि दास्य–भक्ति साधन हे दोन सिद्धान्त कायम केले म्हणजे साहित्याची काय व्याख्या होईल? असल्या साहित्याचीं संमेलनें अनियमित भरलीं म्हणून काय बिघडलें? आणि मुळीं च न भरलीं म्हणून तरी काय बिघडलें? घरीं लक्ष्मी चालून आली असतां

"दिवट्या छत्री घोडे। हें तो बऱ्यांत न पडे॥
आतां येथें पंढरीराया। मज गोंविसी कासया॥"

अश्या प्रकारें ज्यांनीं देवाची कळकळून प्रार्थना केली, झोळींत राज्य येऊन पडलें असतां ज्यांनीं त्याची किंमत एका लंगोटीबरोबर मानली, ते आमच्या साहित्याचे आचार्य होते ही गोष्ट आम्हीं नित्य मनांत वागविली पाहिजे.

'सहित' म्हणजे 'संगतीनें चालणारें' ह्यावरून 'साहित्य'-शब्द बनला आहे. साहित्याची राष्ट्राच्या उज्ज्वल आकांक्षेशीं संगति

पाहिजे. त्यानें राष्ट्रीय मनोगत बोललें पाहिजे. तर च तें साहित्य. पण आज राष्ट्रीय चळवळीचें पाऊल पूर्वेकडे तर साहित्यसंमेलनाचें पाऊल पश्चिमेकडे अशी दशा आहे. इकडे काँग्रेसनें एक कोट रुपये टिळक-स्वराज्य-फंड जमविला आणि तिकडे साहित्य-संमेलन 'राजाश्रय, राजाश्रय' करीत बडोदें-सरकारच्या गळीं पडलें. इकडे सरकारी शाळांवर बहिष्कार पुकारला, तिकडे मुंबई-विश्वविद्यालयाच्या सर्व परीक्षांत मराठीला ओसरी मिळावी अशी भीक मागण्यांत आली. ही केव्हांची गोष्ट? अमदाबादची इतिहासप्रसिद्ध काँग्रेस भरण्याच्या नुकती च पूर्वीची. राष्ट्र गौरी-शंकरची उंची मोजूं पाहत होतें आणि साहित्य-संमेलन पॅसिफिक महासागराच्या खोलीचा ठाव घेत होतें! न्यायमूर्ति रानडे ह्यांनीं विश्वविद्यालयांत मातृ-भाषांचा प्रवेश व्हावा म्हणून खटपट केली होती. त्या वेळीं तें शोभलें. पण पाव शतकानंतर राष्ट्रीय ध्येयांत जमीनअस्मानाचा फरक झाला असतां रानड्यांचें अनुकरण करण्यानें साहित्य-संमेलनाची शोभा झाली. 'बाळ्या' नुकता च बोलूं लागला म्हणजे त्याचे 'मृदुमधुर बोल' ऐकून बापाला धन्यता वाटते. आणि तो त्याच्या चुरचुरीत बोलण्याचें कौतुक हि करतो. पण तो च वीस वर्षांचा 'बाप्या' झाल्यावर कामधंदा न करतां जुना च उद्योग चालवील तर "तुजसम आम्नाय बोलका नाहीं" म्हणून बाप त्याची प्रशंसा करील काय? आमच्या साहित्य-संमेलनांत लोकमान्य टिळक बोलत असतां 'राजकारणाचा उल्लेख आणूं नका' म्हणून त्यांना अध्यक्षांकडून सूचना मिळाली होती! साहित्य-संमेलनानें राष्ट्रीय चळवळीचा संबंध टाळणें म्हणजे वर्तमानपत्राच्या कागदानें ठश्यांचा संबंध टाळण्यासारखें आहे. कोणी म्हणतील, "साहित्याचा संबंध वाङ्मयाशीं म्हणजे शब्द-सृष्टीशीं आहे." कबूल. पण शब्द म्हटला तरी त्याला कांहीं अर्थ असतो च कीं नाहीं? कीं अर्थापासून शब्दाची फारकत होऊं शकते? आणि शब्दाचा च जप करावयाचा

म्हटलें तरी 'राजाश्रय' शब्दाचा च जप कां करावा? 'स्वाश्रय' शब्दाचा कां करूं नये?

सर्व शास्त्रांचे स्वतंत्र विषय असतात. तरी त्यांनीं धर्माशीं अविरोधवृत्तीनें वागलें पाहिजे असा कायदा आहे. गणित-शास्त्रानें प्रमाण-भाग शिकवितांना "अमुक इतक्या दुधांत किती पाणी मिसळावें म्हणजे अमुक टक्के नफा होईल?" असलीं उदाहरणें देऊं नयेत. व्याकरणानें रूपें शिकवितांना 'रामः रामौ रामाः' च्या ऐवजीं 'नृपः नृपौ नृपा:' अशी राजनिष्ठा दाखवूं नये. तर्कशास्त्रानें "आत्म्याच्या अस्तित्वाविषयीं पुरावा नाहीं" असलें तर्कट चालवूं नये. अलंकार-शास्त्रानें उपमा, रूपक वगैरे समजावून सांगण्याच्या मिषानें स्त्रियांचें लावण्य वर्णन करूं नये. अर्थ-शास्त्रानें संपत्तीचें विवेचन करतांना "गिऱ्हाइकाच्या अडचणीचा फायदा घेऊन ज्यास्तींत ज्यास्त किंमत आकारावी" असा नियम घालून देऊं नये. कृषि-शास्त्रानें अफूची किंवा तंबाखूची पैदास कशी वाढवितां येईल ह्याविषयीं डोकें चालवूं नये. सारांश, सर्व च शास्त्रांनीं धर्माच्या सार्वभौम सत्तेखालीं नांदलें पाहिजे. तो च नियम साहित्याला हि लागू आहे. साहित्य 'कसें' ह्यापेक्षां साहित्य 'कशाचें' हा प्रश्न महत्त्वाचा आहे. साहित्य प्रभूच्या गुणवर्णनाचें. साहित्य देशाच्या सेवेचें. साहित्य दुःखितांच्या कळवळ्याचें. साहित्य स्वतंत्रतेच्या पूजेचें. हें साहित्य किती हि साधेंभोळें असलें तरी धर्माला मान्य आहे. उलट पक्षीं दास्यभक्तीचें साहित्य, देहपूजेचें साहित्य, राजाश्रयाचें साहित्य—मग तें किती हि नखरेबाज असो—धर्माला मान्य नाहीं. राष्ट्रांत शिवीगाळीचा प्रचार चालला असतां "शुद्ध शिव्या कां बोलाव्या आणि शुद्ध शिव्या कशा लिहाव्या" तसें च "ह्या शिव्या शुद्ध कां आणि ह्या शिव्या अशुद्ध कां" असल्या चर्चेची जरूर नाहीं. अशुद्ध च कां होई ना, पण सभ्य कसें बोललें किंवा लिहिलें जाईल हा विचार पाहिजे. हिंदुमुसलमानांत विद्वेष उत्पन्न

करणारें साहित्य पसरत आहे. त्याला आळा कसा घालावा ह्या यक्ष-प्रश्नाचें उत्तर साहित्य–संमेलनानें दिलें पाहिजे. आजपर्यंत साहित्य कसें असावें ह्याची चर्चा पुष्कळ झाली आहे. आतां साहित्य कश्याचें असावें ह्याचा निर्णय साहित्य–संमेलनानें करणें जरूर आहे. नागपूरच्या साहित्य–संमेलनासाठीं एवढा विषय सुचवून आणि विद्वज्जनांची क्षमा मागून सध्यां येथें च संपवितों.

---

# चरख्याचे सहचारी भाव

जुन्या काळची गोष्ट आहे—"कोणी एक सत्यवचनी शुद्ध मनाचे साधु पुरुष एका अरण्यांत तपश्चर्या करीत होते. त्यांच्या शांत तपश्चर्येच्या प्रभावानें त्या अरण्यांतील पशु–पक्षी देखील आपआपसांतलें वैर विसरून गेले होते. त्यामुळें त्या सर्व अरण्याला एखाद्या आश्रमाचें रूप आलें होतें. जेथें अरण्यांतल्या सिंहाचें च आसन बदललें तेथें इंद्राचें 'सिंहासन' डळमळूं लागलें असल्यास नवल नाहीं. त्यानें साधूची तपश्चर्या हाणून पाडण्याचा निश्चय केला. तो हातांत तलवार घेऊन योद्ध्याच्या वेषानें त्या साधूजवळ आला आणि विनवूं लागला, 'माझी एवढी तलवार आपण सांभाळून ठेवा.' साधूला काय वाटलें कोणास ठाऊक ? त्यानें ती विनंती मान्य केली. तेव्हां इंद्र तेथून निघून गेला. साधूनें तलवार सांभाळण्याची जबाबदारी स्वीकारली होती. त्यामुळें सदासर्वदा तो ती तलवार आपल्यापाशीं च राखत असे. देवपूजेसाठीं फुलेंवगैरे आणावयास निघाला तरी तलवार जवळ असावयाची च.

मूळ, विश्वासावर तलवार दिली होती, त्यांतून पुढें तलवारीवर विश्वास उत्पन्न झाला. तलवारीच्या नित्य सहवासानें तपावरची बुद्धि न कळत उडून गेली. साधु क्रूर बनला. इंद्राचें सिंहासन निर्भय झालें आणि अरण्यांतल्या हरिणांचें आसन कांपूं लागलें."

दंडकारण्यांत फिरत असतां रामचंद्राच्या हातून हिंसा होऊं नये म्हणून सीतादेवीनें ही सुंदर गोष्ट त्यांना सांगितली होती. प्रत्येक वस्तूबरोबर तिचे सहचारी भाव येत असतात हें ह्या गोष्टीचें तात्पर्य आहे. सूर्याभोंवतीं जसे किरण तसें वस्तूच्या भोंवतीं तिचे सहचारी भाव असतात. चरख्याचा सार्वत्रिक प्रसार झाला कीं स्वराज्य मिळालें च असें आपण म्हणतों. पुष्कळांना ह्याचा अर्थ कळत नाहीं. ह्याचें कारण चरख्याचे सहचारी भाव त्यांच्या लक्षांत येत नाहींत. घरांत एक चरखा दाखल झाला म्हणजे त्याच्याबरोबर तो किती भावना आणतो ह्याची आम्हांस कल्पना नाहीं. विजेचा संचार झाल्याप्रमाणें एका क्षणांत सगळें वातावरण बदलून जातें. राजा बाहेर निघाला म्हणजे 'राजाची स्वारी' बाहेर निघाली असें आपण म्हणतों. चरखा घरांत शिरला म्हणजे चर-ख्याची स्वारी घरांत शिरते. ह्या स्वारींत कोण कोण सरदार सामील झाले आहेत ह्याचा विचार केला म्हणजे "चरख्यानें स्वराज्य" ह्या म्हणण्यांतला मतलब समजेल.

परवां एक धनिक गृहस्थ—ज्यांनीं कॉंग्रेसच्या नियमाप्रमाणें नुकता च चरखा सुरू केला आहे—आपला चरख्याविषयींचा अनुभव सांगत होते–"माझ्या मनांत पूर्वीं भलभलते विचार येत असत. चरखा सुरू केल्यापासून हे विचार आपोआप कमी झाले आहेत. मध्यें एकदा वाटलें, मोठमोठे लोक मोटर राखतात, आपण हि एक मोटर घ्यावी. पण लागलीं च असा विचार आला कीं एकीकडे आपण चरखा कांतावा आणि दुसरीकडे मोटरच्या पायीं परदेशाची भर करावी हें बरें नाहीं. त्यांतून आपलें मोटरवांचून कांहीं अडलें आहे असें नाहीं." हा कांहीं एकट्या

दुकट्याचा अनुभव नाहीं. पुष्कळांचा असा च अनुभव आहे. चरख्याचे जे अनेक सहचारी भाव आहेत त्यांपैकीं गरिबांविषयीं सहानुभूति, गरिबीची कदर किंवा आवड हा एक महत्त्वाचा भाव आहे. गरिबा-अमिरांची एकी करण्याचें सामर्थ्य चरख्याइतकें दुसरें कश्यांत नाहीं. 'गरीब विरुद्ध अमीर' हा झगडा सगळया जगाला गिळून टाकीत आहे. तो झगडा मिटविण्याची ताकत चरख्यांत आहे. गरीब–अमीर एक झाले तर स्वराज्य मिळणार नाहीं काय?

आजच्या आपल्या समाजाचीं आंधळा मजूर आणि पांगळा पंडित अशीं दोन शकलें झालीं आहेत. सुशिक्षितांत स्वराज्याविषयीं वृत्ति आहे पण कृति करण्याची शक्ति नाहीं. अशिक्षितांत कृति करण्याची थोडीफार शक्ति आहे तर वृत्ति नाहीं. ह्या आंधळ्या-पांगळ्यांची जोड जमविण्याचें सामर्थ्य चरख्यांत आहे. चरखा म्हणजे एक साधी वस्तु वाटते. आणि आहे हि. पण तेवढया साध्या च वस्तूसाठीं सुतार, लोहार, महार ह्यांच्या पायांशीं बसावें लागतें. माझ्या धाकट्या भावाला मीं सुताराच्या हाताखालीं काम शिकण्यासाठीं ठेवलें होतें. सुतार मोठया अदबीनें शिकवीत असे. पण कांहीं दिवसांनंतर त्याच्या लक्षांत आलें कीं आपला शिष्य जरी इतर बाबतींत विद्वान असला तरी ह्या कामांत तो मठ्ठ आहे. तेव्हां त्रासून जाऊन "इतकें सांगितलें तरी 'तुला' कसें समजत नाहीं?" असें तो त्याला म्हणाला. सुरवातीसुरवातीला तो 'तुम्ही' म्हणत असे. पण मुरवत कमी होऊन जेव्हां त्याच्या तोंडून 'तूं' हा उद्गार निघाला त्या वेळीं मला आनंद झाला. स्वराज्य जवळ आलें असें वाटल्याशिवाय राहिलें नाहीं. मी एकदा चरखा कांतीत होतों. एक महार विणकर मला भेटावयास आला होता. हा हि योग चरख्याच्या चळवळीशिवाय आला नसता. मी सूत कांतीत च होतों. आणि त्याच्याशीं बोलत होतों. चातींत कांहीं दोष होता त्यामुळें उत्तम कांतलें जात नव्हतें. त्या महाराच्या हें ताबड-

तोब लक्षांत आलें आणि काय दोष आहे तो त्यानें मला दाखविला. माझ्यासारख्या 'विद्वानाला' शिकविण्याचा त्याला किती आनंद वाटला असेल ! आणि त्यायोगानें आम्ही एकमेकांच्या किती जवळ आलों असूं? सुशिक्षित आणि अशिक्षित एक झाले तर स्वराज्य मिळणार नाहीं काय ?

आज हिंदु-मुसलमानांच्या झगडयाचा प्रश्न मोठा बिकट होऊन बसला आहे. माझ्या समजुतीनें हा हि प्रश्न सोडविण्याची सोय चरख्यांत आहे. प्रत्येक मशिदींत आणि मंदिरांत जर चरख्याचा प्रवेश झाला तर सर्व भांडणें मिटतील. अर्थात आजच्या स्थितींत हें होण्याला हि अवांतर गोष्टींची मदत लागेल. पण चरखा कांतणारा कोणी हि हिंदु किंवा मुसलमान एकमेकांचीं डोकीं फोडण्याला सहसा तयार होणें शक्य नाहीं ही वस्तु निश्चित आहे. ज्याप्रमाणें तलवारीच्या सहवासानें मनुष्य हिंसक बनतो त्याप्रमाणें चरख्याच्या सहवासानें तो शांत बनतो. शांति किंवा अहिंसा हा चरख्याचा सहचारी भाव आहे. समाजांत शांति आणून हिंदु-मुसलमानांतील झगडे मिटले तर स्वराज्य मिळणार नाहीं काय ?

× × ×

चरख्याच्या सहचारी भावांचें यथातथ्य स्वरूप लिहितां येण्यासारखें नाहीं. लिहिलें तर नुसतें वाचून कळणारें नाहीं. साक्षात चरख्याशीं च दोस्ती केली पाहिजे. चरख्याची दोस्ती जमली म्हणजे तो स्वतः च सगळें सांगतो. एकदा त्याची संगीत-मधुर वाणी कानावर आली कीं नष्ट शंका केव्हां च पळ काढतात. म्हणून हा लेख पुरा करण्याच्या भानगडींत मी पडत नाहीं. वाचकांनीं त्याचा राहिलेला भाग चरख्यांतून कांतून घ्यावा अशी विनंती आहे.

# स्वच्छतेचें इंद्रिय आवरा

इंद्रियांचीं तोंडें बाहेर आहेत. त्यामुळें त्यांचें पाहणें आंतल्या बाजूस होऊं च शकत नाहीं. डोळ्यांतल्या बाहुलीला बाहेरची दुनिया लख्ख दिसते. पण आंत सगळा अंधार असतो. आंतल्या गुहेचें दर्शन तिला नाहीं. कान बाहेरचे सूर ऐकण्यास सताड उघडे असतात. पण आंतला आवाज ऐकण्याच्या कामीं ते तितके च मिटलेले असतात. हा इंद्रियांचा स्वभाव ओळखून शहाणे लोक इंद्रियांच्या पाहण्यावर भरवसा ठेवीत नाहींत.

पण ज्या लोकांचें मन इंद्रियांच्या मागें धावत असतें त्यांच्या मनाला हि इंद्रियांप्रमाणें बाहेरचें वळण लागतें. आणि एकदा विचार करण्याचें च इंद्रिय बहिर्मुख बनलें म्हणजे मनुष्याची हालत डोळे असून आंधळा किंवा कान असून बहिरा अश्यासारखी होऊन बसते. वस्तूचा वरवरचा आकार त्याला दिसतो. पण अंतरंगाला तो पारखा होतो. आजचा आपला समाज बहुतेक अश्या जातीचा आहे. त्याचें एकंदर देखणें च बावरलें आहे. त्यामुळें बरें आणि वाईट ह्यांतला फरक समजण्याइतका हि विवेक त्यांत उरलेला नाहीं.

परवां दिल्लीहून येतांना रस्त्यांत एका माणसाशीं अंत्यजांच्या सवालाविषयीं बोलणें निघालें होतें. त्याचें म्हणणें होतें : "दुसरीकडे तर ठीक आहे पण देवळांत अंत्यजांचा शिरकाव होणें नीट दिसत नाहीं. देवळांची पवित्रता कायम राखली च पाहिजे." मीं त्यांना बरें च समजावून सांगितलें. शेंवटीं ते समजले. पण देवळांच्या बाबतींत असा च विचार पुष्कळांच्या मनांत येत असतो. ह्याचें कारण काय ? ह्याचें कारण पवित्रतेविषयींची चुकीची कल्पना. ती तरी कश्यामुळें झाली ?

जीवनांतून पवित्रता नष्ट झाली आणि पवित्रतेची 'कल्पना' करण्याची पाळी आली म्हणून. ही कल्पना करणार कोण? इंद्रियांचा गुलाम बनलेलें मन.

ह्या मनाची पवित्रतेची कल्पना बाह्य स्वच्छतेच्या पलीकडे जात नाहीं. वास्तविक स्वच्छता म्हणजे पवित्रतेच्या ग्रंथाचें बाइंडिंग आहे. स्वच्छतेवरून पवित्रतेचा अंदाज करणें म्हणजे बाइंडिंग पाहून ग्रंथावर अभिप्राय देण्यासारखें आहे. बहुतकरून स्वच्छता आणि पवित्रता जोडीनें जातात हें कांहीं खोटें नाहीं. पण कधीं कधीं ह्यांची जोडी कुस्तीची असते हें हि विसरून चालणार नाहीं. स्नान केल्यानें शरीर स्वच्छ होतें, शरीर साफ झालें म्हणजे मनांत हि चांगले विचार येण्याचा 'संभव' असतो आणि म्हणून स्नान पवित्र म्हणावयाचें. बाकी, स्नानाचा पवित्रतेशीं सरळ संबंध नाहीं. स्वच्छतेच्या जितक्या क्रिया आहेत त्या सर्वांचें असें च आहे. जोंपर्यंत स्वच्छतेचा पवित्रतेशीं मेळ असतो तोंपर्यंत स्वच्छतेचें म्हणणें ऐकण्यास हरकत नाहीं; नव्हे, ऐकणें जरूर आहे. पण ज्या वेळीं त्यांच्यांत मेळ नसतो, किंबहुना उभा दावा सुरू होतो, त्या वेळीं स्वच्छतेला समाधि देऊन पवित्रतेचें समाधान करावें लागतें. अशा प्रसंगीं स्वच्छतेला फाजील ताणून धरणें अधर्म होय.

आईला कॉलरा झाला आहे. रोज पंचवीस पंचवीस वेळ शौचाला होत आहे. तिची सेवा करण्यानें मी किती हि काळजी घेतली तरी थोडाबहुत अस्वच्छ होईन हें उघड आहे. पण म्हणून मी अपवित्र होईन काय? तिची सेवा करण्यानें मी अपवित्र होणार नाहीं च पण उलट सेवा न करण्यानें मी अपवित्र होईन. अशा प्रसंगीं अस्वच्छता पत्करणें हा माझा धर्म नव्हे काय? हें उदाहरण अगदीं टोंकाचें आहे असें कोणास वाटेल. पण स्वच्छता आणि पवित्रता ह्यांच्यांतला संबंध समजण्यास तें उपयुक्त आहे. स्वच्छतेचें इंद्रिय चवचाल करून ठेवल्यानें कसा अनर्थ होऊं शकतो ह्याची कल्पना ह्या उदाहरणावरून होऊं शकेल

अंत्यज म्हणजे अस्वच्छ असें कांहीं समीकरण नाहीं. कांहीं अंत्यजांची राहणी अशी पाहिली आहे कीं त्यांच्या मानानें कित्येक वरिष्ठ वर्गांतल्या लोकांची राहणी ओंगळ म्हणावी लागेल. तुळशीची पूजा करणारे अंत्यज आहेत. नागपूरप्रांतांतून जितके महार पंढरीला जातात तितके इतर लोक जात नाहींत. ह्यांच्या पैकीं पुष्कळांनीं दारू व मांस अजीबात सोडलेलें आहे. एकादशीचा उपवास करणारे पुष्कळ अंत्यज आहेत. माझ्या ओळखीच्या एका अंत्यजानें आपल्या मुलीचें नांव च 'एकादशी' ठेवलें आहे. अजामिळानें आपल्या मुलाचें नांव नारायण ठेवलें होतें. त्या नांवानें अजामिळ तरल्याची कथा हजारों वर्षें हिंदु–समाज गात आहे. नांवांत संस्कृति लपलेली असते. 'एकादशी' ह्या नांवांतली संस्कृति किती पवित्र, काव्यमय, संयमशील आहे! ज्या एकादशीची गोष्ट मी सांगत आहें तिनें पंढरीच्या विठोबाचें दर्शन केलें आहे. दर्शन म्हणजे 'दुरून' दर्शन हें सांगावयास नको च. कारण, एकादशीला विठोबाच्या मंदिरांत प्रवेश कोठून मिळणार? इतकी थोर संस्कृति ज्या लोकांत आहे त्यांना अस्पृश्य मानण्यापेक्षां स्वच्छतेचें इंद्रिय संयमांत राखणें योग्य नव्हे काय?

बरें, सगळे अंत्यज अस्वच्छ असतात असें मानलें तरी त्याची जबाबदारी बरीचशी उच्च वर्णांवर च आहे. त्यांना दूर ठेवल्याचा हा उघड परिणाम आहे. तेव्हां आज ही अस्वच्छता दूर करण्याला त्यांना जवळ करणें हें च साधन आहे. "लायक व्हा म्हणजे स्वराज्य देऊं" असें इंग्रज आपणांस म्हणतो. "स्वच्छ व्हा म्हणजे अस्पृश्यता काढून टाकूं" असें आपण अंत्यजांना म्हणतों. ह्या दोन्ही म्हणण्यांत काय फरक आहे? टिळक म्हणत असत कीं शंभर वर्षें इंग्रजांच्या राज्यांत राहून सुद्धां जर आम्हांला स्वराज्याची लायकी आली नसली तर हा इंग्रजांच्या राज्य करण्याच्या नालायकीचा पुरावा आहे. तें च म्हणणें अंत्यजांतर्फे म्हणतां येईल. म्हणून अंत्यजांची अस्वच्छता दूर करण्याची

खरी कळकळ वाटत असली तर अस्पृश्यता काढून टाकली पाहिजे.

लोक म्हणतात, "इतरत्र ठीक आहे. पण देवळांत कसें जमणार?" मी म्हणतों, "इतरत्र जमत नसल्यास आपण त्याचा कांहीं तरी अर्थ कल्पूं शकूं. पण देवळांत सहज च जमलें पाहिजे." लोक म्हणतात, "देवळांत मुळीं च जमणार नाहीं. कारण देवळें पवित्र आहेत." मी म्हणतों, "देवळांत सहज च जमलें पाहिजे, कारण देवळें पवित्र आहेत." भेदभाव शक्य तितका विसरण्यांत पवित्रता आहे, वाढविण्यांत नाहीं. व्यवहारांत देखील अभेद पाळतां आला पाहिजे. पण इतकी आपली योग्यता नसल्यास निदान देवळांत तरी अभेद पाहण्याचा अभ्यास केला पाहिजे. गणित–शास्त्रांत अनंतापुढें कोणती हि लहानमोठी संख्या शून्य बनते. देवळांत आपण परमशुद्ध प्रभूच्या समोर उभे असतों. त्याच्या शुद्धतेपुढें आमच्यांतले शुद्धअशुद्ध सारखे च ओंगळ समजले पाहिजेत. तेथें पुन्हां अवांतर भेद उकरून काढणें म्हणजे अधर्म आहे. पांचापेक्षां पन्नास मोठे खरे, पण अनंतापुढें दोघे हि सान्त च कीं नाहीं? व्यवहारांत मी विठ्यामहारापेक्षां स्वच्छ. पण देवळांतल्या विठोबापुढें मी आणि विठ्यामहार सारखे च कीं नाहीं? आपण जेथें आहों तेथें देवाच्या समोर च आहों. पण आपल्याला अशी प्रतीति येत नाहीं. म्हणून मुद्दाम ह्या प्रतीतीचा अभ्यास करण्याच्या इराद्यानें आपण देवळांत जातों. तेथें जाऊन सुद्धां जर आपण "हा ब्राह्मण, हा अंत्यज" करूं लागलों तर धर्माला कांहीं आशा च उरली नाहीं. तुलसीदासजी रामायण सांगत असतां मारुतिराय एका महारोग्याच्या रूपानें ऐकत होते असें सांगतात. तुलसीदासजींनीं स्वच्छतेच्या इंद्रियाला लगाम घातला नसता तर त्यांच्या हातून केवढा अनर्थ झाला असता? जो (घाणेरडा) अंत्यज देवळांत आला आहे आणि ज्याला काढून टाकण्याचा मी प्रयत्न करीत आहें तो मारुतिरायाची मूर्ति नाहीं ह्याबद्दल माझ्या पाशीं काय पुरावा आहे? शबरीनें

रामचंद्रांना बोरें अर्पण केलीं तीं कितपत शुद्ध होतीं? शबरीला वाटलें, "तशींच्या तशीं च बोरें देईन तर प्रभूंना आंबटचिंबट बोरें खावीं लागतील. म्हणून हरएक बोर आपल्या 'शुद्ध' दांतानें चाखून गोड असेल तेवढें च द्यावें हें बरें." रामचंद्रांचें स्वच्छतेचें इंद्रिय बहिर्मुख नव्हतें. त्यांना तीं बोरें स्वच्छ च वाटलीं व त्यांनीं तीं प्रेमाने खाल्लीं. ह्या शबरीला जर आपण देवळांत येऊं देणार नाहीं तर आपण तरी देवळांत कशयाला जावें? घरीं च बसलेलें काय वाईट? जो कडक सोवळा ब्राह्मण जेवतांना लहान मुलाला जवळ येऊं देत नाहीं तो च देवघरांत देवपूजा करीत असतां मुलगा अंगाला बिलगून मुतला तरी रागावत नाहीं. अशी धर्माची खुबी आहे. कारण, तो जाणत असतो कीं देवघर ही रागावण्याची जागा नाहीं. वास्तविक, रागावण्याची कुठें च जागा नाहीं. पण आपल्याला राग जिंकतां येत नाहीं म्हणून निदान देवळांत तरी रागावूं नये असा नियम केला. पूर्वीं क्रोधागार म्हणजे रागावण्याची स्वतंत्र खोली राखण्याची पद्धति होती असें रामायणांत वर्णन आहे. राग येतोसें दिसलें कीं क्रोधागारांत दडी मारून बसावयाचें, तेथें भरपूर रागावून घ्यावयाचें आणि मन शांत झालें म्हणजे बाहेर यावयाचें. पण त्या काळीं रागावण्याचा अपवाद असेल म्हणून एका खोलीवर भागलें. आज रागावण्याचा नियम आहे म्हणून आपण न रागावण्याची स्वतंत्र खोली राखतों. सर्वत्र रागावलें तरी चालेल पण त्या खोलींत तरी रागावूं नये. ह्या न रागावण्याच्या खोलीला किंवा जागेला देवघर अथवा देऊळ हें नाव आहे. ज्याप्रमाणें क्रोधागारांत दुसऱ्या कोणीं हि येतां कामा नये, त्याचप्रमाणें अक्रोधागारांत उर्फ देवळांत सर्वांना येण्याची सूट असली पाहिजे. नाहींतर देवळाचा अर्थ काय उरला? एरवीं विंचू पाहिला कीं पायतण उचलणारे लोक सुद्धां देवळांत विंचू न मारला जावा अशीं इच्छा करतात त्याचा अर्थ काय? व्यवहारांतले भेदभाव देवळांत न जाऊं देण्याची खबरदारी राखली पाहिजे हा च त्याचा अर्थ नाहीं

काय? स्वयंपाकघरांतले नियम निराळे, देवघरांतले निराळे. जेवणांत स्वच्छता सांभाळावयाची असते, पूजेंत पवित्रता पहावयाची असते.

पण आज भोजनाचा धंदा करणाऱ्या लोकांच्या ताब्यांत भजनाची संस्था गेली असल्यामुळें स्वच्छता आणि पवित्रता ह्यांतील फरक कळेनासा झाला आहे. तुकारामानें "भोजन ती भक्ति आणि मरण ते मुक्ति" म्हणून ज्या चार्वाकांचें वर्णन केलें आहे ते आमच्याहून निराळे नाहींत. भजन आणि भोजन ह्यांची आम्हीं जी सांगड घातली आहे ती सोडून दिल्याशिवाय देवळांत अंत्यजांचें स्वागत कां झालें पाहिजे हें आम्हांस उमजणार नाहीं. भोजन ही अमंगळ शारीरिक क्रिया आहे. त्यामुळें स्वच्छतेच्या कडेकोट पहाऱ्यांत ती करण्याचा रिवाज पाडला तरी हानि नाहीं. भजन ही पवित्र आत्मिक क्रिया आहे, त्यामुळें "शिवतां होतसे ओवळें" हा नियम तेथें लागू नाहीं. "ब्राह्मणाचें ब्रह्म तें सोवळें आणि शूद्राचें ब्रह्म तें ओवळें" असें असत नाहीं. भजन ही वाहती गंगा आहे. ती पवित्र आहे इतकें च काय पण ती पावक आहे, दुसऱ्यांना पवित्र करणारी आहे. म्हणून देवळांतून अस्पृश्यता सहज च दूर झाली पाहिजे.

ह्याचा अर्थ असा नाहीं कीं देवळांत स्वच्छता राखूं नये. स्वच्छता राखण्याची इष्ट तितकी काळजी अवश्य घ्यावी. पण स्वच्छतेचें स्तोम माजवूं नये. स्वच्छतेचा अत्याग्रह राखून देवळें बाटवूं नयेत. ईश्वराच्या लेकरांना त्याच्या च नांवाखालीं त्याच्यापासून दूर राखण्याचा प्रयत्न करणें म्हणजे स्वतः ईश्वरापासून दूर जाण्यासारखें आहे. आईला स्वच्छ मुलें आणि शेंबडीं मुलें हा भेद ठाऊक नाहीं. तिला दोन्ही प्यारीं आहेत. शेंबडया मुलाविषयीं तिला अधिक काळजी आहे. आईची काळजी लक्षांत घेऊन आम्हीं वागलें पाहिजे. नाहींतर आमच्यासारखे पतित आम्ही च होऊं.

---

# मजुरांची जरूर

भरीव काम करावयाचें म्हणजे कामाचा पोकळ डौल करणारीं माणसें मुळीं च चालावयाचीं नाहींत. वाऱ्याच्या योगानें पोकळ बांबूमधून आवाज निघतो. त्याप्रमाणें चळवळीचा वारा वाहूं लागला म्हणजे पोकळ कामांतून कीर्तीचा आवाज निघूं लागतो. बांबू भरीव असता तर आवाज निघाला नसता. मनुष्य भरीव काम करूं लागला म्हणजे कीर्तीचा आवाज कानीं येत नाहीं. त्यामुळें भरीव कामाकडे लोकांचें आकर्षण होत नाहीं. पण म्हणून च त्या कामाची राष्ट्रीय चित्तशुद्धीला अधिक जरूर आहे. कीर्तीची किंवा आभाराची अपेक्षा न राखतां पुढील काळावर आणि परमेश्वरावर विश्वास ठेवून निरुपचार कर्म करीत राहण्यानें च निष्काम वृत्ति बनेल. आणि निष्काम वृत्ति बनेल तेव्हां च फळ दिसूं लागेल.

इतिहासाला एक शिवाजी ज्ञात होण्यापूर्वीं ह्या शिवाजीच्यापेक्षां हि उंच योग्यतेचे शंभर शिवाजी होऊन गेले आहेत. त्यांनीं ऐतिहासिक शिवाजीचा मार्ग तयार केला आहे. हे शिवाजी इतिहासाच्या डोळ्यांना दिसलेले नाहींत. पन्नास घाव मारून जो दगड फुटला नाहीं तो एकावन्नाव्या घावानें फोडला असें खुळ्या पोराला नाहीं का वाटत? इतिहास तरी ह्या खुळ्या पोरासारखा च आहे. त्याची नजर कोती आहे. पण पोराला कांहीं वाटलें तरी समंजस मनुष्य एकावन्नाव्या घावानें दगड फुटला असें मानील काय? पाठीमागच्या पन्नास घावांनीं जो परिणाम उत्पन्न केला होता त्यावर एकावन्नाव्या घावाचें निमित्त होऊन तो दगड फुटला असें च नाहीं का? पण कीर्ति कुणाची?

एकावन्नाव्या घावाची. मागच्या पन्नास घावांनीं काय केलें? निष्काम कर्म. लहान मुलाला वाटतें, पाऊस वळचणीपासून पडतो. कारण वळचणीपासून 'दिसतो'. त्याला ही गोष्ट माहीत नसते कीं पाऊस खरोखर दुसरीकडून च पडतो. कुठून? जिथून दिसत नाहीं तिथून. म्हणजे कुठून? गीता सांगते, यज्ञांतून.

यज्ञ म्हणजे भरीव काम. कीर्तीची लालसा जाळून मजबूत मजुरीचें काम करणें हा यज्ञ. आज डोंगराएवढें मजुरीचें काम पडलें आहे. राष्ट्रीय शाळा सुंदर पायावर चालवावयाच्या आहेत. अंत्यजांची चाकरी करावयाची आहे. मुसलमानांचीं मनें वळवावयाचीं आहेत. कॉंग्रेसच्या आज्ञेप्रमाणें सूत-सभासद तयार करावयाचे आहेत. परदेशी कापडाचा बहिष्कार सिद्ध करावयाचा आहे. दारूचें व्यसन सोडावयाचें आहे. मनांतली आणि जनांतली सगळी घाण साफ करावयाची आहे. हे सर्व मजबूत मजुरीचे महायज्ञ आहेत. मजूर याज्ञिकांची जरूर आहे.

स्थिरवृत्ति हें यज्ञाचें मुख्य साधन आहे. जनकराजा यज्ञकर्मामध्यें गढून गेलेला असल्यामुळें सीतेला भेटण्याला त्याला फुरसत होत नव्हती असें कवीनें वर्णन केलें आहे. जनक म्हणजे कर्मयोगाचा आरसा. भगवंतांनीं जनकाचा च दाखला दिला आहे. ज्याप्रमाणें जनकानें आपल्या हालचालींवर मर्यादा घालून घेतली होती त्याप्रमाणें आपण हि आपल्या हालचालींवर मर्यादा घातली पाहिजे. जेलमध्यें बाहेरच्या जगाकडे लक्ष न देतां काम करण्याचा अभ्यास होतो. तो च अभ्यास जेलच्या बाहेर राहून आज आपण केला पाहिजे. घरांत लहान लहान दिवे निरनिराळ्या खोल्यांत ठरलेल्या जागीं ठेवावे आणि एखादा कंदील इकडून तिकडे नाचवावयाला राखावा म्हणजे कारभार सुरळीत चालतो. त्याप्रमाणें चारदोन 'भारती' माणसें सर्व प्रांतांतून नाचवावयाला राखून बाकी सर्वांनीं आपआपल्या जागेवर आसन स्थिर करावें.

पाण्यासारखी मर्यादा-वृत्ति राखावी. पाणी ज्याप्रमाणें रस्त्यांतला खड्डा भरून काढल्याशिवाय पुढें सरत नाहीं त्याचप्रमाणें आधीं आपल्या गांवांतला खड्डा बुजवून मग दुसरीकडे मोर्चा वळवावा. ह्यांत च स्वदेशीधर्माची खुबी आहे. स्वदेशीधर्म नम्र आहे. तो आधीं जवळ पाहतो. मग दूर. मग त्याहून दूर. अश्या रीतीनें तो सर्व विश्व व्यापणारा आहे. पण त्याची सुरवात आत्म्यापासून होते.

ज्वारीच्या ढिगांतून पायलीभर ज्वारी काढून घेतली म्हणजे त्या ढिगांत पायलीच्या आकाराचा खळगा पडतो. विहिरीच्या पाण्यांतून पोहराभर पाणी काढलें तरी त्या पाण्यांत पोहऱ्याच्या आकाराचा खळगा पडत नाहीं. कारण पाण्याचे बिंदु पडूं पाहणारा खळगा भरून काढण्यासाठीं चारी बाजूंनीं धावून येतात. ही मदतीला धावून येण्याची वृत्ति ज्वारीच्या दाण्यांत कमी आहे. त्यामुळें ज्वारीच्या ढिगांत खळगा पडतो. आपल्या राष्ट्रीय जीवनांत कपडयाच्या बाबतींतलें परावलंबन हा एक मोठा खळगा पडला आहे. तो सर्वांनीं मिळून आधीं भरून काढणें हें आपलें पहिलें काम आहे. ह्या कामीं आपण पाण्याच्या बिंदूपासून धडा घेतला पाहिजे. सर्वांनीं खादी वापरली पाहिजे. कॉंग्रेसला नियमित सूत दिलें पाहिजे. ह्या कामीं कोणते हि भेद आड येऊं नयेत. हें कसें होणार?

एक सुचवितों :—तालुक्यावर नजर द्यावी. मजुरांनीं काम वांटून घ्यावें. हरेक तालुक्यांत किमान पक्ष अमुक सभासद झाले च पाहिजेत असें ठरवून कामाला लागावें. विशिष्ट गांवांवर अधिक लक्ष देऊन ग्रामरचनेचा पाया घालावा. ग्राम-रचनेसाठीं निवडलेल्या गांवीं प्रत्येक घरांत चरखा दाखल झाला च पाहिजे असें धोरण राखावें. मुख्य ठिकाणीं शिक्षणाची सोय असावी. मजुरांनीं जणूंकाय आपण जेलमध्यें च आहों असें समजून आपआपल्या कार्यक्षेत्रांत रात्रंदिवस राबावें. तर च हें जमेल.

# कवीचे गुण

“हल्लीं आपल्यांत पूर्वीसारखे कवि कां नाहींत?” एकानें प्रश्न विचारला आहे. त्याचें उत्तर म्हणून खालील चार शब्द लिहीत आहें.

हल्लीं कवि कां नाहींत? कवीला लागणारे गुण नाहींत म्हणून. कवीला कोणते गुण लागतात? तें च आतां पाहूं.

कवि म्हणजे मनाचा मालक. ज्यानें मन जिंकलें नाहीं त्याला देवाच्या सृष्टीचें रहस्य समजणें शक्य नाहीं. सृष्टीला च काव्य हें नांव आहे. जोंपर्यंत मन जिंकलेलें नाहीं, रागद्वेष निमाले नाहींत, तोंपर्यंत मनुष्य इंद्रियांचा गुलाम च राहणार. इंद्रियांच्या गुलामाला देवाची सृष्टि कशी दिसणार? तो विचारा तुच्छ विषय-सुखांत च घोटाळत राहणार. देवाची सृष्टि विषयसुखाच्या पलीकडे आहे. ह्या पलीकडच्या सृष्टीचें दर्शन झाल्याशिवाय कवि नाहीं. सूरदासांचे डोळे त्यांच्या इच्छेविरुद्ध विषयांकडे ओढा घेत असत. हे डोळे फोडून जेव्हां ते आंधळे बनले तेव्हां त्यांना काव्याचें दर्शन झालें. ध्रुवबाळकानें घोर तपश्चर्या करून इंद्रियें मारून टाकलीं तेव्हां देवानें आपल्या काव्यमय शंखाचा त्याच्या गालाला स्पर्श केला. त्याबरोबर त्या अज्ञान बालकाच्या मुखांतून साक्षात वेदवाणीचें रहस्य प्रकट करणारें अद्भुत काव्य बाहेर पडलें. तुकारामानें जेव्हां शरीर, इंद्रियें आणि मन ह्यांचा संपूर्ण भंग केला तेव्हां च महाराष्ट्राला अभंग-वाणीचा लाभ झाला.

मनोनिग्रहाच्या प्रयत्नांत शरिरावर मुंग्यांचीं वारुळें चढलीं तेव्हां त्यांतून आदिकाव्याचा उदय झाला. हल्लीं आपण इंद्रियांच्या सेवेला विकलों आहों. म्हणून आपल्यांत कवि नाहींत.

समुद्र जसा सर्व नद्यांना पोटांत घालतो त्याप्रमाणें ब्रह्माण्डाला आपल्या प्रेमानें झाकून टाकण्याइतकी व्यापक बुद्धि कवीची असावी लागते. दगडांत देव पाहणें हें काव्याचें काम आहे. त्याला व्यापक प्रेम पाहिजे. ज्ञानेश्वरमहाराज रेडयाच्या ओरडण्यांतून वेद–श्रवण करूं शकले म्हणून ते कवि. पाऊस पडूं लागल्याबरोबर बेडूक आवाज करूं लागलेले पाहून वसिष्ठांना असें दिसलें कीं परमेश्वरी कृपेचा पाऊस पडून कृतकृत्य झालेले सत्पुरुष च ह्या बेडकांच्या रूपानें आपले आनंदोद्गार प्रगट करीत आहेत. म्हणून त्यांनीं भक्तिभावानें त्या बेडकांची स्तुति केली. ती 'मंडूक–स्तुति' ह्या नांवानें ऋग्वेदांत घेतली आहे. आपल्या प्रेमळ वृत्तीचा रंग चढवून कवि सृष्टीकडे पाहतो. म्हणून त्याचें हृदय सृष्टीच्या दर्शनानें नाचतें. आईच्या मनांत लेकरां-विषयीं प्रेम असल्यामुळें मुलाचें दर्शन झाल्याबरोबर तिचे स्तन तिला आवरत नाहींत. तसें च चराचर सकल सृष्टीविषयीं कवीचें मन प्रेमानें भरलेलें असतें. त्यामुळें तिचें दर्शन झालें कीं तो पागल होऊन जातो. त्याच्या वाणींतून काव्याची धार बाहेर पडते. ती त्याला आवरत च नाहीं. आपल्यांत असें व्यापक प्रेम नाहीं. सृष्टीविषयीं उदारबुद्धि नाहीं. पुत्र–दार–गृहादिकांच्या पलीकडे आपलें प्रेम गेलेलें नाहीं. त्यामुळें "वृक्ष वल्ली आम्हां सोयरीं वनचरें" हें काव्य आम्हांला कोठून सुचणार?

कवीनें सर्व सृष्टीला आत्मिक प्रेमाचें पांघरूण घातलें पाहिजे. तसें च सृष्टीच्या वैभवानें त्याला आपला आत्मा नटवितां आला पाहिजे. 'वृक्ष वल्ली वनचरें' ह्यांत त्याला आत्मदर्शन झालें पाहिजे.

त्याबरोबर आत्म्यांत 'वृक्ष वल्ली वनचरें' अनुभवितां आलीं पाहिजेत. विश्व आत्मरूप आहे इतकें च काय पण आत्मा विश्वरूप आहे असें कवीला दिसलें पाहिजे. पौर्णिमेच्या चंद्रानें त्याच्या हृदय-समुद्राला भरती आली च पाहिजे. पण पौर्णिमेच्या अभावीं त्याच्या हृदयाला ओहटी लागतां कामा नये. अमावास्येच्या गाढ अंधकारांत, आकाश ढगांनीं भरलेलें असतांना हि, चंद्र-दर्शनाचा आनंद त्याला लाभला पाहिजे. ज्याचा आनंद बाहेरच्या जगांत गुंतला आहे तो कवि नाहीं. कवि आत्मनिष्ठ. कवि स्वयं-भू. पामर दुनिया विषयसुखावर झुलत असते. कवि आत्मानंदांत डोलत असतो. लोकांना भोजनाचा आनंद. कवीला आनंदाचें भोजन. कवि संयमाचा संयम आणि म्हणून स्वतंत्रतेची स्वतंत्रता. टेनिसननें वाहत्या झऱ्यांत आत्म्याचें अमरत्व पाहिलें. कारण, अमरत्वाचा वाहता झरा त्याला आपल्या आत्म्यांत दिसला होता. कवि विश्वसम्राट् असतो. कारण, तो हृदय-सम्राट् असतो. कवीला, जागेपणीं महाविष्णूच्या योग-निद्रेंतील स्वप्नें कळतात. आणि स्वप्नांत जागत्या नारायणाची जगद्रचना पहावयास सांपडते. कवीच्या हृदयांत सृष्टीचें सर्व वैभव सांठविलेलें असतें. आमच्या हृदयांत भुकेचें ज्ञान भरलेलें आहे आणि तोंडांत भिकेची भाषा. मी स्वतंत्र आहें किंवा मनुष्य आहें एवढी सुद्धां जाणीव जिथें उमटली नाहीं तिथें आत्मनिष्ठ काव्य-प्रतिभेची अपेक्षा करतां येणार नाहीं.

कवीला 'लोकहृदय यथावत् संप्रकाशित' करण्याचें सामर्थ्य पाहिजे असें सर्व च मानतात. पण सत्य-निष्ठा हा ह्या सामर्थ्याचा मूलाधार आहे ह्याचें भान नसतें. सत्यपूत वाणींत अमोघ वीर्य उत्पन्न होतें. "सत्य असेल तें च बोलावयाचें" अश्या नैष्ठिक सत्याचरणांतून "जें बोललें जाईल तें च सत्य होईल" असें अद्भुत सामर्थ्य प्रगट होतें. "ऋषि आधीं बोलून जात आणि मागून त्यांत अर्थ दाखल होत असे" असें भवभूतीनें ऋषींचें काव्य-कौशल वर्णिलें आहे. ह्याचें कारण

ऋषींची सत्य-निष्ठा. "समूलो वा एष परिशुष्यति योऽनृतमभिवदति। तस्मान्नार्हाम्यनृतं वक्तुम्"—जो असत्य बोलतो तो समूळ शुष्क होतो. म्हणून मला असत्य बोलतां कामा नये—अशी प्रश्नोपनिषदांतील ऋषीनें आपली चिंता प्रदर्शित केली आहे. जाज्वल्य सत्य-निष्ठेतून काव्याचा जन्म होतो. वाल्मीकीनें आधीं रामायण लिहिलें, मागून रामानें आचरण केलें, असें म्हणतात. वाल्मीकि सत्यमूर्ति होते. म्हणून रामाला त्यांचें काव्य खरें करणें च आलें. आणि वाल्मीकीचा राम तरी कसा होता? "द्विः शरं नाभिसंधत्ते। रामो द्विर्नाभिभाषते"—राम दोनदा बाण सोडत नाहीं आणि दोनदा शब्द टाकत नाहीं. आदि-कवीच्या काव्य-प्रतिभेला सत्याचा आधार होता. म्हणून च तिच्या भालप्रदेशावर अमरत्वाचा लेख लिहिला गेला. सृष्टीचीं गूढ रहस्यें किंवा समाजहृदयांतील सूक्ष्म भावना उकलून दाखविण्याचें सामर्थ्य हवें असेल तर सत्यपूत बोललें पाहिजे. हुबेहुब वर्णन करण्याची शक्ति म्हणजे एक प्रकारची सिद्धि आहे. कवि वाचा-सिद्ध असतो कारण तो वाचाशुद्ध असतो. आपली वाचा शुद्ध नाहीं. आपल्याला असत्य खपतें एवढें च नाहीं पण सत्य खुपतें अशी आपली दीन दशा आहे. म्हणून कवीचा उदय होत नाहीं.

कवीची दृष्टि शाश्वत काळाकडे असावी लागते. अनंत काळाकडे नजर असल्याशिवाय भवितव्यतेचा उकल होत नाहीं. प्रत्यक्षानें अंध झालेल्या बुद्धीला सनातन सत्यें गोचर होत नाहींत. सॉक्रेटिसाला विषाचा प्याला पाजणाऱ्या तर्कानें सॉक्रेटिस मर्त्य पाहिला. "मनुष्यें मर्त्य असतात. आणि सॉक्रेटिस मनुष्य आहे. म्हणून सॉक्रेटिस मर्त्य आहे" ह्या पलीकडची कल्पना त्या तोकडया तर्काला सुचली नाहीं. पण विष-प्राशनाच्या दिवशीं आत्म्याच्या सत्तेविषयीं प्रवचन करणाऱ्या सॉक्रेटिसाला पलीकडचें भविष्य स्पष्ट दिसत होतें. भवितव्यतेच्या उदरांत सत्याचा जय लपलेला तो पाहूं शकत होता. त्यामुळें वर्तमान युगाविषयीं

तो बेफिकीर राहिला. ही उदासीन वृत्ति अंगीं बाणल्याशिवाय कविहृदय निर्माण होऊं शकत नाहीं. संसारांतील सर्व रस करुण-रसाच्या गुलामगिरींत राबणारे आहेत ही गोष्ट समाजाच्या चित्तावर ठसविण्याचा भवभूतीनें परोपरीनें प्रयत्न केला. पण त्याकाळच्या विषयलोलुप उन्मत्त समाजाला तो मानवला नाहीं. त्यांनीं भवभूतीला च फेकून दिलें. पण कवीनें आपली भाषा सोडली नाहीं. कारण, शाश्वत कालावर त्याचा भरवसा होता. शाश्वत कालावर नजर टाकण्याची आपली हिंमत चालत नाहीं. चारी बाजूंनीं घेरलेलें हरिण ज्याप्रमाणें हताश होऊन पाहण्याचें सोडून देतें आणि मटूकन बसून जातें त्याप्रमाणें आपल्या विषय–त्रस्त बुद्धीला पुढील काळाकडे पाहणें होत नाहीं. "उद्यांचें कोणीं पाहिलें आहे? आज जें मिळेल तें भोगून घ्या" अशा भेदरलेल्या वृत्तींत काव्याला आशा नाहीं.

ईशावास्योपनिषदांतील खालील ब्रह्मपर मंत्रांत हा च अर्थ सुचविला आहे.

> कविर्मनीषी परिभूः स्वयंभूः ।
> याथातथ्यतोऽर्थान् व्यदधाच्छाश्वतीभ्यः समाभ्यः ॥

अर्थः—कवि (१) मनाचा मालक (२) विश्वप्रेमानें भरलेला (३) आत्मनिष्ठ (४) यथार्थभाषी आणि (५) शाश्वत काळावर नजर देणारा असतो.

# साक्षर कीं सार्थक

एखाद्या मनुष्याच्या घरांत बऱ्याचश्या बाटल्या भरलेल्या असल्या तर तो मनुष्य बहुधा रोगी असावा असें आपण अनुमान करतों. पण एखाद्याच्या घरांत पुष्कळ पुस्तकें पडलेलीं दिसलीं तर आपण त्याला शहाणा समजतों. हा अन्याय नव्हे काय! नाइलाज झाल्याशिवाय बाटली न वापरणें हें आरोग्याचें पहिलें कलम आहे. तसें च होतां होईल तों बुकांत डोकें म्हणा, डोक्यांत बुक म्हणा, न घालणें हें शहाण-पणाचें पहिलें कलम आहे. बाटली ही रोगट शरिराची निदर्शक असते असें आपण मानतों. चोपडी देखील—मग ती संसार-चोपडी असो, नाहीं तर परमार्थ-चोपडी असो—रोगट मनाची निदर्शक समजली पाहिजे.

अनेक शतकें झालीं, ज्यांच्या शहाणपणाचा सुगंध अजून दुनियेंत दरवळून राहिला आहे त्या लोकांचें लक्ष जीवन साक्षर करण्यापेक्षां सार्थक करण्याकडे च होतें. साक्षर जीवन निरर्थक असूं शकतें ह्याचीं उदाहरणें आजच्या सुशिक्षित समाजांत न शोधतां सांपडणारीं आहेत. उलट पक्षीं निरक्षर जीवन हि अत्यंत सार्थक असूं शकतें अश्या विष-यींचे अनेक दाखले इतिहासानें पाहिले आहेत. पुष्कळ वेळां 'सु'–शिक्षित आणि 'अ'–शिक्षित ह्यांच्या जीवनांची तुलना करतां "अक्षराणामका-रोऽस्मि" ह्या गीता–वचनांत सांगितल्याप्रमाणें 'सु'पेक्षां 'अ' च पसंत करावासा वाटतो.

पुस्तकांत अक्षरें असतात. त्यामुळें पुस्तकांच्या संगतीनें जीवन सार्थक करण्याची आशा व्यर्थ आहे. "बोलाची च कढी बोलाचा चि भात। जेऊनियां तृप्त कोण झाला?" हा सवाल मार्मिक आहे. कवीनें म्हटल्याप्रमाणें बुकांतली विहीर बुडवीत हि नाहीं आणि बुकांतली होडी

तारीत हि नाहीं. 'अश्व' म्हणजे 'घोडा' असें कोशांत लिहिलेलें असतें. मुलांना वाटतें, 'अश्व' शब्दाचा अर्थ कोशांत दिलेला आहे. पण तें खरें नव्हे. 'अश्व' शब्दाचा अर्थ कोशाच्या बाहेर तबेल्यांत बांधून ठेवला आहे. तो कोशांत मावणें शक्य नाहीं. 'अश्व' म्हणजे 'घोडा' हें कोशांतलें वाक्य इतकें च सांगतें—"अश्व शब्दाचा तो च अर्थ आहे जो घोडा शब्दाचा अर्थ आहे." तो कोणता? तबेल्यांत जाऊन पहा. कोशांत नुसता पर्यायशब्द दिलेला असतो. पुस्तकांत अर्थ राहत नाहीं. अर्थ सृष्टींत राहतो हें जेव्हां उमजेल तेव्हां खऱ्या ज्ञानाची चव कळेल.

ज्यांनीं जपाची कल्पना शोधून काढली त्यांचा एक उद्देश साक्षरत्वाला संक्षेप-रूप देण्याचा होता. साक्षरत्व अगदीं च भुंकूं लागलेलें पाहून त्याच्या तोंडावर जपाचा तुकडा टाकून द्यावा म्हणजे बिचाऱ्यांचें भुंकणें बंद होईल आणि जीवन सार्थक करण्याच्या प्रयत्नाला अवकाश मिळेल हा त्यांतला भाव. वाल्मीकीनें शतकोटि रामायण लिहिलें. तें लुटण्यासाठीं देव, दानव आणि मानव ह्यांच्यांत झगडा सुरू झाला. झगडयाचा निकाल लागेल असा सुमार न दिसल्यामुळें शंकरांना पंच नेमलें. त्यांनीं तिघांना तेतीस तेतीस कोटि श्लोक वांटून दिले. एक कोटि उरले. पुन्हां तेतीस लाख वांटून दिले. एक लाख उरले. असें उत्तरोत्तर वाटतां वाटतां शेंवटीं एक श्लोक उरला. रामायणाचा श्लोक अनुष्टुप् छंदाचा. अनुष्टुप् छंदाचीं अक्षरें असतात बत्तीस. शंकरांनीं त्यांतलीं दहा दहा अक्षरें तिघांना वांटून दिलीं. उरलीं अक्षरें दोन. तीं कोणतीं? 'रा म'. शंकरांनीं तीं दोन अक्षरें वांटणी करण्याची मजुरी म्हणून स्वतः घेऊन टाकलीं. शंकरांनीं आपलें साक्षरत्व दोन अक्षरांत संपवून टाकलें. म्हणून देव, दानव आणि मानव कोणी हि त्यांच्या ज्ञानाची बरोबरी करूं शकला नाहीं. संतांनीं साहित्याचें सर्व सार रामनामांत आणून ठेवलें आहे. पण "अभाग्या नरा पामरा हें कळे ना."

संतांनीं रामायण दोन अक्षरांत संपविलें. ऋषींनीं वेदाला एका च अक्षरांत गुंडाळून ठेवलें आहे. साक्षर होण्याचा हव्यास सुटत नाहीं तर 'ॐ'काराचा जप करा म्हणजे झालें. तेवढयावर न भागलें तर चिमुकलें माण्डूक्य-उपनिषद वाचावें. तरी वासना उरली तर दशोपनिषदें पहावीं. अश्या अर्थाचें एक वाक्य मुक्तिकोपनिषदांत आलें आहे. त्यावरून ऋषींच्या मनाचा इरादा उघड दिसतो. पण एका अक्षराचा तरी जप केला च पाहिजे असें ऋषींचें म्हणणें नाहीं. एक किंवा अनेक अक्षरें घोकण्यांत जीवनाचें सार्थक्य नाहीं. वेदांचीं अक्षरें पोथींत सांपडतात. अर्थ जीवनांत शोधावयाचा असतो. तुकारामाला संस्कृत न शिकतां वेदाचा अर्थ कळला होता असें त्याचें म्हणणें आहे. त्या म्हणण्याचा आजपर्यंत कोणीं च इनकार केलेला नाहीं. शंकराचार्यांनीं आठव्या वर्षी वेदाभ्यास पुरा केला त्याविषयीं आश्चर्यचकित होऊन कोणा शिष्यानें कोणा गुरूला प्रश्न विचारला—"महाराज, आठ वर्षांत आचार्यांनीं वेदाभ्यास कसा संपविला?" गुरु गंभीरपणानें म्हणाले—"आचार्यांची बुद्धि लहानपणीं तितकीशी तीव्र नसावी. म्हणून त्यांना आठ वर्षें लागलीं."

एक माणूस औषध खाऊन खाऊन कंटाळून गेला. कारण, जों जों औषध जवळ करावें तों तों आरोग्य दूर दूर पळूं लागलें. शेवटीं कोणाच्या सूचनेवरून त्यानें शेतांत काम सुरू केलें. शेतांतल्या कामानें आरोग्य लाभून थोडया च दिवसांत तो मोठा तगडा झाला. अनुभवानें सिद्ध झालेली ही आरोग्याची साधना तो लोकांना सांगं लागला. एखाद्याच्या हातांत बाटली पाहिली कीं "बाटलीनें कांहीं व्हावयाचें नाहीं, कुदळी घे म्हणजे आराम मिळेल" असा तो मनोभावानें उपदेश करी. लोक म्हणत—"तुम्हीं बाटली खाऊन खाऊन तृप्त होऊन बसलांत आणि आम्हांला तेवढी बंदी करतां?" दुनियेचें असें च आहे. दुसऱ्याच्या अनुभवानें शहाणपण शिकण्याची माणसाला

इच्छा होत नाहीं. त्याला स्वतंत्र अनुभव पाहिजे. स्वतंत्र ठेचा पाहिजेत. मी चांगला सांगतों कीं "पुस्तकांपासून कांहीं फायदा नाहीं. व्यर्थ पुस्तकांत घोटाळूं नको" तर तो म्हणतो, "तुम्हीं पुस्तकें वाचून चुकलां आणि मला असा उपदेश करतां?" "होय. मी पुस्तकें वाचून चुकलों. पण तूं चुकूं नये म्हणून सांगतों". तो म्हणतो, "मला अनुभव पाहिजे". "ठीक आहे. घे अनुभव. ठेचाळण्याचें स्वातंत्र्य हा तुझा जन्म-सिद्ध हक्क आहे." इतिहासाचा अनुभव आम्ही विचारांत घेत नाहीं. म्हणून इतिहासाची पुनरावृत्ति होते. आम्ही इतिहासाची किंमत करूं तर इतिहासाच्या पुढें जाऊं. इतिहासाची किंमत न केल्यानें त्याची किंमत उगीच वाढून बसली आहे. पण हें लक्षांत येईल तेव्हां खरें!

---

# दोन शर्ती

स्वराज्याची चळवळ आतांपर्यंत जवळ जवळ शहरांत च चालली होती. पण आतां खेडेगांवांत काम केलें पाहिजे असें हळूं हळूं डोक्यांत उगवूं लागलें आहे. पण खेड्यांत जावयाचें म्हणजे खेडवळ बनून गेलें पाहिजे. शिक्षण कश्यासाठीं? तर उत्तम 'नागरिक' बनविण्यासाठीं असें आम्ही आजपर्यंत म्हणत होतों. किंवा इंग्रजी विद्या आमच्याकडून तसें म्हणवीत होती. पण 'नागरिक' उर्फ 'शहरट' माणूस बनविणें हें शिक्षणाचें धोरण स्वराज्याच्या कामीं पडणारें नाहीं. ही गोष्ट लक्षांत घेतल्याशिवाय आतां सुटका च नाहीं. खेडवळ बनविण्याचें शिक्षण तें च खरें शिक्षण हें आम्हीं समजलें पाहिजे. त्याच्या च पायावर स्वराज्य रचतां येईल.

खेडेगांवांत गेलें पाहिजे असें तर वाटूं लागलें आहे. पण खेडवळ बनलें पाहिजे हें अजून तितकेंसें ठसलें नाहीं. झोपडींत तर जावयाचें पण उंटावरून उतरावयाचें नाहीं. त्यांतली ही तऱ्हा झाली. उंटावरून उतरल्याशिवाय झोपडींत शिरकाव होऊं शकत नाहीं हें अजून कळावयाचें आहे. मी खेडयांत जाणार आणि शहरचा सगळा थाट घेऊन जाणार. ह्याचा मतलब इतका च कीं मी खेडयाचें शहर बनविणार. हा च मतलब घेऊन खेडयांत जावयाचें तर त्यापेक्षां मुळीं च खेडेगांवची वाट न धरणें बरें. "शिवु होऊनि शिवु यजिजे" ही चाकरीची अट आहे. खेडवळाची चाकरी करावयाची तर खेडवळ बनून च करतां येईल.

राष्ट्रीय शाळांनीं हा मुद्दा डोळयासमोर ठेवला पाहिजे. गुळगुळीत नागरिक बनविण्याची हौस सोडून देऊन खडबडीत खेडवळ कसा तयार करतां येईल हा एक च विचार केला पाहिजे. आमचे शिकलेले लोक जर खडबडीत बनले तर इंग्रजाला ते बोचूं लागतील. आणि तो जरूर त्यांच्या वाटेंत अडथळा उभा करील. पण आम्हीं त्यास जुमानतां कामा नये. इंग्रज म्हणेल, "इंग्रजी शिका. नाहीं तर अंधारांत रहाल. इंग्रजी शिकल्यानें जगाचें ज्ञान तुमच्या हातांत येईल." आपण त्याला इतकें च सांगितलें पाहिजे कीं "जगाचें ज्ञान कीं जगायचें ज्ञान, हा आमच्या पुढें रोकडा सवाल आहे. सगळें जग आमची मेलेल्यांत मोजणी करतें इतकें समजण्यापुरतें जगाचें ज्ञान आम्हांला होऊन चुकलें आहे." इंग्रजीच्या ग्रहणांतून सुटलें च पाहिजे. एरवीं राष्ट्रीय शाळांचें तेज फाकणार नाहीं. इंग्रजी शिकलेला माणूस खेडवळाशीं बोलूं देखील शकत नाहीं. मग खेडवळ बनण्याची गोष्ट एकीकडे च राहिली. त्याची आणि खेडवळाची भाषा च जमत नाहीं. खेडवळाविषयीं त्याला तिटकारा वाटतो. खेडयांत राहणें त्याला

अशक्य आहे. म्हणून इंग्रजीच्या मोहाला फाटा दिल्याशिवाय इलाज नाहीं. ह्याचा अर्थ असा नाहीं कीं कोणीं च इंग्रजी शिकूं नये. इंग्रजी शिकण्याला आपण मोकळे आहों. पण इंग्रजी शिकण्याला आपण बांधले जाऊं नये. राष्ट्रीय शाळांनीं इंग्रजी शिकण्याची सक्ती काढून टाकली पाहिजे.

आणि मजुरीवर जोर दिला पाहिजे. अंगमेहनतीशिवाय खेडेगांवचें काव्य अनुभवतां यावयाचें नाहीं. मराठी शाळेंत शिकत असतां आम्हांला 'सृष्टिज्ञानाचें' एक बुक अभ्यासाला ठेवलें होतें. 'सृष्टीज्ञानाचें' सुद्धां 'बुक'. ह्या बुकांतल्या सृष्टि–ज्ञानाच्या जोरावर आम्ही जगाला अडाणी म्हणणार. आणि खेडेगांवांत जाणार ते सुद्धां अडाणी खेडवळांना 'शिकविण्या' साठीं जाणार. आम्हीं खेड्यांत गेलें पाहिजे. पण तें मुख्यत: शिकण्यासाठीं, शिकविण्यासाठीं नव्हे. खेडेगांव-च्या लोकांना शिकविण्यासारख्या दोनचार गोष्टी आमच्याजवळ असल्या तरी त्यांच्यापासून शिकण्याच्या पांचपंचवीस गोष्टी आहेत ही गोष्ट आमच्या लक्षांत येत नाहीं. कारण, शाळेंतल्या पुस्तकी ज्ञानानें आमची नजर तरळली आहे. मजुरीचें महत्त्व जेव्हां आम्हांस शिकविलें जाईल तेव्हां च आमची नजर निवळेल. आणि खेडेगावांत काम कसें करावें हें कळूं लागेल.

पण चालू पद्धतीप्रमाणें शिक्षण घेऊन चुकलेले पुष्कळ लोक देशसेवेसाठीं उमेदवार म्हणून येतात. त्यांनीं कसें करावें? माझ्या मतें त्यांचा उपयोग आपल्याला जरूर होऊं शकेल. पण त्यांना मध्यंतरीं दोन गोष्टी शिकून घ्याव्या लागतील: (१) इंग्रजी विद्येनें शिकलेल्या गोष्टी विसरणें, (२) अंगमेहनतीची संवय करणें. ह्या दोन गोष्टी त्यांच्या तयार झाल्या म्हणजे त्यांना काम करतां येईल. आज आपल्या देशाला हरएक मजुराच्या मजुरीची जरूर आहे. जितके लोक येतील तितके थोडे.

# नवें वर्ष

काळ सारखा धावतो आहे. थांबणें म्हणून त्याला माहीत नाहीं. काळाला श्रुतीमध्यें शर्यतींत धावणाऱ्या घोड्याची उपमा दिली आहे. शर्यतींतला घोडा जसा भरधाव धावत असतो तसा काळ हि भरधाव धावत असतो. काळाची ही घोडदौड केव्हां सुरू झाली किंवा हिचा शेंवटचा मुक्काम कोणता, हे प्रश्न च आहेत. म्हणजे ह्यांचीं उत्तरें नाहींत. आम्ही पुढें जाऊं किंवा न जाऊं, आमचा काळ पुढें जात राहणार. आगगाडींत बसल्यावर आम्ही चालतों कीं चालत नाहीं हा सवाल च काय? वाटल्यास आम्ही खुशाल झोप काढूं. पण झोप काढली तरी ताशीं वीसपंचवीस मैलांच्या गतीनें आम्ही धावत जाणार हें निश्चित आहे. जन्माच्या स्टेशनावरून मृत्यूचें तिकीट आम्हीं काढलें आणि काळाच्या आगगाडींत बसलों. आतां आम्ही जरी मुळीं च वाढलों नाहीं तरी आमचे वाढदिवस होत राहणार.

संस्कृतांत सूर्याला 'आदित्य' असें एक नांव आहे. 'दा' म्हणजे देणें ह्याच्या उलट 'आ–दा' म्हणजे घेणें. ह्यावरून आदित्य हा शब्द बनला असें श्रुतीनें सांगितलें आहे. त्याप्रमाणें आदित्य म्हणजे 'घेऊन जाणारा' असा अर्थ होतो. आदित्य काय घेऊन जात असतो? कवि म्हणतो, "तुमच्या आयुष्याचा एक तुकडा". अस्तास जाणारा सूर्य आमच्या आयुष्याचा एक तुकडा घेऊन जात असतो हें आम्हीं नित्य मनांत वागविलें पाहिजे. ह्या च हेतूनें संध्येचा विधि सांगितला. ज्ञानेश्वरांनीं मोठ्या कळवळ्यानें म्हटलें आहे कीं वेड्यांनो, आयुष्य झिजत चाललें आणि वाढदिवस कसला करतां? अरे, झीज म्हणजे वाढ का रे?

होय. झीज म्हणजे वाढ असा हि अर्थ होऊं शकेल. पण एक शर्त आहे. जर आत्मा वाढत असला तर आयुष्याची झीज झाली तरी त्या झिजेला वाढ म्हणतां येईल. फार काय, आत्म्याची वाढ करण्या साठीं शरीर, इंद्रियें, प्राण, आयुष्य झिजवून टाकलें च पाहिजे. ही झीज चांगली. हिला च 'तप' म्हणतात. तप करीत असतां आयुष्य झिजलें म्हणजे जरूर वाढदिवस करावा. कारण, त्यानें आम्ही खरोखर च वाढतों. बाकी, आमची वाढ होत नसतां केवळ काळ वाढला म्हणून वाढदिवस करणें म्हणजे तो काळाचा वाढदिवस झाला, आमचा वाढदिवस नव्हे.

महावीरस्वामींना 'वर्धमान' म्हणत असत. वर्धमान म्हणजे वाढणारे. काळाशीं झगडून ते वीर बनले. वीराचे महावीर बनले. म्हणून हें नांव त्यांना साजतें. शारीरिक आयुष्य सर्वांचें च वाढत असतें. म्हणून सर्वांना 'वर्धमान' म्हणतां येणार नाहीं. आत्म्याचें आयुष्य वाढविणारा तो वर्धमान. वर्धमान पुरुषांची झीज म्हणजे च वाढ; आणि मृत्यु म्हणजे नवें जीवन. वर्धमान पुरुष मेला म्हणजे एकदम उंच वाढतो. ह्याला च स्वर्गांत जाणें असें म्हणतात. तुकाराम सदेह स्वर्गांत गेल्याचें सांगतात पुष्कळ सत्पुरुष मेल्यानंतर जितके उंच चढले तितके तुकाराम जिवंतपणीं च उंच चढले असा त्याचा भाव आहे.

महाराष्ट्र-धर्माचें एक वर्ष संपलें. आज नव्या वर्षाचा नवा अंक निघत आहे. ह्या वाढदिवसाच्या प्रसंगीं जे विचार सहज मनांत आले ते जनांत प्रगट केले. आजच्या मंगल दिवशीं मी वाचकांना प्रेमानें वंदन करतों. माझ्या कल्पनेप्रमाणें वाचकांची सेवा करण्याचा मीं प्रयत्न केला आहे. ह्यांत अनेक दोष झाले असतील च. त्याबद्दल वाचकांनीं क्षमा करावी. मला लिहिण्याचा मनापासून कंटाळा आहे.

मी नाइलाज होऊन लिहितों. वाचकांना हि वाचण्याचा कंटाळा असावा अशी माझी इच्छा आहे. त्यांनीं हि नाइलाज होऊन वाचावें. माझीं कर्तव्यें करून उरलेल्या वेळांत मी लिहितों आणि लिहीन. वाचकांनीं हि आपलीं इतर कर्तव्यें सांभाळून वाचावें.

---

# फायदा काय ?

भूमितीची मांडणी पहिल्या प्रथम युक्लिडनें केली असें सांगतात. युक्लिड हा ग्रीसचा राहणारा. तो ज्या काळांत होऊन गेला त्या काळीं ग्रीसदेशांतल्या सर्व शिकलेल्या लोकांचीं डोकीं राजकारणानें भरून गेलेलीं होतीं. किंवा त्यांच्या डोक्यांत राजकारणाचे बटाटे भरले होते असें म्हटलें तरी चालेल. त्यामुळें भूमितीची कदर करणारा प्राणी दुर्मिळ च झाला होता. आणि युक्लिड तर भूमितीवर फ़िदा होता. तथापि आज ज्याप्रमाणें चरख्यावर फ़िदा झालेल्या एका माणसानें बऱ्या च मुत्सद्दी लोकांना डोकें खाजवावयास लावलें आहे त्याप्रमाणें युक्लिडनें हि पुष्कळ राजकारणी लोकांना रेघोट्या काढावयास लाविलें होतें. हररोज युक्लिडच्या घरीं भूमिति शिकावयास आलेल्या लोकांचा फड जमत असे आणि युक्लिड आपले शोध कुशलतेनें समजावून सांगत असे. बरेचसे राजकारणी लोक अश्या प्रकारें युक्लिडच्या नादीं लागलेले पाहून एका राजाला वाटलें, "आपण हि जाऊन पहावें, फायदा होईल." तो युक्लिडपाशीं येऊन एक हप्ताभर भूमिति शिकला. शेवटीं त्यानें युक्लिडला विचारलें, "मी आज सात दिवस झाले भूमिति

शकतों ह्याचा फायदा काय?" युक्लिड गंभीरपणें आपल्या एका शिष्याला म्हणाला, "अरे, ह्याला रोजीं चार आणेप्रमाणें सात दिवसांचे पावणे दोन रुपये देऊन टाक पाहूं." नंतर त्या राजाकडे वळून म्हणतो, 'तुमचें ह्या हप्त्याचें काम संपलें आहे. तुम्ही उद्यांपासून दुसरीकडे काम बघा." मुत्सद्दी राजा खजील होण्याऐवजीं पावणे दोन रुपये हातांत पडल्यामुळें खुश झाला असेल काय? आपली मनोवृत्ति ह्या ग्रीक राजासारखी बनली आहे.

हरएक गोष्टीचा फायदा पाहण्याची पुष्कळांना संवय जडून गेली आहे. सूत कांतण्यापासून काय फायदा येथून तों स्वराज्य मिळविण्यापासून काय फायदा येथपर्यंतचे सर्व प्रश्न विचारले जातात. ह्या फायदावादी लोकांनीं आपली फायदेशीर बुद्धि जरा पुढें चालविली तर ते तत्त्वज्ञानाचें शिखर गांठतील. तत्त्वज्ञानाच्या शिखरापासून हे लोक एक च प्रश्न मागें आहेत. तो प्रश्न म्हणजे "फायद्यापासून तरी फायदा कोणता?" हा होय. एक मुलगा आपल्या बापाला म्हणतो, "बाबा, गाईम्हशींचा फायदा आपल्याला रोज प्यायला सांपडतो; पण वाघ, सिंह, साप ह्यांचा काय हो फायदा?" बाप उत्तर देतो, "सगळी सृष्टि माणसाच्या फायद्यासाठीं आहे असा आपला विनाकारण गैरसमज होऊं नये हा च त्यांचा फायदा."

कालिदासानें एके ठिकाणीं मनुष्याला 'उत्सवप्रिय' म्हणून म्हटलें आहे. कालिदासाचें मनुष्यस्वभावाचें वाचन खोल होतें आणि म्हणून च तो कवि म्हणावयाचा. मनुष्याला उत्सव प्रिय वाटतात हा सर्वांचा च अनुभव आहे. पण ते कां प्रिय वाटतात? शाळेंतल्या मुलांना रविवारची सुट्टी प्रिय कां वाटते? सहा दिवस कोंडवाड्यांत राहून कोंडला गेलेला श्वास रविवारीं मोकळा करायला सांपडतो म्हणून. मनुष्याला उत्सव प्रिय कां असावे ह्याचें उत्तर असें च आहे. दुःखानें दाटलेलें

हृदय उत्सवाच्या निमित्तानें मोकळें होतें. आमच्या घरीं अठरा विश्वें दारिद्र्य असतें म्हणून च मुलाचें लग्गीन जमलें म्हणजे जेवणांत अठरा दुणें छत्तीस पदार्थ करायला आम्ही विसरत नाहीं. सारांश, मनुष्य उत्सवप्रिय आहे हें त्याचें जीवन दुःखमय असल्याचा पुरावा आहे. तसें च हल्लीं आपली बुद्धि केवळ फायदावादी बनली आहे हा आपल्या राष्ट्राची महान बौद्धिक हानि झाल्याचा पुरावा आहे.

सदासर्वदा फायद्याला शरण जाण्याचें तर्कशास्त्र आंगवळणीं पडल्यामुळें आपल्या समाजांतलें साहस च नाहींसें झालें आहे. त्यामुळें ब्राह्मणवृत्ति, क्षात्रवृत्ति आणि वैश्यवृत्ति ह्यांचा लोप झाल्यासारखा आहे. ब्राह्मण म्हणजे साहसाची मूर्ति. मृत्यूच्या परतीरावरची मौज पाहण्यासाठीं जीवनाची आहुति देणारा तो ब्राह्मण. फायदा म्हणणार, "मृत्यूनंतरचें जीवन कोणीं पाहिलें आहे? हातचें सोडून पळत्याच्या पाठीस कां लागावें?" फायद्याच्या कोशांत साहस हा शब्द च सांपडणें शक्य नाहीं. आणि सांपडला तरी 'मूर्खपणा' हा त्याचा अर्थ लिहून ठेवलेला असणार. फायद्याच्या कोशावरून जीवनाची गीता लावली म्हणचे फल-त्यागापेक्षां त्यागाचें फळ काय हा सवाल उत्पन्न होतो. अशा स्थितींत खऱ्या ब्राह्मणवृत्तीला वाव च कोठें राहणार? "त्याग करावा, साहस करावें, हें सर्व ठीक आहे". फायदावादी म्हणतो, "पण काय त्यागा-साठीं च त्याग करावा म्हणतां?" नाहीं, त्यागासाठीं त्याग नाहीं म्हणत. फायद्यासाठीं त्याग असें च कां होईना; पण तो फायदा केव्हां *मिळाला पाहिजे ह्याची कांहीं मर्यादा सांगशील कीं नाहीं?* किती दिवसांत फायदा मिळाला पाहिजे असा तुझा कायदा आहे? तो म्हणणार, "त्यागाच्या आधीं दोन दिवस मिळाला तर चांगला." समर्थांनीं 'जनाचा लालची स्वभाव' वर्णन करतांना कार्यारंभीं देवाचें नांव घ्यावें ह्या म्हणण्याचा अर्थ फायद्याच्या कोशावरून सांगितला आहे; "कार्यारंभीं देव, म्हणजे कांहीं तरी देव (देवो)". सारांश, फळ हा च

देव व तो काम करण्याच्या आधीं प्राप्त झाला पाहिजे ह्याचें नांव फायदेशीर तत्त्वज्ञान. जेथें देवाची ही दशा तेथें ब्राह्मणवृत्तीची गोष्ट च कश्याला पाहिजे ?

परलोकासाठीं इहलोक सोडून देणारें साहस हा तर शुद्ध वेडेपणा म्हणून त्याचा विचार च करावयाचा नाहीं. ह्याच्या खालोखाल म्हणजे क्षात्रवृत्ति उर्फ मिश्र वेडेपणा. इहलोकांतील च बायकामुलांच्या, शेजाऱ्यापाजाऱ्यांच्या किंवा देशाच्या रक्षणासाठीं मरण्यास तयार होणें ही क्षात्रवृत्ति. पण "आप मेला जग बुडाला" हें फायद्याचें सूत्र लावून पहा म्हणजे हा मिश्र वेडेपणा कसा तें समजेल. राष्ट्राचें रक्षण कश्यासाठीं किंवा स्वराज्य कश्यासाठीं ? माझ्या फायद्यासाठीं. तो मी च मेल्यावर स्वराज्याला घेऊन काय करतां ? इतकें म्हटलें म्हणजे क्षात्रवृत्तीचें साहस गेलें च.

आतां उरली वैश्यवृत्ति. पण वैश्यवृत्तीला हि कांहीं कमी साहस लागत नाहीं. इंग्रजांनीं सर्व जगांत आपला व्यापार फैलावला तो साहसाशिवाय फैलावला नाहीं. इंग्लंडमध्यें प्राय: कापसाचें एक देखील बोंड पैदा होत नाहीं. असें असून अर्ध्या अधिक हिंदुस्थानाला कापड पुरविण्याची करामत त्यानें करून दाखविली आहे. इंग्लंडच्या इतिहासांतील दर्यावर्दी मुसाफरीचें प्रकरण साहसांनीं भरलेलें आहे. कधीं अमेरिकेची मुसाफरी तर कधीं हिंदुस्थानची सफर, कधीं रशियादेशाला वळसा तर कधीं आशेच्या भूशिराचें दर्शन, कधीं नाईलनदीचा उगम तर कधीं उत्तर ध्रुवाचें टोंक, अश्या प्रकारें अनेक संकटमय साहसांच्या अंतीं इंग्रजांचा व्यापार सिद्ध झाला आहे. एवढें खरें कीं सदर व्यापार अनेक राष्ट्रांच्या गुलामगिरीला कारण झाल्यामुळें आज स्वतःच्या च मुळावर आला आहे. पण कांहीं झालें तरी साहसी स्वभावाचें कौतुक केलें च पाहिजे. आमच्यांत हें वैश्यवृत्तीचें साहस हि फारसें दिसत नाहीं. कारण ? फायदा दिसत नाहीं.

फायदा दिसणार च नाहीं. जोंपर्यंत तकलीफ सहन करण्याची तयारी झाली नाहीं तोंपर्यंत फायदा दिसणार नाहीं. फायद्याचें घर नुकसानीच्या उन्हांत बांधलेलें आहे.

---

# मतें आणि मतप्रचार

आपल्यांत हल्लीं मतभेद पुष्कळ दिसतात. मतभेद असण्यांत दोष कांहीं नाहीं. पण असणारा मतभेद आणि दिसणारा मतभेद ह्यांत फरक केला पाहिजे. मत म्हणजे स्वतंत्र मनाचें म्हणणें. आपलें मन स्वतंत्रपणें जें सांगेल तें आपलें मत. पण आपल्या मनाची स्थिति इंग्लंडच्या राजासारखी असते. इंग्लंडच्या राजाला स्वतंत्र म्हणणें कोठें आहे ? पार्लमेंटनें ठराव करावा, औपचारिक मंजुरीसाठीं राजेसाहेबांकडे तो जावा आणि ह्यांनीं त्यावर सही करून टाकावी. अशी तऱ्हा आपल्या मनाची आहे. इंद्रियें कांहीं तरी ठराव करतात आणि मन त्यावर सही करून टाकतें. एवढें च आहे कीं मनाचा स्वभाव तर्कशील असल्यामुळें सही करण्यापूर्वीं तें त्या ठरावाच्या समर्थनपर अशी कांहीं युक्ति तयार करून ठेवितें. त्याशिवाय त्याचें समाधान होत नाहीं. त्यापलीकडे इंद्रियांच्या म्हणण्याविरुद्ध तर्क चालविणें हें मात्र त्याच्या अधिकारांत जणूं नसतें च. साधकांनीं तर्क करावा तर तो नेहमीं वेदानुकूल च करावा अशी मर्यादा आहे. त्याप्रमाणें इंद्रियांना अनुकूल तर्क करण्याचें मनाचें व्रत असतें. अश्या प्रकारचीं मतें हीं वास्तविक मतें नव्हेत. ती फसवणूक आहे. पंहाटे उठण्याचा इंद्रियांना आळस. त्यामुळें मनाला हि तसें च

वाटतें. तें युक्तिपूर्वक म्हणूं लागतें, "पंहाटे उठणें चांगलें नाहीं. कारण, त्यामुळें दिवसभर पुरती जागृति राहणार नाहीं. शिवाय असें कीं पंहाटे उठणें ईश्वरी योजनेच्या विरुद्ध च नाहीं का ? मनुष्यानें पंहाटे उठावें असें ईश्वराला वाटत असतें तर त्यानें पंहाटेस प्रकाश दिला असता." इतकें झालें म्हणजे तें आपलें निश्चित मत झालें. हरएकाला मतस्वातंत्र्य पाहिजे असें आपण म्हणतों. पण स्वतंत्र मत ह्याचा खरा अर्थ आपणांस कळलेला नाहीं. इंद्रियांचा पगडा बसूं न देतां स्वतंत्र वृत्तीनें आपलें मन आपल्याला जें सांगत असेल तें आपलें स्वतंत्र मत. मत म्हणजे मनांत येईल तें नव्हे, पण मन आणील तें. हा मुद्दा लक्षांत ठेवला म्हणजे पुष्कळसे मतभेद झडून जातील.

इंद्रिय-निग्रह-पूर्वक आपल्याला जें निश्चितपणें वाटतें त्या आपल्या मताचा प्रचार करणें योग्य आहे. पण अश्या प्रकारचा प्रचार करण्याचें खरें साधन आचार, उच्चार नव्हे. उच्चारानें मतप्रचार करूं पाहणें हा मोह च होय. हा मोह आपल्यांत फार आहे. आपलें मत जर खरें असेल तर आपण त्याप्रमाणें वागल्यानें त्याचा आपोआप प्रचार होईल च. आपला सत्यावर विश्वास असला पाहिजे. सत्यामध्यें स्वतःचा प्रचार करण्याची स्वयंभू शक्ति आहे. सत्य सूर्याप्रमाणें स्वयंप्रकाशी आहे. सूर्य जसा झाकला जात नाहीं तसें सत्य हि झाकलें जात नाहीं. आचरण टाकून बाह्य उपायांनीं प्रचार करण्याचा प्रयत्न फुकट आहे. त्याचा कांहीं च परिणाम होऊं शकत नाहीं. त्यानें हिंसा वाढते आणि असत्याचा प्रचार होतो. प्रचाराला हि मर्यादा आहे. सूर्याची प्रचारक शक्ति किती जबरदस्त आहे ? पण तो हि मर्यादा सांभाळून असतो. त्यामुळें तो दुनियेचा 'मित्र' राहून प्रचार हि करूं शकतो. दार बंद करून कोणी निजला आहे तर सूर्य त्याची सेवा करण्यासाठीं त्याच्या दाराशीं येऊन उभा राहतो. पण दाराला धक्का देऊन आंत शिरत नाहीं. मात्र जरा दार किलकिलें झालें कीं सबंधच्या सबंध आंत

शिरला च. ही प्रचाराची मर्यादा होय. आपलें मत सत्य असलें तरी त्याचा स्वाभाविक रीतीनें च प्रचार झाला पाहिजे. मूक आचरण म्हणजे स्वाभाविक प्रचार. आचरणाचें मौन सुटलें कीं हिंसा दाखल होते. आणि हिंसा दाखल झाली कीं सत्य उडालें च. पाण्यानें जसा अग्नि विझतो तसें हिंसेनें सत्य विझतें. आणि आचरण टाकून प्रचार करण्याचा प्रयत्न म्हणजे नागडी हिंसा च. प्रचाराची घाई ही हि हिंसा च. आणि शिवाय अश्रद्धा, अज्ञान तर खरें च. किंवा दंभ कां म्हणू नये? लहान मुलें बीं पेरतात आणि जरा अंकुर फुटला कीं तो लवकर उगवावा म्हणून त्याला वर उपटतात. तसें च हें.

मत म्हणजे इंद्रियनिग्रही मनाचें म्हणणें, आणि त्याच्या प्रचाराचें साधन तें कृति. हे दोन सिद्धांत निश्चित झाले कीं सर्व आकाश निवळलें. कृतीबरोबर प्रसंगविशेषीं अल्प उक्ति आपण कल्पूं शकतों. पतिव्रता ज्याप्रमाणें पतीचें नाव घेत नाहीं त्याप्रमाणें कर्मयोगी आपल्या मताचा उच्चार टाळतो. पण दोन्ही पक्षीं आपण अपवाद कल्पूं शकूं. क्वचित प्रसंगीं आपलें मत मांडण्यास हरकत नाहीं. पण आपलें मत मांडावें, दुसऱ्याचें खंडन करण्याचा मोह टाळावा. मतप्रतिपादनांत आपलें मत मांडणें आणि दुसऱ्याचें खोडणें असे दोन भाग कल्पिले जातात. पण ते कल्पनेचे आहेत, खरे नाहींत. दिवा लावणें व अंधार झाडून टाकणें हीं जशीं दोन कामें तसले च हे दोन भाग. आधीं दोन भाग च खोटे. त्यांत हि पुन्हां आपला भर बहुतेक दुसऱ्याचें मत खोडण्यावर च ज्यास्त असतो. दुसऱ्याचें मत खोडलें कीं तेवढ्यानें आपलें मत सिद्ध झालें च असें होत नाहीं. आणि आपलें मत सरळ मांडलें म्हणजे दुसऱ्याचें मत खोडण्याची जरूर राहत नाहीं. भूमितीमध्यें युक्लिडनें कोठें च खोडाखोड न करतां थोडक्यांत सरळ सिद्धान्त मांडले आहेत. त्या सिद्धान्तांची आज दुनियेवर सत्ता चालते. दुसऱ्याचें मत खोडून काढण्यांत त्या मताविषयींचें सूक्ष्म प्रेम च असतें. भक्तिमार्गांत जसा प्रेमानें तसा

द्वेषानें हि ईश्वर मिळतो असें सांगतात. बिभीषण प्रेमानें तरला तर रावण द्वेषानें तरला अशी भाषा संत बोलतात. त्यांतला अर्थ हा च आहे. मिल्टननें 'पॅरडाईझ लॉस्ट' मध्यें सैतानाच्या अंगीं सात्त्विकतेचा तात्त्विक द्वेष दाखवून त्याच्याविषयीं वाचकांची सहानुभूति उत्पन्न केली आहे. सात्त्विकतेचा ज्याला मनापासून इतका द्वेष वाटतो त्याच्या मनांत सूक्ष्मरूपानें सात्त्विकता वसत आहे, तसें च तामसपणाचा जोरजोरानें निषेध करीत बसणाऱ्या माणसांत आंतून तामसपणा चिकटलेला आहे च, ह्यांत शंका नाहीं.

प्रचाराचें खरें साधन कृति हें च होय. तथापि ज्याप्रमाणें प्रसंगीं मतप्रतिपादनाची जरुरी कल्पून घेतली त्याप्रमाणें मतप्रतिपादनांतून हि क्वचित दुसऱ्याच्या मतांतील चूक दाखविण्याचा प्रसंग कल्पितां येईल. पण दुसऱ्याचें मत खोडून काढणें निराळें आणि दुसऱ्याला च खोडून काढणें निराळें. एखाद्या मतांतील असारता दाखवितांना त्या मनुष्याला हि मध्यें च गुंतवून टीका करणें गैर आहे. नारळाची कवची फोडून अगदीं आंतून खोबरें घ्यावें त्याप्रमाणें मनुष्याचें मत, चुकीचें वाटल्यास, खोडून आंतला माणूस ग्रहण करतां आला पाहिजे. नदीचें वळण वांकडें असलें तरी ज्याप्रमाणें पाणी वांकडें असत नाहीं, किंवा भाकरी वाटोळी असली तरी तिची गोडी वाटोळी असत नाहीं, त्याप्रमाणें मनुष्याचें मत जरी कदाचित दूषित असलें तरी आंतला माणूस दूषित नसतो. नदीचें वळण किंवा भाकरीचा आकार हीं जशीं बाह्य परिस्थितीनें बनविलेलीं असतात त्याप्रमाणें मनुष्याच्या मताचें आहे. म्हणून च मताचा विचार करतांना माणूस बाजूला च राखला पाहिजे. पुष्कळ वेळां आपण असें पाहतों कीं जें मत आपल्याला एके काळीं खरें वाटत होतें तें च आज खोटें वाटतें. मनांत विचार आल्याबरोबर लिहून टाकण्याची ज्यांना संवय आहे अशा लेखकांच्या लेखनांत त्यांच्या मनाचीं वळणें कसकशीं बदलत

गेलीं हें दिसून येतें. म्हणून शहाणे लोक स्वतःचे विचार कृतींत उतरून अंगांत मुरून आणि हृदयांत भरून आपोआप बाहेर पडल्याशिवाय दुसऱ्या कोणत्या हि रीतीनें त्यांना प्रगट होऊं देत नाहींत. आतां आपलें च जुनें मत पण आज जर आपल्याला तें पसंत नाहीं तर तें आपण सोडून देऊं, प्रसंगीं खोडून हि काढूं. पण कश्या रीतीनें आणि कोणत्या भावनेनें? दुसऱ्याचें मत हि खोडण्याचा प्रसंग आल्यास जणू आपलें च जुनें मत आहे असें समजून तें खोडलें जावें. ह्या हि पेक्षां अधिक चांगला न्याय असा मांडतां येईलः आपल्या जुन्या मताकडे आपण कठोर नजरेनें पाहत नाहीं, पण पहावें; आणि दुसऱ्याच्या मताकडे कठोर नजरेनें पाहतों, पण पाहूं नये. मनुष्याचें खरें मत काय आहे हें त्याचें त्याला च नीटसें माहीत नसतें केळीच्या सोपटाप्रमाणें मनुष्याच्या मनावर एकावर एक अनेक मतांचे पापुद्रे बसलेले असतात. हे सर्व पापुद्रे सोलून पाहिल्यास त्याचें आंतलें मन अगदीं शुद्ध आणि सरळ असतें. शिवाय कालचें माझें मत जसें आज बदललें आहे तसें च आजचें हि मत, आज किती हि पक्कें वाटत असलें तरी, उद्यां बदलण्याचा संभव आहे ही गोष्ट ध्यानांत वागविली पाहिजे. ह्याचा अर्थ असा नाहीं कीं माणसानें संशयावस्थेंत रहावें. संशयांत मुळीं च राहूं नये. आज मला जसें वाटतें तसें जरूर वागावें. पण दुसऱ्याच्या मताचें खंडन करतांना आपल्या स्वतःच्या अनुभवावरून सिद्ध झालेली मतांची क्षणभंगुरता विसरूं नये. संपूर्ण ईश्वर कोणत्या हि व्यक्त स्वरूपांत मावूं शकत नाहीं. त्याचा एक लहानसा अंश च व्यक्त होतो. त्याप्रमाणें संपूर्ण सत्य माझ्या मतांत असणें शक्य नाहीं. तसें च ईश्वराचा अंश हि ज्याप्रमाणें अमुक एका वस्तूंत च राहतो असें नसून सर्व च वस्तूंत कमीज्यास्त प्रमाणानें राहतो त्याप्रमाणें सत्याचा अंश हि माझ्या च मतांत आहे असें नसून दुसऱ्याच्या हि मतांत थोडा तरी आहे च ही श्रद्धा हा च सत्याग्रहाचा आधार. आणि ही च सत्याग्रहाची मर्यादा.

कोणता हि मनुष्य, समाज, संस्था सर्वथा सत्यहीन किंवा ईश्वरहीन नाहीं. म्हणून च सत्याग्रहानें कोणत्या हि मनुष्याला, समाजाला, संस्थेला जिंकण्याची शक्यता. हा सत्याग्रहाचा आधार. कोणता हि मनुष्य, समाज, संस्था सर्वथा सत्यहीन किंवा ईश्वरहीन नाहीं. म्हणून च आपल्या दृष्टीनें असत्यवश झालेल्या मनुष्याचा, समाजाचा, संस्थेचा प्रतिकार करतांना आपण अहिंसामय साधन च वापरलें पाहिजे. ही सत्याग्रहाची मर्यादा. सारांश, मनुष्याच्या मताचा विचार करतांना किंवा त्याच्या कृत्याचा प्रतिकार करतांना हि, त्या मनुष्याला त्याच्या मतापासून किंवा कृत्यापासून अलग करणें, हें सत्याग्रहाचें मुख्य कलम आहे.

आजच्या पवित्र दिवशीं हा बोध ग्रहण करण्याची सद्‌बुद्धि ईश्वर आपणांस देवो.

---

# कांहीं प्रश्न

एका मित्रानें अस्पृश्यतेविषयीं कांहीं प्रश्न विचारले आहेत. त्यांचीं उत्तरें देण्याचा प्रयत्न करतों.

प्रश्न १. नैमित्तिक अस्पृश्यता—सोयेर, सुतक, विटाळशी, शौचाहून आलेला, हजामत केलेला आणि सोवळ्याच्या बाबतींत ओवळा इत्यादींची—मानायची ना?

उत्तर—'अपवित्र'-भावनेनें मुळीं च मानावयाची नाहीं. 'अस्वच्छ'-भावनेनें कितपत मानावयाची हें 'निमित्ताच्या' स्वरूपावर अवलंबून राहील. म्हणजे त्यांत तारतम्य पहावें लागेल. प्रश्नांत

विचारल्याप्रमाणें सर्व निमित्तांना सरसकट एक च न्याय लावतां येणार नाहीं. उदाहरणार्थ, विटाळशीची अस्पृश्यता आणि हजामत केलेल्याची अस्पृश्यता ह्यांची स्थिति सारखी नाहीं. 'सोवळ्याओवळ्याच्या' बाबतींत तुकारामाप्रमाणें 'सोवळ्याओवळ्या राहिलों निराळा' असें म्हणतां आलें तर चांगलें. सुतकांत मनोमालिन्य आणि रोगप्रचार ह्यांचा सवाल आहे. ह्यांतील तारतम्य सुटलें कीं अधर्म झाला. तारतम्य म्हणजे च 'निमित्त.' निमित्तांत देशकाल हि येतात च. ह्या सर्वांचा अस्पृश्यतानिवारणाशीं बिलकुल संबंध नाहीं.

प्रश्न २. नैमित्तिक अस्पृश्यता जर मानावयाची तर ती न पाळणारे वर्ग अस्पृश्य ठरत नाहींत काय? उदाहरणार्थ, मुसलमान विटाळशीचा विटाळ मानीत नाहींत. त्यांना शिवणें म्हणजे अप्रत्यक्षपणें विटाळशीला शिवणें नव्हे काय? आम्ही सध्यां शिवतों तें शिथिलपणामुळें. ह्या शिथिलपणाला च शास्त्रमान्यता द्यावयाची का? कुणबीवगैरे सुद्धां शौचाचे नियम पाळीत नाहींत. हें—जर नैमित्तिक अस्पृश्यता पाळावयाची तर—त्यांच्या नित्य अस्पृश्यतेचें पुरेसें कारण ठरत नाहीं का?

उत्तर—विटाळशीच्या विटाळांत स्वच्छतेपेक्षां हि ब्रह्मचर्यरक्षणाचा मुद्दा आहे. त्यामुळें विटाळशीच्या नैमित्तिक अस्पृश्यतेंतून ती न मानणाऱ्या मुसलमानांची नित्य अस्पृश्यता निघत नाहीं. शिवणें म्हणजे च 'प्रत्यक्ष' शिवणें. शिवण्यांत अप्रत्यक्षपणा आला कीं शिवणें उरलें नाहीं. अस्वच्छतेच्या मुद्द्यावर कोळश्याला शिवूं नये असें ठरलें तरी कोळश्याला शिवलेला जो चिमटा त्याला न शिवण्याचें कांहीं कारण नाहीं. सारांश, अस्वच्छतेच्या मुद्द्यावर उभारलेल्या नैमित्तिक अस्पृश्यतेची लांबण लावणें अयोग्य आहे. जे लोक स्वच्छतेचे नियम पाळत नाहींत (कारण त्यांना ते शिकविले गेले नाहींत) त्यांना अस्पृश्य करून ठेवणें म्हणजे अस्वच्छतेला कायमची मान्यता देण्या-

सारखें आहे. मलबारचा ब्राह्मण अत्यंत सोवळा समजला जातो. त्यांतून 'नंबुद्री'च्या डोक्यावर तर सोवळेपणाचे पांचपंचवीस पापुद्रे असावयाचे. पण त्यांचे स्वच्छतेचें नियम हि सगळे आरोग्य-शास्त्राला मानवतील च असें नाही. तिकडचे ब्राह्मणवगैरे सर्व, पाण्याचें भांडें घेतल्याशिवाय शौचाला बाहेर एखाद्या तळ्याच्या कांठीं जातात. शौचाचें झालें म्हणजे तळ्याच्या पाण्यांत च धुऊन साफ होतात. त्या च तळ्यांत स्नान हि करतात. मोठीं, खोल आणि पद्धतशीर बांधलेलीं कांहीं तळीं असतात त्यांची हि ही च स्थिति. मात्र ह्या 'सवर्णा'च्या पवित्र तळ्यावर अवर्ण (म्हणजे अंत्यज वगैरे) येऊं शकत नाहींत! हा देखावा मीं स्वतः डोळ्यांनीं पाहिला आहे. हे ब्राह्मण इतर सर्व प्रकारें अतिशय स्वच्छ असतात. मुद्दा इतका च कीं स्वच्छ मानलेल्या लोकांत हि अस्वच्छ चाली असतात. त्या शिक्षणानें नाहींश्या होतील आणि केल्या पाहिजेत. पण त्यांतून अस्पृश्यता काढणें परम पाप होय.

प्रश्न ३. बेटीव्यवहार व रोटीव्यवहार ह्यांवरील मर्यादांप्रमाणें स्पर्शव्यवहारावरील मर्यादा हि हिंदुधर्माचें अंग नाहीं काय?

उत्तर—अहिंसा किंवा दयाभाव ही हिंदुधर्माची परम मर्यादा आहे. आजची अस्पृश्यता ह्या मर्यादेचा भंग करणारी असल्यामुळें अधर्मरूप आहे. तिला हिंदुधर्मांत जागा नाहीं. आपलें शरीर अमंगळ वस्तूंनीं भरलेलें आहे हें लक्षात घेऊन प्रत्येकानें दुसऱ्याशीं लगट करूं नये, नम्रतेनें असावें, अश्या स्वरूपाची योगशास्त्रात सांगितलेली स्पर्श-व्यवहारावरील मर्यादा ही हिंदुधर्माचें अंग आहे.

प्रश्न ४. आमचे एक जोडीदार महारवाड्यांत भजनाला येतात. अंत्यजांच्या शिक्षणासाठीं कोणतें हि काम करायला त्यांची तयारी असते. अंत्यजांना आपण अस्पृश्य मानतों असें त्यांना ते कळूं हि देत नाहींत. परंतु घरीं येतांना मात्र स्नान करून मग च घरांत येतात. त्यांचे संबंधीं तुम्ही काय म्हणाल?

उत्तर—त्यांचे पूर्वसंस्कार लक्षांत घेऊन त्यांच्या ह्या निरपेक्ष सेवेबद्दल मी कृतज्ञ राहीन आणि आशा करीन कीं आज त्यांच्या मनांत जो कांहीं आडपडदा राहून गेला आहे तो कालांतरानें ह्या च सेवेच्या योगानें नाहींसा होईल.

प्रश्न ५. सर्वोदयाच्या दृष्टीनें कांहीं उच्च वर्णीयांनीं अंत्यज-सेवा पत्करून अंत्यजांत ओतप्रोत व्हावें, त्यांना शौचाचार शिकवावे, त्यांची राहणी सुधारेपर्यंत त्यांचे बरोबर आपणांस हि अस्पृश्य लेखून घ्यावें (अश्याला मी तयार आहें) कीं आजच्या स्थितींत च अंत्यज स्पृश्य आहेत असा आग्रह धरावा ?

उत्तर—सर्वोदयाच्या दृष्टीनें प्रत्येक उच्चवर्णीयानें अंत्यजसेवेचें व्रत घेऊन अंत्यजांत ओतप्रोत व्हावें, स्वतः सत्य शिकून त्यांना स्वच्छता शिकवावी आणि आपली विचारसरणी सुधारण्यासाठीं आजच्या स्थितींत हि प्रत्येक अंत्यजाचा स्पर्श 'विठ्यामहाराच्या' स्पर्शाइतका पवित्र आहे अशी भावना करावी.

प्रश्न ६. अंत्यजांना सरास स्पृश्य करण्यापेक्षां एखादा 'संस्कार' तयार करून तो ज्यांचा होईल त्यांना च केलें तर ? अश्या शुद्धि-संस्कारामध्यें शुद्धांनीं स्वच्छतेचे अमुक अमुक नियम पाळले पाहिजेत—जसें, घाण काम आटोपल्यावर स्नान—असा निर्बंध घालावा ?

उत्तर—हिंदुधर्म वांचावयाचा असेल तर असल्या संस्काराच्या दंभांतून बाहेर पडलें पाहिजे.

प्रश्न ७. छात्रालयांत अंत्यज विद्यार्थ्यांना दाखल करावें असें तुम्ही म्हणतां तें मला हि मान्य आहे. छात्रालयांत विद्यार्थी चोवीस तास आमचे देखरेखीखालीं असून पूर्णपणें आमच्या ताब्यांत असतो.

परंतु २० तास घरीं राहून ४ तास शाळेंत येणाऱ्या लहान मुलांना समान वयाच्या अंत्यज मुलांशीं मिसळूं देण्यांत थोडासा धोका नाहीं काय?

उत्तर---पुष्कळांना विद्यालयांत अंत्यज आला तरी चालतो. पण छात्रालयांत चालत नाहीं. हा प्रश्न विचारणाराचें म्हणणें अगदीं उलट आहे. ह्याचा अर्थ इतका च कीं हा प्रश्न अस्पृश्यतानिवारणाच्या दृष्टीनें विचारलेला नसून शिक्षणशास्त्राच्या दृष्टीनें विचारलेला आहे. त्या च दृष्टीनें त्याचा विचार केला पाहिजे. कोणतीं हि दोन माणसें एकत्र होण्यांत कांहीं धोक्याचा संभव आहे च. तसा च तो ह्या हि बाबतींत आहे. त्याहून विशेष धोका असण्याचें कारण नाहीं. अनुभवावरून हि असें च दिसतें. अंत्यज आणि इतर ह्यांच्या सहशिक्षणांतून दोघांना हि फायदा च होतो असें आढळून आलें आहे.

---

## गीता-जयंती

कुरुक्षेत्राच्या रणभूमीवर भगवंतांनीं अर्जुनाला गीता उपदेशिली तो दिवस मार्गशीर्ष शुद्ध एकादशीचा होता असें विद्वानांनीं ठरविलें आहे. तें खरें धरून चालण्यास हरकत नाहीं. त्यामुळें "मासानां मार्गशीर्षोऽहम्"---महिन्यांमध्यें मार्गशीर्षमहिना ही माझी विभूति आहे---ह्या वचनाला विशेष अर्थ येतो. ह्या दिवशीं हिंदुस्थानांत सर्वत्र गीतेचें स्वाध्याय-प्रवचन व्हावें अशी सूचना करण्यांत आली आहे.

ही सूचना योग्य च आहे. पण गीताधर्माचा प्रचार नुसत्या प्रवचनानें किंवा श्रवणानें होणें नाहीं हें लक्षांत ठेवणें जरूर आहे. गीता हें बोलाचें शास्त्र नाहीं, आचरणाचें शास्त्र आहे. त्याचा प्रचार आचरणाशिवाय दुसऱ्या कोणत्या हि उपायानें होणार नाहीं. गीतेचा धर्म हा खुल्ला धर्म आहे. अमक्याला म्हणून त्याचें श्रवण करण्याची मनाई नाहीं. ज्या स्त्री-वैश्य-शूद्रांना वेदांच्या खोल विहिरींतून पाणी काढण्याची शक्ति नाहीं त्यांना मनमुराद पाणी मिळण्याची सोय गीतेच्या वाहत्या झऱ्यांत होण्यासारखी आहे. गीता-माउलीपाशीं लहान-मोठयाचा भेद नाहीं, पण खऱ्याखोटयाचा भेद आहे. तपश्चर्या करण्याची ज्याची तयारी नाहीं, ज्याच्या हृदयांत भक्तीचा ओलावा नाहीं, श्रवणाविषयीं ज्याला तळमळ नाहीं किंवा ज्याच्या बुद्धींत निर्मत्सरभाव नाहीं, त्याच्यापुढें हें रहस्य चुकून सुद्धां प्रकट करूं नको म्हणून भगवंतांनीं अर्जुनाला बजावलें आहे.

गीतेचा प्रचार म्हणजे निष्काम-कर्माचा प्रचार. गीतेचा प्रचार म्हणजे भक्तीचा प्रचार. गीतेचा प्रचार म्हणजे त्यागाचा प्रचार. हा प्रचार प्रथम आपल्या आत्म्यांत झाला पाहिजे. ज्या दिवशीं त्यानें आत्मा परिपूर्ण भरून वाहूं लागेल त्या दिवशीं तो दुनियेंत हि पसरल्याशिवाय राहणार नाहीं. गीतेवर आजपर्यंत हिंदुस्थानांत प्रवचनें कांहीं कमी झालेलीं नाहींत. नाना प्रकारच्या टीका हि लिहिल्या गेल्या आहेत. गीतेच्या तात्पर्यासंबंधीं वर्तमानपत्रांतून वगैरे जुन्यानव्या शास्त्री-पंडितांचे वादविवाद हि पुष्कळ झाले आहेत. पण त्याच्या योगानें साक्षात निष्काम कर्माला कांहीं चालना मिळाली आहे असा अनुभव नाहीं. उलट त्यानें रजोगुणाचा मात्र जोर वाढला. मणभर चर्चेपेक्षां कणभर आचरण श्रेष्ठ आहे. "प्रभाते मनीं राम चिंतीत जावा" हें वाक्य लिहिणाराचा उद्देश लोकांनीं तें घोकत बसावें हा नाहीं, पण प्रभातकाळीं उठून रामाचें चिंतन करावें हा आहे.

गीतेचें रहस्य गीतेच्या पुस्तकांत झाकलेलें नाहीं. तें उघडें आहे. भगवान् स्वतः च सांगतात कीं मीं तें सूर्याला सांगितलें आहे. ज्याला डोळे असतील तो तें पाहूं शकतो इतकें तें उघडें आहे. आणि झाकलेलें च असलें तर तें गीतेच्या पुस्तकांत खास च झाकलेलें नाहीं. तें हृदयाच्या गुहेंत झाकलेलें आहे. ह्या गुहेच्या तोंडाशीं दुर्वर्तनाचे दगडगोटे सांचले आहेत. ते दूर करून आंत पाहिलें पाहिजे. त्यासाठीं मेहनत करावी लागेल. गीता 'कुरु'-क्षेत्रांत सांगितली आहे. संस्कृतांत 'कुरु' म्हणजे कर्म कर असा अर्थ आहे. कुरुक्षेत्र म्हणजे कर्माची भूमि. ह्या कर्माच्या भूमिकेवर गीता सांगितली आहे. आणि तेथें च मेहनतीच्या कानानें ती ऐकावयाची आहे.

पुष्कळांना वाटतें, मिशनरी लोक ज्याप्रमाणें बायबलच्या प्रती फुकट वाटतात, त्याच्या वर प्रवचन करीत हिंडतात, कोणी ऐको न ऐको तोंडाची टकळी चालू च राखतात, तसें आपण गीतेविषयीं केलें पाहिजे म्हणजे आपल्या धर्माचा प्रचार होईल. पण हा नुसता वहीम आहे. मिशनऱ्यांनीं जो फार च थोडा खरा धर्मप्रचार केला आहे तो त्यांच्यांतल्या कांहीं सज्जनांच्या सेवेचें फळ आहे. बाकीचा त्यांचा धर्म–प्रचार म्हणजे दंभ आहे. पण ह्या दंभानें त्यांच्या कार्याची हानि झाली आहे. त्यांचें अनुकरण करण्यानें आपल्याला कांहीं लाभ होणार नाहीं.

म्हणून गीता–जयंतीच्या दिवशीं गीतेच्या प्रचाराच्या बाह्य कल्पनेवर जोर न देतां हातून कांहीं तरी निष्काम सेवा होईल असा प्रयत्न करावा. त्याबरोबर भक्तियुक्त चित्तानें यथाशक्ति गीतेचा पाठ करणें उपयुक्त आहे च.

---

# संतांचा भागवत–धर्म

भगवत्प्राप्तीसाठीं प्रवृत्त झालेल्या विश्वोद्धारक भागवतधर्माचा जयजयकार असो! साक्षात भगवंतांनीं गीता–मुखानें उपदेशिलेल्या दिव्य भागवत–धर्माचा जयजयकार असो! प्रह्लादादि परम भागवतांनीं आचरलेल्या प्रेमळ भागवत–धर्माचा जयजयकार असो!

भागवत–धर्म हें वैदिक धर्माचें अत्यंत मधुर स्वरूप होय. पण ह्या भागवत-धर्माची आमच्या संतांनीं जी 'मराठी' म्हणजे सुलभ आवृत्ति काढली तिच्यांत मधुरतेची सीमा झाली. संतांच्या भागवतधर्मानें मूळ भागवतधर्माच्या माधुर्यांत क्रांतिकारक भर घातली आहे.

भागवत-धर्म म्हणजे 'देव, भक्त आणि नाम' ह्यांचा त्रिवेणी-संगम आहे. देव साध्य, भक्त साधक आणि नाम साधन. ह्या तिहींच्या कल्पनांत संतांनीं माधुर्य आणि औचित्य ह्यांची सुंदर जोड घातली आहे.

मूळ भागवत-धर्मांतली देवाची कल्पना साधी च आहे. तिच्या आसपास गूढतेचें जाळें मुळीं च पसरलेलें नाहीं. पण संतांचा बिठोबा नुसता साधा च नव्हे पण अगदीं भोळा आहे. इतका कीं 'विठोबा' म्हणजे 'विटेवरचा ठोंब्या' असें म्हटलें तरी चालेल. पण ह्या ठोंब्यानें आजपर्यंत जितके दगड तारले तितके तारण्याचें भाग्य कोणत्या हि 'सच्चिदानंदाला' किंवा 'नित्य-शुद्ध-बुद्ध-मुक्ताला' प्राप्त झालेलें नाहीं. संतांच्या कृपेनें अर्जुनाच्या रथावर बसलेली देवता पुंडलिकाच्या विटेवर उभी राहिली. संतांच्या कृपेनें यमुनेच्या कुंजवनांत गोपींना अहोरात्र

तिष्ठत ठेवणारा खेळगडी चंद्रभागेच्या वाळवंटांत भक्तांसाठीं अठ्ठावीस युगें वाट पाहूं लागला. संतांच्या कृपेनें तिन्ही भुवनें पोटांत सांठवणारा प्रभु म्हारांपोरांच्या ओटांत सांपडूं शकला. ही संतांच्या कृपेची करामत आहे. तिनें प्रत्यक्ष देव बदलला. आणि देव बदलल्यामुळें दुनियेचा रंग पालटला. रेडे ऋषि, महार श्राद्ध-देव, गाढवावर गंगा, कुंभार कुळगुरु, वाण्याघरीं वेद—सर्व सृष्टि चमत्कारमय झाली!

जसा संतांचा 'देव' तसा च त्यांचा 'भक्त'. बिलकुल सीधा, व्यवहारांत वागणारा पण शुद्ध चित्ताचा, मजुरी करून राबणारा, प्रेमळ, प्रांजळ, सरळ, अगदीं अडणीवरचा पण देवाच्या हातांतला असा 'भक्त' संतांनीं कल्पिला आहे. भक्ताविषयीं लोकांना वाटणारा 'बाऊ' संतांनीं अजीबात काढून टाकला. भक्त म्हणजे 'सेवावृत्तीचा मजूर' अशी सर्वांना समजण्यासारखी, अनुकरणाला सुलभ व्याख्या झाली. पण त्यामुळें देवाची धांदल उडाली. त्याला आयता नैवेद्य मिळेनासा झाला. नैवेद्याबरोबर मजुरीचा हि वांटा थोडाबहुत पत्करणें भाग आलें. जनीच्या घरीं दळण दळूं लागावें तेव्हां नैवेद्याची वानगी मिळावयाची. गोऱ्या कुंभाराची माती मळून द्यावी तेव्हां दुधाच्या प्याल्याचें दर्शन व्हावयाचें. नाहींतर नैवेद्य बंद. पूर्वीं योगाभ्यासाचें तत्त्व होतें. तेव्हां क्षीरसागरावर योगनिद्रेंत घोरत पडण्याची सोय होती. पण आतां योगाभ्यासाऐवजीं अंगमेहनतीचें, मजुरीचें, शरीर-कष्टाचें तत्त्व दाखल झालें. त्यामुळें आयता नैवेद्य मिळण्याची सोय राहिली नाहीं. पण तशी नैवेद्याची रुचि हि वाढली. योग्य मजुरीनंतर मिळालेला नैवेद्य देव आतां प्रेमानें खाऊं लागला.

देवाला घाबरून जाण्याचें कांहीं खास कारण नव्हतें. संत ह्या थरावर गोष्ट आणणार इतकी स्पष्ट नसली तरी अंधुक कल्पना त्याला असली पाहिजे. म्हणून च भागवत-धर्माच्या जुन्या आवृत्तीच्या वेळीं त्यानें मजुरीचा थोडाफार अभ्यास करून ठेवला असावा. गाई राख,

गोठा साफ कर, उष्टया पत्रावळी काढ, घोडयांना खरारा कर वगैरे पुष्कळ च कामें त्यानें करून पाहिलीं होतीं. पण संतांनीं त्याचा हा नित्याचा कार्यक्रम ठरवून टाकला एवढें च.

देव आणि भक्त ह्यांना जोडणारा सांधा म्हणजे नाम. नाम खरें. पण कोणाचें ? हा प्रश्न वैदिक काळापासून विचारला गेला आहे. "कस्य वयं मनामहे चारु नाम"—कोणाच्या मधुर नामाचें आम्हीं चिंतन करावें ?—संतांचें उत्तर असें : "देव आणि भक्त दोघांच्या नामाचें चिंतन करावें. पण आधीं भक्ताच्या नामाचें करावें." 'देव परते सारून' भक्तांची पूजा आधीं केली पाहिजे असें संतांच्या भागवत-धर्माचें कलम आहे. ह्यांत मधुर औचित्य आहे. ज्या न्यायानें 'सच्चिदानंदा' पेक्षां विटेवरचें ध्यान श्रेष्ठ ठरलें त्या च न्यायानें विटेवरच्या ध्यानापेक्षां विटेसमोरचें ध्यान श्रेष्ठ कसें नव्हे ? 'ग्यानबा तुकाराम' ह्यांत जी जादू आहे ती 'विठोबा रखुमाई' मध्यें आहे काय ?

आषाढी एकादशीच्या पवित्र दिवसाच्या निमित्तानें भागवत-धर्माविषयीं सहज सुचलेले चार विचार लिहून टाकले. ते देवाला अर्पण करून मोकळा होतों.

---

# एक पत्र

आषाढ शु० १२।'४८

चि०......

तुझें पद्धतशीर माहिती देणारें पत्र वाचून आनंद झाला. त्यांतल्या त्यांत तिकडील पिकापाण्याची आणि शेतकीची माहिती नीट काळजीपूर्वक लिहिली ह्याचें कौतुक वाटलें. वास्तविक, ह्यांत कौतुक वाटण्यासारखें कांहीं च नसावें. कारण, मनुष्याच्या जीवनाचा ज्या वस्तूवर मुख्य आधार त्यासंबंधीं माहिती राखणें हें त्याचें कर्तव्य च आहे. पण हल्लीं जीवनाची रचना कृत्रिम झाल्यामुळें आणि शिक्षणाचें वळण हि ह्या कृत्रिमतेला पोषक असें च राहिल्यामुळें पुष्कळांना अश्या तऱ्हेची माहिती राखण्याविषयीं जबाबदारी वाटत नाहीं. इकडे ओल्या किंवा सुक्या दुष्काळामुळें शेतकरी हवालदिल झालेला असावा आणि त्याची माहिती हि आम्हांला नसावी—मग सहानुभूति दूर च—अशी आमची कींव करण्यासारखी स्थिति आहे. ही स्थिति पालटल्याखेरीज स्वराज्याची आशा करणें फुकट आहे. काबाड-कष्ट करणाऱ्या गरीब जनतेच्या आत्म्यांत आमचा आत्मा मिसळून गेला पाहिजे. असा जेव्हां आमचा आत्मा दरिद्रनारायणाच्या आत्म्याशीं समरस होईल तेव्हां पुंडलिकासाठीं परब्रह्म धावून आलें त्याप्रमाणें स्वराज्य हि आमच्या साठीं धांवून येईल. आम्हांला स्वराज्याची वाट पहावी लागणार नाहीं. स्वराज्य आमची वाट पाहील.

पण ज्या तुला आज अर्धें अधिक पत्र पावसाची माहिती कळविण्यांत खर्चीं घालावेंसें वाटतें त्या च तुझी एका काळीं काय स्थिति

होती? 'मिरीग' तर कोरडें च गेलें, पण 'अडदरा' देखील लागल्या. अजून पाऊस पडत नाहीं. शेतकऱ्यांचे डोळे सारखे आकाशाकडे लागून राहिले आहेत. अजून भगवंताची कृपा होत नाहीं. पावसाचा एक हि थेंब नाहीं. त्यामुळें बिचाऱ्यांच्या डोळ्यांतून अश्रूंचे थेंब बाहेर पडूं लागले आहेत. पण तुला त्याची काय कल्पना होती? आणि मला तरी काय कल्पना होती? आपली दोघांची सारखी च स्थिति होती. आज च तुला पावसाविषयीं माहिती लिहिण्याची इच्छा झाली आणि आज च मला ती वाचावीशी वाटली. पूर्वीं तूं हि अशी माहिती लिहिली नसतीस आणि मला हि ती वाचावीशी वाटली नसती. हा फरक कश्यानें झाला? कोणच्या यक्षिणीच्या कांडीनें विचारांचा इतका अजब पालट घडवून आणला? ही यक्षिणीची कांडी म्हणजे 'चरखा'.

शेतकऱ्याचें जीवन अत्यंत पवित्र जीवन आहे. कारण, त्याचा ईश्वराशीं पदोपदीं प्रत्यक्ष संबंध येतो. पाऊस वेळेवर पडला, वेळेवर पडला नाहीं, फार च ज्यास्त पडला, किंवा मुळीं च पडला नाहीं म्हणजे ईश्वराची करुणा भाकल्याशिवाय दुसरा इलाज राहत नाहीं. नांगर, वखर, कोयता, बीं, शेत वगैरे मनुष्याच्या आटोक्यांतल्या वस्तूंबरोबर ऊन, वारा, पाऊस, दंव, वगैरे केवळ ईश्वरी कृपेनें प्राप्त होणाऱ्या वस्तूंचा हि शेतकऱ्याच्या जीवनांत साक्षात आणि स्पष्ट संबंध येतो. बीजगणितांतल्या उदाहरणांत ज्याप्रमाणें अव्यक्तांशीं गांठ असावयाची (हा दाखला मुद्दाम तुला समजण्यासारखा, तुझ्या नित्य व्यवसायांतला म्हणून दिला आहे) त्याप्रमाणें शेतकऱ्याच्या जीवनाची स्थिति आहे. त्याचा कोणता हि अंदाज अपुरा च असावयाचा. मी म्हणून हटकून अमुक एक करीन च असें म्हणणें च अशक्य. 'देव कृपा करील तर' हें सांकेतिक वाक्य नेहमीं च अध्याहृत समजावयाचें. कोणत्या हि प्रकारच्या जीवनांतून हें वाक्य बाद करतां येण्यासारखें नाहीं च. पण शेतकऱ्याच्या जीवनांत त्याची रोज प्रचीत यावयाची. नांगरल्याशिवाय कांहीं च

व्हावयाचें नाहीं. पण नांगरून म्हणजे कांहीं होईल च अशी हि खात्री देतां यावयाची नाहीं. जीवन तर पुरुषार्थानें भरलेलें. पण 'देव कृपा करील तर' हें वाक्य त्या पुरुषार्थाच्या डोक्यावर नेहमीं लटकत असावयाचें. शेतकऱ्याचें जीवन म्हणजे नम्र प्रयत्नवादाचें शिक्षण.

म्हणून आपल्या प्राचीन ऋषींना शेतकीविषयीं फार प्रेम वाटे. वेदामध्यें शेतकी करण्याविषयीं स्पष्ट आज्ञा च केली आहे. सुंदर ध्यानांत ठेवण्यासारखें वाक्य आहे :

अक्षैर्मा दीव्यः कृषिमित् कृषस्व ।
वित्ते रमस्व बहु मन्यमानः ॥

"इंद्रियांचे खेळ खेळूं नको. शेतकी च कर. शेतकी करून जें कांहीं थोडेंसें मिळेल तें च पुष्कळ समजून आनंद मान." इंद्रियांचे खेळ खेळूं नको हें वाक्य वाचून गीतेमध्यें पापमय जीवन व्यतीत करणाऱ्या (अघायु) पुरुषाला इंद्रियाचे खेळ खेळणारा म्हटलें आहे त्याची तुला आठवण झाल्याशिवाय राहणार नाहीं. शेतकीसारखें कांहीं तरी शारीरिक कष्टाचें काम केल्याशिवाय जगणें म्हणजे इंद्रियांचे चोचले करणें होय असें वैदिक ऋषींचें मत दिसतें. शेतकीमध्यें शरिराला कचकचीत मेहनत मिळत असल्यामुळें इंद्रियनिग्रह स्वाभाविक होतो हें तर आहे च. पण ह्याशिवाय शेतकींत इंद्रियनिग्रहाला अनुकूल असा आणखी एक मुद्दा ऋषींनीं पाहिला आहे. तो हा कीं शेतकी करून पावड्यावारी पैसा मिळविण्याची शक्यता नाहीं. कृषिदेवतेपाशीं "पोटापुरतें देईं। मागणें लई नाहीं, लई नाहीं" ह्याहून अधिक मागतां च येणार नाहीं. म्हणून शेतकी करून जें थोडेंसें मिळेल त्यांत आनंद मानावा अशी ऋषींची शिकवण आहे. म्हणजे ह्या हि बाजूनें शेतकी इंद्रिय-निग्रहाला साधन आहे. शिवाय शेतकींतून मिळालेलें 'थोडें' सुद्धां 'बहु' आहे. कारण तें थोडें झालें तरी नवीन पैदाशीचें आहे.

बुद्धि विकण्याचे व्यवसाय करून धनाचे ढीग मिळविले तरी त्यांत नवीन कमाई नाहीं. द्रव्याचें नुसतें स्थलांतर आहे. त्यानें एक पिशवी भरल्यानें दुसरी पिशवी रिकामी होण्यापलीकडे जगाच्या समृद्धींत भर अशी पडत नाहीं. परंतु शेतकऱ्याच्या कमाईच्या हरएक कणांत साक्षात लक्ष्मीचा निवास आहे. लक्ष्मी निराळी, पैसा निराळा. पैसा काय! चोरीनें मिळतो, लुटीनें मिळतो, सट्टेबाजीनें मिळतो, लबाडीनें मिळतो, तोंडपाटिलकीनें मिळतो, दंडुक्यानें मिळतो, तोफांनीं मिळतो, तुफानांनीं मिळतो, राजाच्या शिक्यानें मिळतो आणि कश्यानें मिळत नाहीं? पण लक्ष्मीचा एक कण हि मिळविण्याचें सामर्थ्य कोणत्या हि पंडिताच्या तोंडपाटिलकींत नाहीं, कोणत्या हि दांडगोबाच्या दंडुक्यांत नाहीं किंवा कोणत्या हि राजराजेश्वराच्या शिक्क्यांत नाहीं. विष्णूच्या कृपेचा पाऊस पडेल तेव्हां च लक्ष्मी प्रगट होईल. पण शेतकऱ्याच्या प्रयत्नाचा नांगर चालल्याशिवाय विष्णूची कृपा होणें हि अशक्य आहे. अंगांतून घामाच्या धारा काढाव्या तेव्हां च पर्जन्याच्या धारांची वाट पहावी. "यज्ञात् भवति पर्जन्यः" ह्याचा अर्थ हा च. म्हणून जेथें शेतकऱ्याचा यज्ञ, आणि जेथें विष्णुकृपेचा पाऊस तेथें च लक्ष्मीदेवीचा निवास.

ऋषींना शेतकीविषयीं निरतिशय प्रेम वाटत असे. त्यामुळें शेतकीची इहलोकांतील देवता जी बैल त्याविषयीं त्यांना अत्यंत आदर असे. आज जर कोणाला 'तूं माणसांतला बैल आहेस' म्हटलें तर कसें वाटेल? पण भगवंतांनीं अर्जुनाला अगदीं प्रेमानें 'पुरुषर्षभ' ही पदवी अर्पण केली आहे. 'ऋषभ' (म्हणजे बैल) आणि 'ऋषि' हे शब्द हि मुळांत सरासरी सारख्या च अर्थाचे आहेत. दोन्हीमध्यें 'ऋष्' हा एक च धातु आहे. ऋषभ नांगराच्या पुढचा आणि ऋषि नांगराच्या मागचा एवढा च फरक. माणसांना 'बैल' अश्या अर्थाची नांवें ठेवीत असत. उदाहरणार्थ, जैनांच्या चोवीस तीर्थंकरांपैकीं पहिले तीर्थंकर 'ऋषभ–देव' म्हणजे बैलोबा. कारुण्यावतार शाक्यमुनि

'गौतम बुद्ध' म्हणजे जागा झालेला मजबूत बैल. वैदिक ऋषि 'गो-तम' आणि न्याय-शास्त्रकार 'गौतम' हा हि तो च प्राणी. पृथ्वीवरची कृषिदेवता बैल आणि स्वर्गांतली कृषिदेवता पर्जन्य. म्हणून दोघे हि वृषभ च म्हटले आहेत. वृषभ म्हणजे वर्षाव करणारा. वर्षाव एक पक्षीं मुताखताचा आणि दुसऱ्या पक्षीं पावसाचा. महाभारतांत वैदिक धर्माला बैलाची उपमा देऊन कृतयुगांत ह्या धर्मरूप बैलाचे चारी पाय शाबूत असतात, त्रेतायुगांत तीन, द्वापरांत दोन आणि कलियुगांत फक्त एक च पाय शाबूत असतो असें वर्णन केलें आहे. ('त्रेता' शब्दाचा तिनाशीं आणि 'द्वापर' शब्दाचा जसा दोनाशीं संबंध आहे तसा च 'कृत' शब्दाचा मुळांत चाराशीं संबंध असावा असें वाटतें. फ्रेंच 'कॉत्र' म्हणजे चार. इंग्रजी 'क्वॉर्टर' म्हणजे चवथा. ह्याचें मूळ 'कृत' हे असण्याचा संभव आहे.) ॐकाराचा महिमा सांगतांना उपनिषदांत त्याला 'वेदांतला बैल' अशी संज्ञा दिली आहे. आजचा पोळ्याचा सण वैदिक ऋषींना बैलांविषयीं वाटणाऱ्या उत्कट आदराचा एक मोडकातोडका अवशेष आहे.

बैलांविषयीं एवढा आदर. मग त्यांना जन्म देणाऱ्या गाईविषयीं काय वाटत असावें? गाईच्या शरिरांत ऋषींच्या दिव्य दृष्टीला सर्व देवतांचें एकत्र दर्शन होत असे. गाईला उपमा गाईची च. गाईचें सारें च पवित्र. स्मरण पवित्र, दर्शन पवित्र, स्पर्श तर परमपवित्र. गोमूत्रानें देवालय सारवावें. गोमूत्र पिऊन पाप घालवावें. गाईच्या गोठ्यांत संध्या करावी. गाईच्या दुधाचा देवाला नैवेद्य दाखवावा. गाईच्या तुपाच्या दिव्यानें देवाला ओवाळावें. ऋषींना गाईविषयीं वाटणाऱ्या पूज्यभावनेचा वारसा माझ्या प्रमाणें तुला हि मिळालेला आहे म्हणून अधिक लिहीत नाहीं. पण हा पूज्यभाव कृतींत कसा आणावा हें योग्य विचारानें ठरविलें पाहिजे. गाईची हल्लीं आपल्या हातून जी दुर्दशा होत आहे ती कशी थांबवावी हा प्रश्न

खोल अभ्यासानें सोडवावयाचा आहे. गाईची तुलना करावयाची च तर ती आईशीं करावयाची. पण त्यांत हि श्रेष्ठ कोण हें त्या गोपाळ कृष्णाला च पुसावें.

आणि गोपाळकृष्ण म्हणजे तरी कोण? गोपाळ म्हणजे गाई राखणारा हें उघड च आहे. पण कृष्ण म्हणजे कोण? 'कृषि' करणारा तो 'कृष्ण'. कृषि करणाऱ्या माणसाचें शरीर उन्हातान्हांत राबत असल्यामुळें त्याचा वर्ण काळासांवळा बनतो. त्यावरून कृष्ण म्हणजे काळा किंवा सांवळा हा अर्थ निघाला. मजुरांचा देव काळा च असावयाचा. गोरागोमटा देव मजुरांनीं कोठून काढावयाचा? मेघराजाच्या कृपेकडे ज्यांचे नेहमीं डोळे लागलेले असावयाचे त्यांनीं 'मेघश्याम' देवाची कल्पना करावी हें स्वाभाविक आहे.

आपण मूळ पावसापाण्याच्या हकीकतीवरून निघालों. नंतर कृषीचें महत्त्व तपासलें. पुढे ऋषींचें दर्शन घेऊन ऋषभदेवांची पूजा केली. शेंवटीं गोमातेचा जयजयकार करीत गोपाळकृष्णाचे पायीं मिठी मारली. आतां कोठें जावयाचें? देवाची भेट घेतल्यानंतर कोठें जायचें हि उरत नाहीं आणि यायचें हि उरत नाहीं. पण उरत च असलें तर आतां पत्र फार लांबलें ह्या भानावर यायचें. आणि एकदा ह्या भानावर आल्यानंतर आटोपतें घेतलें च पाहिजे.

तुझ्या पत्राला प्रतियोगी जबाब लिहावयाचा म्हणजे इकडच्या पिकापाण्याची माहिती कळवायास पाहिजे होती. पण ह्या पत्रांत तरी तसें करतां येत नाहीं च.

शेतकीविषयीं माहिती राखणें किंवा शेतकऱ्याविषयीं मानसिक सहानुभूति बाळगणें हें तर जरूर आहे च. पण शेतकऱ्याप्रमाणें शारीरिक श्रमाची कृति हि थोडी बहुत करणें अवश्यक आहे. ज्याला शेतांत

काम करण्याची सोय किंवा सवड असेल त्यांनें तसें करावें च. पण मजुरीचा राष्ट्रीय प्रतिनिधि म्हणून आणि शेतकऱ्याच्या फावल्या वेळेंतला एक च एक धंदा म्हणून चरख्याची रोज कमींत कमी अर्धा तास उपासना शक्य त्या सर्वांनीं केली पाहिजे. ही उपासना निरपवाद चालविण्याविषयीं सुचवून पत्र समाप्त करतों.

.......चे आशीर्वाद.

---

# तीन मुद्दे

कोणतें हि काम नीट व्हावयाचें म्हटल्यास त्याला तीन गोष्टींची जरूर असते. पहिली गोष्ट म्हणजे त्या कामांतला संपूर्ण वेग साधला पाहिजे. परीक्षेसाठीं प्रश्न विचारले जातात त्यांचीं उत्तरें ठरलेल्या वेळेच्या आंत लिहून झालीं पाहिजेत असा नियम असतो. ह्यांत महत्त्वाचा मुद्दा आहे. अमुक मैल कूच करून जावयाचें आहे एवढा च प्रश्न लष्करापुढें नसतो. पण अमुक वेळेच्या आंत अमुक मैल जावयाचें आहे असा मुदतबंदीचा प्रश्न लष्करापुढें असतो. जी गोष्ट लष्कराची ती च कमज्यास्त प्रमाणांत व्यवहारांतल्या सर्व उद्योगाला लागू आहे. रसोई करणारा मनुष्य रसोई चांगली करतो पण पांच माणसांची रसोई बनविण्याला त्याला पांच तास लागतात, तर त्याचें रसोई बनवणें निरुपयोगी आहे. काळाच्या प्रवाहांत मनुष्य सांपडलेला असल्यामुळें त्याला सर्व कामें ह्या प्रवाहाचें धोरण सांभाळून करावयाचीं असतात. म्हणून वेग साधणें हा कामांतला एक अवश्यक मुद्दा ठरतो.

दुसरा मुद्दा कामांतील सफाई किंवा नेटकेपणा. लष्कराचा च दाखला घेतला तर अमुक मैल अमुक वेळांत कूच करून जावयाचें हें तर झालें च पण हें कूच करण्याचें काम पद्धतशीर, लष्करी शिस्ती-बरहुकूम, टीप सांभाळून झालें पाहिजे. पांचांपांचांच्या कीं चारांचारांच्या जश्या ठरल्या असतील तश्या रांगा करून चाललें पाहिजे. सर्वांचीं पावलें सारखीं पडलीं पाहिजेत. कोणीं मागेंपुढें होतां कामा नये. असें होईल तर च त्या कूच करण्याचा उपयोग व्हावयाचा. कामांतली सुंदरता साधली नाहीं तर काम करून न करून सारखें होतें. पेंढार आणि लश्कर ह्यांतलें अंतर हिंदुस्थानचा इतिहास पाहिल्यानें समजतें. सुंदरता किंवा नेटकेपणा हा गुण कामांत आल्यानें दुधांत साखर टाकल्याप्रमाणें काम खुलतें आणि हा गुण नसलेलें काम म्हणजे नुसतें दूध, असें नव्हे. सुंदरता हा गुण नसलेलें काम हें काम च नव्हे. त्याची तुलना दुधामध्यें स्वभावतः च असलेली साखर ज्यांतून काढून घेण्यांत आली आहे असल्या बेचव दुधाशीं करावयाची. म्हणजे सुंदरता हें कामाचें गंध नसून तें कामाचें कपाळ आहे. ज्या कामांत नेटकेपणा नाहीं तें काम फुटक्या कपाळाचें आहे. सुंदरता ही कामाची केवळ शोभा नसून तो कामाचा गाभा आहे. "त्याचे गळां माळ असो नसो" अश्यांतला हा ऐच्छिक गुण नाहीं. पण अवश्यक गुण आहे.

कामांत वेग पाहिजे. नेटकेपणा पाहिजे. आणि तिसरी गोष्ट ज्ञान पाहिजे. ज्ञानविहीन कर्मानें मुक्ति नाहीं म्हणतात तें अक्षरशः खरें आहे. लश्करानें ठरलेल्या वेगानें अगदीं पद्धतशीर कूच केलें आणि तें ठरलेल्या वेळीं पोंचलें सुद्धां, पण ठरलेल्या जागीं मात्र पोंचलें नाहीं. जाणून काम केलें नाहीं म्हणजे अशी दशा होते. बरोबर नकाशे आंखून रस्त्यांतलीं वळणें कोठकोठें कसकशीं सांपडावयाचीं हें ठरवून त्याप्रमाणें कूच केलें पाहिजे. हा मुद्दा इतका उघड आहे कीं त्याचा

खुलासा करण्याची जरूर च नसावी.

कोणत्या हि कामाचीं हीं तीन अवश्यक अंगें आहेत. काम जाणून केलें पाहिजे, नेटकें केलें पाहिजे, वेगानें केलें पाहिजे. हे तिन्ही गुण साधले म्हणजे काम साधलें. उदाहरणार्थ, लिहिणें केव्हां आलें म्हणावयाचें? जलद धावत्या हातानें लिहितां आलें पाहिजे. "वाटोळें, सरळें, मोकळें" असें सुंदर लिहितां आलें पाहिजे. आणि शुद्धलेखनाच्या नियमांबरहुकूम शुद्ध लिहितां आलें पाहिजे. इतकें झालें म्हणजे लिहिणें आलें. शीघ्र लेखन हें लेखनांतलें 'कर्म', सुंदर लेखन ही 'भक्ति' आणि शुद्ध लेखन हें 'ज्ञान' असें हि गीतेच्या भाषेनें म्हणतां येईल. ह्या तिहींचा 'योग' साधणें ही च काम करण्याची हातोटी किंवा खुबी. "योगः कर्मसु कौशलम्।"

आणि ह्याचें च नांव 'सच्चिदानंदा'चें स्मरण. कारण, कामांतला वेग म्हणजे च 'सत्'. जें टिकणारें तें 'सत्'. काळाशीं टक्कर मारील तें च टिकेल. बाकीचें टिकणार नाहीं. म्हणून ज्या कामांत वेग नाहीं तें 'असत्'. जाणून काम करणें ह्याला 'चित्' म्हणावयाचें. कारण, कामांतलें ज्ञान गेलें म्हणजे चेतना च गेली. आणि नेटकेपणा हा कामांतला 'आनंद' हें काय सांगावयाला पाहिजे?

---

# जुना रोग

अस्पृश्यतेचा बचाव करणारे लोक ती जुन्या काळापासून चालत आलेली आहे, हा एक मुद्दा म्हणून सांगत असतात. वास्तविक हा मुद्दा कसा होतो हें समजणें कठिण आहे. 'जुनें ठेवणें' संभाळावें हें कर्तव्य खरें. पण संभाळण्यांत वाढविणें, जीर्णोद्धार करणें वगैरे अनेक गोष्टी येतात. जुनें घर गोड वाटावें हें स्वाभाविक आहे. पण जुनें घर गोड म्हणजे त्यांतील उंदीरघुशींचीं बिळें हि गोड च कीं काय? पोटचें पोर प्यारें झालें म्हणून पोटांतला रोग हि प्यारा? आणि त्यांतून जुना रोग, मग त्याला इलाज काय करावा? जीर्णोद्धाराच्या हि आड येणाऱ्या ह्या जीर्णभक्तीला काय म्हणावें? साक्षात उपनिषदांतल्या ऋषींनीं, "यान्यस्माकं सुचरितानि। तानि त्वयोपास्यानि। नो इतराणि।"— आमचीं जीं चांगलीं कृत्यें असतील त्यांचें अनुकरण करा, इतर कृत्यांचें अनुकरण करूं नका—अशी स्पष्ट आज्ञा केली असतां, त्या आज्ञेचा उघड उघड भंग करून आम्हीं आपली विवेकबुद्धि बाजूला सारावयाची, आणि तसें करण्यांत च उलट आम्ही त्यांची आज्ञा पाळतों असें मानावयाचें, ही आत्मवंचना नव्हे तर काय?

त्यांतून पुनः 'भुतानें भागवताचा आधार' देण्यासारखा जेव्हां प्रकार घडतो तेव्हां ह्या आत्मवंचनेची कमाल होते. काय म्हणे अस्पृश्यतेला आधार आदि-शंकराचार्यांचा! म्हणजे अद्वैताचा सिद्धान्त प्रतिपादन करण्याचें ज्यांचें जीवितकार्य त्यांचा आधार 'अमंगळ भेदाभेद-भ्रमाला'! संतांचा आधार घ्यावयाचा च तर तो त्यांच्या उत्तर चरित्रांतून घ्यावयाचा असतो. पूर्वचरित्रांतून घ्यावयाचा नसतो.

शंकराचार्यांच्या चरित्रांत जी चांडाळाची गोष्ट आहे ती त्यांच्या पूर्व चरित्रांतली आहे. त्या आधारानें जर अस्पृश्यता मान्य ठरवावयाची तर वाल्मीकीच्या (पूर्वचरित्राच्या) आधारानें ब्रह्महत्या मान्य ठरेल! आणि काय मान्य ठरणार नाहीं? कारण साधु झाला तरी साधुत्वाची योग्यता येण्यापूर्वीं तो साधु नसतो च. त्या वेळच्या त्याच्या चरित्रांत काय वाटेल तें सांपडेल. म्हणून 'ऋषींचें कुळ पाहूं नये' अशी म्हण आहे. पहावयाचें च तर त्यांचें उत्तरचरित्र पहावें. आणि तें हि विवेक कायम राखून. पण पूर्वचरित्र पाहण्यांत काय मतलब?

आचार्यांच्या चरित्रांतली चांडाळाची गोष्ट अशी :—आचार्य एकदा काशीला जात असतांना त्यांच्या वाटेवरून एक 'चांडाल' येत होता. त्याला त्यांनीं दूर होण्याविषयीं सांगितलें. तेव्हां तो चांडाळ त्यांना म्हणतो—"महाराज, आपल्या अन्नमय शरिरापासून माझ्या अन्नमय शरिराला आपण दूर करूं इच्छितां कीं आपल्यांतील चैतन्यापासून माझ्यांतील चैतन्याला दूर करूं इच्छितां?" कोणाचा झाला तरी देह बोलून चालून 'विटाळाचा गोळा' आहे. आणि आत्मा तर सर्वत्र एक असून अत्यंत शुद्ध आहे. अश्या स्थितींत अस्पृश्यता कोणाची आणि कोणाला? असा त्याच्या प्रश्नाचा भाव. पण इतका भाव सुचवून तो चांडाळ स्वस्थ बसला नाहीं. त्यानें पुढें आणखी कानउघाडणी चालविली: "गंगाजलांतील चंद्र आणि आमच्या तळ्याच्या पाण्यांतला चांदोबा ह्यांत कांहीं फरक आहे काय? सुवर्ण-कलशांतलें आकाश आणि मातीच्या मडक्यांतली पोकळी ह्यांत अंतर आहे काय? सगळीकडे आत्मा एक च आहे ना? मग हा ब्राह्मण आणि हा अंत्यज असला भेदभ्रम तुम्हीं कोठून काढला? विप्रोऽयं श्वपचोयऽमित्यपि महान् कोऽयं विभेदभ्रमः।" इतकी कानउघाडणी झाल्यावर आचार्यांचे कान च नव्हे पण डोळे हि साफ उघडले. आणि नम्र भावानें त्याला नमस्कार करून ते म्हणाले,—"आपल्यासारखा मनुष्य, मग तो चांडाळ असो

किंवा ब्राह्मण असो, मला गुरूच्या ठिकाणीं आहे. चांडालोऽस्तु स तु द्विजोऽस्तु गुरुरित्येषा मनीषा मम।”

ह्या गोष्टीवरून काय अनुमान काढावयाचें तें वाचकांनीं च ठरवावें.

ज्या मार्गानें आपले वडील गेले, आजोबा गेले, त्या मार्गानें आपण जावें असें मनूनें हि म्हटलें आहे. पण तो ‘सन्मार्ग’ असेल तर— असा त्यानें च अपवाद नमूद केला आहे. तेवढा श्लोक देऊन सध्यां येथें च संपवितों.

येनास्य पितरो याता येन याताः पितामहाः ।
तेन यायात् ‘सतां मार्गं’ तेन गच्छन् न रिष्यति ॥

---

# श्रवण आणि कीर्तन

प्रल्हादानें नऊ प्रकारची भक्ति सांगितली तींत श्रवण आणि कीर्तन हे भक्तीचे दोन प्रकार अगदीं सुरवातीला दिले आहेत. भक्ति-मार्गामध्यें श्रवणकीर्तनाचें महत्त्व फार मानलें आहे. ऐकिलेली च वस्तु पुन्हां पुन्हां ऐकावी, सांगितलेली च वस्तु पुन्हां पुन्हां सांगावी अशी भक्तांची रीत आहे. तिन्ही लोकांत हिंडावें आणि सारखें सांगत सुटावें हा नारदासारख्यांचा जन्माचा धंदा. वरच्या वर्गाच्या लोकांत, मध्यम वर्गाच्या लोकांत, खालच्या वर्गाच्या लोकांत—तिन्ही लोकांत नारदाची

फेरी व्हावयाची. आणि सारखें कीर्तन चालावयाचें. कीर्तनाचा विषय एक च: तो च भक्तवत्सल प्रभु, तें च पतितपावन नाम. दुसरा विषय नाहीं, दुसरी भाषा नाहीं. तें च गाणें, तें च सांगणें, तें च रडणें, तें च ओरडणें. आळस नाहीं, कंटाळा नाहीं, थकवा नाहीं, विसांवा नाहीं, गात गात फिरावें आणि फिरत फिरत गावें!

जसें नारदासारख्यांनीं सतत गावें तसें धर्मराजासारख्यांनीं सतत ऐकावें. भारतांतील वनपर्व आणि शांतिपर्व हीं दोन्ही विशाल पर्वें धर्मराजाच्या श्रवणभक्तीचीं फळें आहेत. वनवासांत असतांना जो जो म्हणून ऋषि भेटायला आला त्याची धर्मराजानें दाढी पकडली च. भक्तिभावानें प्रणिपात करावा, होईल ती सेवा करावी, आणि ऋषीनें कुशल-प्रश्न विचारला कीं आपली करुण कहाणी सांगण्याचें निमित्त करून सहज प्रश्न विचारावा, "महाराज, द्रौपदीला जसे हल्लीं कष्ट पडतात तसे आजवर कोणाला पडले असतील का हो?" त्यानें म्हणावें, "हें काय विचारतोस? थोराथोरांनीं जे कष्ट सोसले त्यापुढें द्रौपदीचे आणि तुमचे कष्ट म्हणजे कांहीं च नाहींत. सीतेला, रामाला का कमी कष्ट सोसावे लागले?" मग ह्यानें विचारावें, "तें कसें काय?" एवढी किल्ली मिळाली कीं ऋषीचें व्याख्यान चाललें. सबंध रामकथा अथपासून इतिपर्यंत त्यानें सांगावयाची आणि ह्यानें प्रेमयुक्त चित्तानें ऐकावयाची. दुसऱ्या एखाद्या प्रसंगीं असा च एखादा ऋषि येऊन त्यानें नलदमयंतींचें नांव काढलें कीं "त्यांची गोष्ट काय आहे?" म्हणून धर्मराजानें प्रश्न विचारला च. आतां रामाची सीता कोण आणि नल-दमयंतीची गोष्ट काय आहे हें हि माहीत नसण्याइतकें इतिहासाचें अज्ञान धर्मराजाच्या ठिकाणीं होतें अशी कल्पना करतां येईल का? पण माहीत असलेली गोष्ट हि संतांच्या मुखांतून ऐकण्यांत विशेष गोडी असते. शिवाय ती च ती वस्तु पुन्हां पुन्हां ऐकल्यानें विचार दृढ होतो. म्हणून धर्मराजा एवढा श्रवणाचा प्रेमी बनला होता.

पण जुन्या गोष्टी सोडून दिल्या तरी अगदीं जवळच्या काळांत हि अशीं उदाहरणें आहेत. नारदाप्रमाणें च तुकाराममहाराजांनीं शेवटच्या घटकेपर्यंत कीर्तनभक्ति च गाजविली. रोज रात्रीं देवाच्या देवळांत जाऊन कीर्तन करावयाचें हा त्यांचा क्रम आमरण अबाधित चालला होता. लोक येवोत न येवोत, देवापुढें कीर्तन हें व्हावयाचें च. न ऐकत्या देवाला हि कीर्तन ऐकवण्याचें ज्याचें व्रत त्यानें ऐकत्या देवाला 'अधिकार तैसा' उपदेश करण्याचा सपाटा चालविला ह्यांत काय नवल? समाजांतल्या अगदीं खालच्या थरापासून तों थेट वरच्या थरापर्यंत सर्व लोकांना तुकाराममहाराजांनीं देवाचें नांव ऐकविलें. घरांत, दारांत, शेजारीं, बाजारीं, दुकानांत, देवळांत—सगळीकडे सूर सारखा. बायकोला, मुलीला, भावाला, जांवयाला, गांवच्या पाटलाला आणि मुलखाच्या कारभाऱ्याला, शिवाजी महाराजांना, रामेश्वर भट्टाला, मंबाजीबुवाला—सर्वांना तुकाराममहाराजांनीं हरिनामाचा एक च उपदेश केला. आणि आज हि त्यांची अभंगवाणी तें च कार्य अव्याहतपणें करीत आहे.

अलीकडच्या इतिहासांत आपणांस तुकारामासारखे 'सतत बोलते' भक्तीचे झरे आढळतात. तसे च त्यांचे पाट फोडून राष्ट्राच्या धर्म-क्षेत्राची बागाईत करणारे शिवरायासारखे श्रवणदक्ष शेतकरी हि पहा-वयास सांपडतात. पंचवीस पंचवीस मैलांवरून कीर्तन ऐकण्यासाठीं टाकोटाक धावत यावें असा शिवबांचा शिरस्ता होता. आणि ऐकावें म्हणजे आळस, किळस—सर्व झाडून जिवाभावानें ऐकावें. जसें ऐकावें तसें वागण्याचा नेहमीं प्रयत्न करावा. ह्याला च श्रवण म्हणावयाचें. शिवाजी महाराजांनीं सतत श्रवण केलें. कोणी सत्पुरुष भेटला असतां त्याच्या पासून ऐकण्याची संधि त्यांनीं सहसा गमावली नाहीं. त्यामुळें सर्व उद्यो-गांत पुरून उरण्याइतकी स्फूर्तीची सांठवण त्यांच्या हृदयांत होऊं शकली.

भक्तिमार्गांत ज्याला श्रवण—भक्ति आणि कीर्तन—भक्ति म्हणतात त्याला च उपनिषदांत स्वाध्याय आणि प्रवचन अशीं नांवें दिलीं

आहेत. नांवें निराळीं पण अर्थ एक च आहे. स्वाध्याय म्हणजे शिकणें आणि प्रवचन म्हणजे शिकवणें. ह्या 'शिकण्याशिकविण्यावर' उपनिषदांचा तितका च जोर आहे जितका 'श्रवण–कीर्तनावर' संतांचा. "सत्यं वद । धर्मं चर । स्वाध्यायान्मा प्रमदः ।"—सत्य बोल, धर्मानें वाग आणि स्वाध्याय चुकूं नको—या तीन सूत्रांत ऋषींची सर्व शिकवण येऊन गेली. स्वाध्यायाचें आणि प्रवचनाचें म्हणजे शिकण्याशिकविण्याचें इतकें महत्त्व ऋषींना वाटतें कीं मनुष्यानें नित्य आचरावयाचीं धर्माचीं तत्त्वें सांगतांना त्यांनीं प्रत्येक तत्त्वाबरोबर स्वाध्याय–प्रवचनांचा फिरून फिरून उल्लेख केला आहे. 'सत्य आणि स्वाध्याय–प्रवचन,' 'तप आणि स्वाध्याय–प्रवचन,' 'इंद्रिय–दमन आणि स्वाध्याय–प्रवचन' 'मानसिक शांति आणि स्वाध्याय–प्रवचन' अश्या प्रकारें हरएक कर्तव्याचा अलग अलग उच्चार करून प्रत्येक वेळीं स्वाध्याय–प्रवचनाचा उल्लेख करण्यांत ऋषींनीं स्वाध्याय–प्रवचनांचा हेतु आणि विषय तर सुचविला च पण महत्त्व हि मांडून दाखविलें आहे.

आजची स्वराज्याची चळवळ अत्यंत विशाल आणि खोल चळवळ आहे. एका बाजूनें तीस कोटि लोकांशीं—एक पंचमांश मानवी प्रजेशीं—संबंध राखणारी म्हणून विशाल आणि दुसऱ्या बाजूनें आत्म्याला स्पर्श करणारी म्हणून खोल. ही तीस कोटि लोकांशीं संबंध राखणारी चळवळ आहे हें म्हणणें हि आकुंचित आहे. व्यापक नजरेनें पाहिलें तर असें दिसून येईल कीं सर्व मानवी जगाची भवितव्यता ह्या चळवळीशीं खिळलेली आहे. पायांतला लहानसा कांटा काढणें हा हि सवाल नुसत्या पायाचा नसतो. सर्व शरिराचा त्यांत हितसंबंध येतो. मग बिघडलेलें काळीज सुधारण्याचा सवाल हा सर्व शरिराचा सवाल कसा नव्हे ? अवश्य हा सर्व शरिराचा सवाल आहे. आणि साधा सवाल नव्हे, जिवावरचा सवाल आहे. 'यक्ष–प्रश्न'

आहे. जबाब दे नाहीं तर जीव दे असला हा सवाल आहे. हिंदभूमि! कालदृष्टया अत्यंत प्राचीन, लोकसंख्येनें जगाच्या पांचव्या हिश्श्या-बरोबर, विस्तारानें युरोप-कम-रशियाएवढी, संस्कृतीनें उदार–उच्च–अद्‌भुत, निसर्गसंपत्तीनें जगाच्या हेव्यास पात्र झालेली, हिंदु आणि बौद्ध ह्या दोन विश्व–व्यापक धर्मांना जन्म देणारी आणि इस्लामचें विस्तारक्षेत्र बनलेली, वाङ्मयवैभवानें केवळ अद्वितीय! अशी ही हिंदभूमि—ब्रिटिश साम्राज्याच्या मुगुटावरचा हिरा च नव्हे पण ब्रिटिश साम्राज्यानें गिळलेली ही हिरकणी—हिच्या जगण्यामरण्यावर जगाचें नशीब टांगलेलें आहे. म्हणून आजच्या आमच्या स्वराज्याच्या चळ-वळीचा संबंध केवळ तीस कोटि हिंदी प्रजेशीं च नसून सर्व जगाशीं आहे. आणि दुसऱ्या बाजूनें ही चळवळ आत्म्याला स्पर्श करणारी आहे हें म्हणणें तितकेसें खोल नाहीं. स्वराज्याची ही चळवळ आत्मशुद्धि करणारी आहे. आणि आत्मशुद्धीचा वेग साक्षात परमात्म्याची गांठ घेतल्याशिवाय कधीं च थांबणारा नसतो. म्हणून परमात्मा गुणिलें मनुष्याच्या जगाचें क्षेत्र इतकें ह्या चळवळीचें घनफळ आहे.

चळवळ इतकी विशाल आणि खोल असल्यामुळें तिच्या सिद्धी-साठीं दोन गोष्टींची काळजी घेणें जरूर आहे. तिला एखाद्या खुंटा-भोंवतीं जखडून टाकलें पाहिजे व तिच्यांतील तत्त्वांचें श्रवण–कीर्तन चालू राखलें पाहिजे. नाहीं तर ती हातची निसटून जावयाची.

पैकीं चळवळीचा खुंट आतां निश्चित झाला आहे. चरखा हा आपल्या ह्या सर्व चळवळीचा खुंट आहे. ह्याच्या भोंवतीं चळवळीचें चक्र फिरतें राखलें पाहिजे. सोईप्रमाणें आणि जरूरीप्रमाणें कासव आपले अवयव कधीं आपल्या मजबूत कवचीच्या आंत खेंचून घेतो. कधीं बाहेर फैलावतो. त्याप्रमाणें चरख्याचा मजबूत खुंट कायम करून त्याच्या आश्रयानें चळवळीचे इतर अवयव कधीं बाहेर पसरावे, कधीं आंत खेंचून घ्यावे. आज आपण चळवळीचीं अंगें आंत

खेंचून घेतलीं आहेत. संधि मिळेल तेव्हां तीं बाहेर पसरूं. पण केव्हां हि चरख्याचा खुंट सोडणार नाहीं. ब्रह्म हें "सर्वगत सदा सम" आहे त्यामुळें च तें हातावर तुरी देऊन केव्हां निसटून जाईल ह्याचा नेम सांगतां येत नाहीं. म्हणून ह्या ब्रह्माला एखाद्या मूर्तींत डांबून ठेवल्याशिवाय भक्ताचें काम चालत नाहीं. तसें च विश्वव्यापी चळवळ म्हटली कीं कांहीं च हाताला लागत नाहीं. म्हणून त्या चळवळीची चरख्यांत प्राणप्रतिष्ठा केली आहे. दुसरें कांहीं होवो वा न होवो, ह्या मूर्तीची पूजा मात्र कधीं च चुकतां कामा नये.

आणि तितकी च महत्त्वाची दुसरी वस्तु म्हणजे चळवळींतील तत्त्वें सर्वांच्या कानांवर सारखीं पडत राहतील अशी व्यवस्था करणें. वास्तविक ह्या दोन निरनिराळ्या गोष्टी नाहींत. एका च गोष्टीचीं दोन अंगें आहेत. कीर्तन करावयाचें म्हणजे समोर मूर्ति पाहिजे च. देवाच्या मूर्तीशिवाय कीर्तन होऊं शकत नाहीं. गंगेचें पाणी समुद्राकडे जातें तें तीरावरच्या झाडांचें पोषण करीत करीत जातें. पण जातें समुद्राकडे च. तशी कीर्तनाची धार ही वाहते देवाच्या च समोर. ऐकणारे तीरावरच्या झाडांसारखे. स्वराज्याच्या चळवळीची स्थापना चरख्याच्या मूर्तींत करावयाची आणि त्या मूर्तीसमोर अखंड कीर्तनाचा घोष चालवावयाचा. हें भजनकार्य हरएक शहरांत, हरएक खेड्यांत, हरएक घरांत सुरू झालें पाहिजे. कीर्तनाच्या गजरानें दुनिया दुमदुमून गेली पाहिजे. हें आपण करूं शकलों तर एका क्षणांत राष्ट्राचा नूर पालटून जाईल हें निश्चित समजावें.

# रोजची प्रार्थना

ॐ असतो मा सद् गमय ।
तमसो मा ज्योतिर्गमय ।
मृत्योर्मा अमृतं गमय ॥

हे प्रभो, मला असत्यांतून सत्यांत घेऊन जा. अंधकारांतून प्रकाशांत घेऊन जा. मृत्यूंतून अमृतांत घेऊन जा.

ह्या मंत्रामध्यें आपण कोठें आहों म्हणजे आपलें जीवस्वरूप काय आहे, आणि आपणांस कोठें जावयाचें आहे म्हणजे आपलें शिव-स्वरूप काय आहे, हें दाखविलें आहे. आपण असत्यांत आहों, अंधकारांत आहों, मृत्यूंत आहों. हें आपलें जीवस्वरूप. आपल्याला सत्याकडे जावयाचें आहे, प्रकाशाकडे जावयाचें आहे, अमृतत्वाची प्राप्ति करून घ्यावयाची आहे. हें आपलें शिवस्वरूप.

दोन बिंदु निश्चित झाले कीं सु-रेखा निश्चित होते. जीव आणि शिव हे दोन बिंदु कायम केले कीं परमार्थ—मार्ग तयार होतो. मुक्तासाठीं परमार्थ—मार्ग नाहीं. कारण त्याचें जीवस्वरूप मावळलें आहे. शिवस्वरूपाचा एक च बिंदु उरला त्यामुळें मार्ग खुंटला. जडासाठीं परमार्थ—मार्ग नाहीं. कारण त्याला शिवस्वरूपाचें भान नाहीं. जीवस्वरूपाचा एक च बिंदु नजरेसमोर आहे. त्यामुळें मार्ग सुरू च होत नाहीं. मार्ग मधल्या लोकांसाठीं आहे. मधले लोक म्हणजे मुमुक्षु. त्यांच्यासाठीं मार्ग. आणि त्यांच्या च साठीं ह्या मंत्रांतली प्रार्थना.

'मला असत्यांतून सत्यांत घेऊन जा' अशी ईश्वरापाशीं प्रार्थना करण्यांत 'मी असत्यांतून सत्याकडे जाण्याचा सतत प्रयत्न करीन अशी

प्रतिज्ञा केल्यासारखें होतें. प्रयत्नवादाच्या प्रतिज्ञेशिवाय प्रार्थनेला कांहीं च अर्थ राहत नाहीं. जर मी प्रयत्न न करतां स्वस्थ बसलों अथवा उलट दिशेकडे जात असलों आणि प्रार्थना मात्र 'मला असत्यांतून सत्यांत घेऊन जा' म्हणून करतों तर ती प्रार्थना काय कामाची? नागपूरकलकत्त्याकडे जाणाऱ्या गाडींत बसून 'हे देवा! मला मुंबईला ने' म्हणून किती हि प्रार्थना केली तरी तिचा उपयोग काय? असत्यांतून सत्याकडे ने अशी प्रार्थना करावयाची तर असत्यांतून सत्याकडे जाण्याचा प्रयत्न केला पाहिजे. प्रयत्नहीन प्रार्थना ही प्रार्थना होऊं च शकत नाहीं. म्हणून अश्या प्रकारची प्रार्थना करण्यामध्यें मी माझें तोंड असत्याकडून सत्याकडे वळवीन आणि माझ्या शक्तीप्रमाणें सत्याकडे जाण्याचा आटोकाट प्रयत्न करीन ही प्रतिज्ञा गृहीत आहे.

प्रयत्न करावयाचा आहे मग प्रार्थना कश्याला? प्रयत्न करावयाचा आहे म्हणून च प्रार्थना अवश्य हवी. मी प्रयत्न करणार पण फळ माझ्या हातचें थोडें च आहे? फळ ईश्वराच्या इच्छेवर अवलंबून आहे. मी प्रयत्न करून करून किती करणार? माझी शक्ति किती अल्प! ईश्वराच्या मदतीशिवाय मी एकटा च काय करूं शकेन? मी जरी सत्याकडे आपलें पाऊल टाकत असलों तरी ईश्वरी कृपेशिवाय मी मुक्काम गांठूं शकणार नाहीं. मी मार्ग कापावयाचा प्रयत्न तर करीत आहें, पण अखेर मी मार्ग कापणार कीं मध्यंतरीं माझे च पाय कापले जाणार हें काय सांगावें? म्हणून माझ्या च जोरावर मी मजल गांठणार ही घमेंड फुकट आहे. कार्याचा अधिकार माझा. पण फळाचें वर्म देवाच्या हातीं. म्हणून प्रयत्नाच्या जोडीला ईश्वराची प्रार्थना हि अवश्य पाहिजे. प्रार्थनेच्या योगानें आपणांस बळ प्राप्त होतें. प्रार्थना म्हणजे आपल्या जवळचें संपूर्ण बळ वापरून ज्यास्त बळ दे म्हणून देवापाशीं मागणी असें च म्हणा ना.

म्हणजे प्रार्थनेंत दैववाद आणि प्रयत्नवाद ह्यांचा समन्वय आहे. दैववादांत पुरुषार्थाला अवकाश नाहीं. म्हणून तो बावळा. प्रयत्नवादांत निरहंकार वृत्ति नाहीं. म्हणून तो माजरा. मिळून, दोन्ही घेतां येत नाहींत. बरें, दोन्ही टाकतां हि येत नाहींत. कारण, दैववादांत नम्रता आहे. ती पाहिजे. प्रयत्नवादांत पराक्रम आहे. तो पाहिजे. प्रार्थना ह्यांचा मेळ घालते. "मुक्तसंगोऽनहंवादी धृत्युत्साहसमन्वितः।" हें जें गीतेंत सात्त्विक कर्त्याचें लक्षण सांगितलें आहे त्यांत प्रार्थनेचें रहस्य आहे. प्रार्थना म्हणजे अहंकाररहित प्रयत्न. सारांश, 'मला असत्यांतून सत्यांत घेऊन जा' ह्या प्रार्थनेचा संपूर्ण अर्थ 'मी असत्यांतून सत्याकडे जाण्याचा अहंकार सोडून उत्साहपूर्वक सतत प्रयत्न करीन' असा झाला. हा अर्थ लक्षांत घेऊन आपण हररोज प्रभूपाशीं प्रार्थना करावी कीं

हे प्रभो,
तूं मला असत्यांतून सत्यांत घेऊन जा.
अंधकारांतून प्रकाशांत घेऊन जा.
मृत्यूंतून अमृतांत घेऊन जा.

# तुलसी-रामायण

तुलसीदासजींच्या रामायणाचें हिंदुस्थानच्या साहित्याच्या इतिहासांत एक स्वतंत्र स्थान आहे. हिंदी राष्ट्र-भाषा. तिच्यांतला हा सर्वोत्तम ग्रंथ. म्हणून राष्ट्रीय दृष्टीनें त्याचें स्थान अद्वितीय आहे च. पण हिंदुस्थानांतल्या सातआठ कोट लोकांत वेदतुल्य प्रमाण मानलेला, नित्यपरिचित, धर्मजागृतीचा एक च एक आधार म्हणून धर्मदृष्ट्या हि त्याचें स्थान अद्वितीय म्हटलें पाहिजे. आणि रामभक्तीचा प्रचार करण्यांत "शिष्यादिच्छेत् पराजयम्" ह्या न्यायानें वाल्मीकि-रामायणाला हि पराजयाचा आनंद देणारा म्हणून भक्तिमार्गाच्या दृष्टीनें हि तें अद्वितीय च. तिन्ही दृष्टि एकवटून विचार केला म्हणजे तर हें अनन्वयालंकाराचें उदाहरण होतें. रामरावणांचें युद्ध जसें रामरावणांच्या युद्धासारखें तसें तुलसीरामायण तुलसीरामायणासारखें.

आधीं च रामायण म्हणजे मर्यादापुरुषोत्तम रामचंद्राचें चरित्र. पुन्हां तुलसीदासजींनीं तें विशेष च मर्यादेनें लिहिलेलें. त्यामुळें ग्रंथ लहान मुलांच्या हि हातांत देण्यासारखा निर्दोष आणि पवित्र झाला आहे. सर्व रसांचीं वर्णनें नैतिक मर्यादा सांभाळून केलेलीं आहेत. खुद्द भक्तीला हि नीतीची शिस्त लावली आहे. त्यामुळें सूरदासांसारखी मस्त भक्ति येथें पहावयास सांपडत नाहीं. तुलसीदासजींची भक्ति नेमस्त भक्ति. नेमस्त भक्ति आणि मस्त भक्ति ह्यांतला फरक म्हणजे मूळ रामभक्ति आणि कृष्णभक्ति ह्यांतला च फरक आहे. पण त्यांत हि तुलसीदासजींचें कांहीं तरी आहे च.

तुलसीरामायणाचा वाल्मीकिरामायणापेक्षां अध्यात्मरामायणाशीं अधिक संबंध आहे. पुष्कळशा वर्णनांवर, विशेषतः भक्तीच्या उद्गारांवर,

भागवताची छाप पडलेली आहे. गीतेची तर आहे च. महाराष्ट्रांतील भागवतधर्मीय संतांच्या ग्रंथांशीं ज्याचा परिचय आहे त्याला तुलसी-रामयणांत कोठें च चुकल्याचुकल्यासारखें म्हणून वाटत नाहीं. ती च नीति, ती च निर्मल भक्ति, तो च संयम. सुदामदेवाला जसें आपल्या नगरींत आल्यावर आपण पुन्हां द्वारकेंत च गेलों कीं काय असें वाटलें तसें तुलसीदासजींचें रामायण वाचतांना महाराष्ट्रीय संतमंडळीच्या वचनांशीं परिचय असलेल्या वाचकाला आपण तीं च आपलीं पूर्वपरिचित वचनें वाचत नाहीं ना अशी शंका येण्यासारखी आहे. त्यांतल्या त्यांत, नाथांची आठवण विशेष होते. नाथांचें भागवत आणि तुलसी-रामायण ह्यांत विचारांचें साम्य विशेष आहे. नाथांनीं रामायण हि लिहिलें आहे. पण नाथांचा आत्मा उतरला भागवतांत. रानड्यांना पागल केलें नाथांच्या भागवतानें. नाथ कृष्णभक्त. तुलसीदासजी रामभक्त. नाथांनीं कृष्णभक्तीची मस्ती जिरवली हा नाथांचा विशेष. ज्ञानदेव, नामदेव, तुकोबा, नाथ—सगळे च कृष्णभक्त. आणि असें असून अत्यंत मर्यादशील. म्हणून ह्या बाबतींत तुलसीदासजींपेक्षां त्यांना दोन मार्क ज्यास्त देणें गैर नाहीं.

तुलसीदासजींची मुख्य करामत त्यांच्या अयोध्याकांडांत आहे. त्यावर त्यांनीं विशेष परिश्रम घेतले आहेत. अयोध्याकांडांत भरताची भूमिका अद्‌भुत रंगविली आहे. भरत तुलसीदासजींची ध्यानमूर्ति होता. ही ध्यानमूर्ति निवडण्यांत औचित्य आहे. लक्ष्मण आणि भरत दोघे हि रामाचे परम भक्त. पण एकाला संगतीचें भाग्य लाभलें. आणि दुसऱ्याला वियोगाचें भाग्य. वियोगाचें 'भाग्य' बनलें. कारण वियोगांत हि भरतानें संगतीचा अनुभव मिळविला. आमच्या नशिबीं परमेश्वराच्या वियोगांत राहून काम करण्याचें लिहिलें आहे. लक्ष्मणासारखें संगतीचें भाग्य आमचें नाहीं. म्हणून वियोगाचें हि भाग्य कसें बनवितां येतें हें समजण्याला भरताचा आदर्श च आम्हांला

उपयोगी आहे.

शारीरिक संगतीपेक्षां मानसिक संगतीचें महत्त्व अधिक आहे. शरिरानें जवळ असून मनुष्य मनानें दूर राहूं शकतो. रात्रंदिवस नदीचें पाणी पांघरून निजलेला दगड ओलेपणापासून अजीबात अलिप्त राहूं शकतो. उलट, शारीरिक वियोगांत हि मानसिक संयोग असूं शकतो. त्यांत संयमाची कसोटी होते. भक्तीची तीव्रता वियोगानें वाढते. आनंद पाहिला तरी साक्षात स्वराज्यापेक्षां स्वराज्यप्राप्तीच्या प्रयत्नाचा आनंद कांहीं और च आहे. मात्र तो अनुभवण्याइतकी रसिकता पाहिजे. भक्तांना ही रसिकता असते. म्हणून भक्त मुक्ति मागत नाहींत, भक्तींत खुश राहतात. भक्ति म्हणजे बाहेरचा वियोग पतकरून आंतून मिसळून जाणें. हें नुसतें भाग्य च नव्हे तर परम भाग्य आहे. मुक्तीच्या माथ्यावरचें भाग्य आहे. भरताचें हें भाग्य होतें. लक्ष्मणाचें भाग्य हि थोर. पण एक तर आमच्या नशिबीं तें नाहीं आणि तें हि कमअसल च. ह्याचें कारण द्राक्षें आंबट असें च केवळ नव्हे तर उपवास गोड हें हि आहे. भरताच्या भाग्यांत उपवासाची गोडी आहे.

"संन्यासी झाला तरी त्याला मोक्षाचा लोभ असतो च" असा गीतारहस्यांत टिळकांनीं टोला हाणला आहे. पण हा टोला चुकविण्याची हि युक्ति आमच्या साधुसंतांनीं शोधून काढली. त्यांनीं लोभाला च संन्यास देऊन टाकला. खुद्द तुलसीदासजी भक्तीच्या भाजीभाकरीवर राजी आहेत. मुक्तीच्या मेजवानीचा त्यांनीं तिटकारा केला आहे. ज्ञानोबांनीं "भोगमोक्ष निंबलोण । पायांतळीं," "मोक्षाची सोडीबांधी करी," "चहूं पुरुषार्थां शिरीं । भक्ति जैसी" वगैरे वचनांत मुक्तीला भक्तीच्या घरची मोलकरीण बनविलें आहे. आणि तुकोबांनीं तर "नको ब्रह्मज्ञान आत्मस्थितिभाव" म्हणून मुक्तीचा राजीनामा च देऊन टाकला आहे. 'मुक्तीवर भक्ति' ही कल्पना नाथांनीं पांचदहा वेळां

मांडली आहे. इकडे गुजराथेंतला नरसी मेहता "हरिना जन तो मुक्ति न मागे" हें च गात आहे. मिळून सर्व भागवतधर्मीय वैष्णवांची परंपरा मुक्तीच्या लोभापासून पूर्णपणें मुक्त आहे. ह्या परंपरेचा उगम भक्तशिरोमणि प्रह्लादापासून आहे. "नैतान् विहाय कृपणान् विमुमुक्षु एकः।"— गरीब लोकांना सोडून मी एकटा च मुक्त होऊं इच्छीत नाहीं—असा रोकडा जबाब प्रह्लादानें नृसिंहाच्या तोंडावर देऊन टाकला आहे. आणि कलियुगांत श्रौतस्मार्तसंन्यास–मार्गाची स्थापना करणाऱ्या शंकराचार्यांनीं हि "ब्रह्मण्याधाय कर्माणि संगं त्यक्त्वा करोति यः।" ह्या गीतेंतील श्लोकावर भाष्य करतांना 'संगं त्यक्त्वा' म्हणजे 'मोक्षेऽपि फले संगं त्यक्त्वा'—मोक्षाची हि आसक्ति सोडून—असें मुद्दाम आपल्या पदरचे शब्द घालून प्रतिपादन केलें आहे. तुलसीदासजींचा भरत ह्या भक्तिभाग्याची मूर्ति आहे. भरताचें मागणें पहाः—

अरथ न धरम न काम रुचि गति न चहउं निरबान।
जनम जनम रति रामपद यह बरदानु न आन॥

एकंदरींत टिळकांनीं हाणलेला टोला संतांनीं अगदीं च हुकविला.

भरताच्या ठिकाणीं वियोगभक्तीचा उत्कर्ष दिसून येतो म्हणून तुलसीदासजींचा तो आदर्श झाला. भरतानें सेवा–धर्म चोख बजावला. नैतिक मर्यादांचें संपूर्ण पालन केलें. देवाचें विस्मरण कधीं हि होऊं दिलें नाहीं. त्याची आज्ञा समजून प्रजेचें पालन केलें. पण त्याचें श्रेय देवाच्या चरणीं अर्पण करून आपण मोकळा राहिला. लोकवस्तींत राहून अरण्यवास अनुभविला. वैराग्ययुक्त चित्तानें यमनियमादि विषम व्रतांचें पालन करून आत्म्याला देवापासून दूर राखणारा देहाचा पडदा पातळ करून टाकला. तुलसीदासजी म्हणतात, असा भरत जन्माला आला नसता तर माझ्यासारख्या पतिताला रामसन्मुख कोण करता?—

सियराम–प्रेम–पियूष–पूरन होत जनम न भरतको।
मुनि–मन–अगम जम–नियम सम–दम विषम व्रत आचरत को॥

दुख–दाह–दारिद–दंभ–दूषन सुजस–मिस अपहरत को।
कलिकाल तुलसीसे सठन्हि हठि राम–सनमुख करत को॥

रामायणांत रामसखा भरत, भारतांत शकुंतलेचा पराक्रमी भरत आणि भागवतांत जीवन्मुक्त जडभरत असे तीन भरत प्राचीन इतिहासांत प्रसिद्ध आहेत. हिंदुस्थानाला 'भारत–वर्ष' ही संज्ञा शकुंतलेच्या वीर भरतावरून पडली असावी असें ऐतिहासिकांचें मत आहे. नाथांनीं ज्ञानी जडभरतावरून ही संज्ञा पडली असें म्हटलें आहे. तुलसीदासजींना कदाचित ती रामभक्त भरतावरून पडली असें वाटत असावें. कसें हि असलें तरी आजच्या वियोगी भारताला भरताच्या वियोग–भक्तीचा आदर्श सर्व प्रकारें अनुकरणीय आहे. तुलसीदासजींनीं हा आदर्श आपल्या पवित्र अनुभवानें उजळून आपल्यापुढें ठेवला आहे. त्याप्रमाणें आचरण करणें आपलें काम आहे.

---

# कौटुंबिक शाळा

विचाराची प्रत्यक्ष जीवनापासून फारकत झाल्यानें विचार निर्जीव बनतो आणि जीवन विचारशून्य बनतें. मनुष्य घरांत जगतो आणि शाळेंत विचार शिकतो, त्यामुळें जीवन आणि विचार ह्यांचा मेळ बसत नाहीं. ह्याला उपाय म्हणजे एका बाजूनें घरांत शाळा शिरली पाहिजे आणि दुसऱ्या बाजूनें शाळेंत घर घुसलें पाहिजे. समाजशास्त्रानें शालीन कुटुंबें निर्माण केलीं पाहिजेत आणि शिक्षण–शास्त्रानें कौटुंबिक शाळा

स्थापन केल्या पाहिजेत. ह्या लेखांत शालीन कुटुंबांविषयीं आपल्याला विचार करावयाचा नाहीं. कौटुंबिक शाळांसंबंधीं थोडें दिग्दर्शन करावयाचें आहे. छात्रालय किंवा शिक्षकाचें घर हा शिक्षणाचा पाया समजून त्यावर शिक्षणाची इमारत रचणारी शाळा म्हणजे कौटुंबिक शाळा. अश्या कौटुंबिक शाळेच्या जीवनक्रमासंबंधीं—पाठ्यक्रम वगळून—कांहीं सूचना ह्या लेखांत करावयाच्या आहेत. त्या अश्याः—

(१) ईश्वर-निष्ठा हें संसारांतलें सार आहे. म्हणून नित्य कार्यक्रमांत दोन वेळां सामुदायिक उपासना किंवा प्रार्थना असावी. प्रार्थनेचें स्वरूप संतवचनांच्या मदतीनें ईश्वर-स्मरण हें असावें. उपासनेंत नेहमींचा ठरीव पाठ हा एक भाग असावा. 'सर्वेषामविरोधेन' हें धोरण. एक प्रार्थना रात्रीं निजण्याच्या पूर्वीं आणि दुसरी पंहाटे निजून उठल्यावर.

(२) आहारशुद्धीचा चित्तशुद्धीशीं निकट संबंध आहे. म्हणून सात्त्विक आहार राखावा. गरम मसाला, मिरची, तळलेले पदार्थ, साखर आणि अन्य निषिद्ध पदार्थ ह्यांचा त्याग करावा. दुग्ध आणि दुग्धजन्यें ह्यांचा मर्यादित उपयोग करावा.

(३) आचाऱ्याकडून किंवा नेमलेल्या माणसाकडून रसोई तयार करवूं नये. रसोईचें शिक्षण हा शिक्षणाचा अवश्यक भाग आहे. सार्वजनिक काम करणाऱ्याला रसोईचें ज्ञान जरूर आहे. शिपाई, प्रवासी, ब्रह्मचारी—सर्वांना तें पाहिजे. स्वावलंबनाचें तें एक अंग आहे.

(४) कौटुंबिक शाळांनीं आपल्या पायखान्यांचें काम हि आपल्या हातांत घेतलें पाहिजे. अस्पृश्यता-निवारणाचा अर्थ कोणत्या हि मनुष्याचा विटाळ मानूं नये एवढा च नसून कोणत्या हि समाजोपयोगी कार्याचा विटाळ मानूं नये हा हि आहे. पायखाने सफा करणें हें

अंत्यजांचें च काम आहे ही भावना गेली पाहिजे शिवाय स्वच्छतेचें खरें शिक्षण त्यांत आहे. सार्वजनिक स्वच्छता कशी राखावी ह्याचा अभ्यास आहे.

(५) अस्पृश्यांसगट सर्वांना शाळेंत प्रवेश असावा हें तर झालें च, पण 'कौटुंबिक' शाळेंत जवणांतला पक्तिभेद हि राखणें शक्य नाहीं. आहार–शुद्धीचे नियम असले म्हणजे झालें.

(६) स्नानादि प्रातःकर्म सकाळीं च झालें पाहिजे असा नियम असावा. प्रकृतिमानाप्रमाणें अपवाद राखणें जरूर आहे. स्नान थंड पाण्यानें करावें.

(७) प्रातःकर्माप्रमाणें निजण्यापूर्वीचें 'सायंकर्म' हि अवश्य व्हावें. निजण्यापूर्वीं देह-शुद्धि जरूर आहे. ह्या सायंकर्माचा गाढ झोपेशीं आणि ब्रह्मचर्याशीं संबंध आहे. मोकळ्या हवेंत अलग अलग निजण्याची पद्धति असावी.

(८) पुस्तकी शिक्षणापेक्षां उद्योगावर अधिक जोर द्यावा. निदान तीन तास तरी उद्योगाकडे द्यावे. त्याशिवाय अध्ययन तेजस्वी होणार नाहीं. 'कर्मातिशेषेण' म्हणजे काम करून उरलेल्या वेळांत वेदाध्ययन करावें असें श्रुतीचें विधान आहे.

(९) शरिराला तीन तास उद्योग मिळाल्यानंतर आणि गृहकृत्यें व स्वकृत्यें स्वतः च करण्याची पद्धति ठेवल्यानंतर दोन वेळां व्यायाम करण्याची जरुरी नाहीं. तथापि एक वेळ ज्याच्या त्याच्या जरुरीप्रमाणें मोकळ्या हवेंत खेळणें, फिरणें किंवा विशिष्ट व्यायाम घेणें योग्य आहे.

(१०) कांतण्याच्या राष्ट्रीय धर्माची प्रार्थनेप्रमाणें नित्यकर्मांत गणना करावी. त्यासाठीं उद्योगाच्या वेळेशिवाय स्वतंत्र वेळ निदान अर्धा तास द्यावा. ह्या अर्ध्या तासांत तकलीचा उपयोग केला तरी

चालेल. कांतण्याचें नित्यकर्म, प्रवासांत वगैरे कोठें हि, न चुकतां करावयाचें तर त्याला तकली हें च योग्य साधन आहे. म्हणून तकलीवर कांततां तर आलें च पाहिजे.

(११) कपड्याच्या बाबतींत खादीचा च उपयोग करावा. इतर वस्तु हि शक्य त्या स्वदेशी च घ्याव्या.

(१२) सेवेशिवाय दुसऱ्या कोणत्या हि कामासाठीं रात्रीं जागरण होऊं नये. आजारी माणसाची सेवा हा अपवाद झाला. पण मौजेसाठीं किंवा ज्ञानप्राप्तीसाठीं हि रात्रीचें जागरण मंजूर नाहीं. झोपेसाठीं अडीच प्रहर राखलेले असावे.

(१३) रात्रीं जेवण राखूं नये. आरोग्य, व्यवस्था आणि अहिंसा—तिन्ही दृष्टींनीं ह्या नियमाची अवश्यकता आहे.

(१४) प्रचलिताविषयीं संपूर्ण जागृति राखून वातावरण अचलित राखावें.

प्रत्यक्ष अनुभवावरून कौटुंबिक शाळेच्या जीवन–क्रमाविषयीं ह्या चौदा सूचना केल्या आहेत. ह्यांत पुस्तकी शिक्षण आणि औद्योगिक शिक्षण ह्यांच्या पाठ्यक्रमाविषयींचा तपशील दाखल केलेला नाहीं. त्यासाठीं लिहावयाचें च तर स्वतंत्र लिहावें लागेल. राष्ट्रीय शिक्षणाविषयीं 'रस' असलेल्या लोकांनीं ह्या सूचनांचा विचार करावा. आणि शंका, सूचना किंवा आक्षेप सुचतील ते कळवावे.

---

# वांझ आशा व आळशी आठवण

एक साधारण वस्तीचा खेडेगांव. तेथें सार्वजनिक कामांत बरा भाग घेणारे एक कार्यकर्ते राहतात. त्यांच्या घरीं मुलीचें लगीन निघालें. ते गृहस्थ सदर गांवांतले 'कार्यकर्ते' आणि शिवाय धनिक. त्यामुळें त्यांच्या घरचें लगीन म्हणजे गांवलगीन च तें. तेव्हां त्यांना वाटलें कीं ह्या हि कामाची वांटणी लोकांत करून द्यावी म्हणजे काम लवकर उरकून जाईल. तेवढयासाठीं सभा भरवली. कामासंबंधीं थोडीफार चर्चा झाली. निरनिराळया कामांसाठीं निरनिराळया कमिटया नेमून दिल्या. सभा संपली. सभेच्या अंतीं सार्वजनिक कामाचे अनुभवी हे गृहस्थ म्हणतात, 'कमिटया तर नेमल्या. पण'—'पण' काय? 'पण तेवढयानें काम कसचें उरकतें? आपण च कामाला लागलें पाहिजे.' लागलीं च कमिटयांचें नाटक एका बाजूला सारून त्यांनीं स्वत: आंग मोडून कामाची सुरवात केली. पुढें, 'लगीन' च तें, तेव्हां पार पडलें हें काय लिहावयास पाहिजे? लगीन नाहीं पार पडणार तर काय सार्वजनिक कार्य पार पडणार आहे? आणि आंग मोडून काम केल्यावर तें पार पडणार नाहीं तर काय कमिटया नेमून पार पडणार आहे?

'कमिटया, संघ, समाज' ह्या साऱ्या अचेतन वस्तु आहेत, व्यक्ति चैतन्यमय आहे, असें सदर कार्यकर्त्यांचें अनुभवान्तीं मत बनलें असावें. सार्वजनिक कामें करतांना 'कमिटया' नेमल्या तरी चालतील. नव्हे, कमिटया च नेमाव्या. कारण, कमिटीच्या खुंटीवर काम टांगलें म्हणजे माणूस मोकळा होतो. पण घरच्या लग्नांत मोकळें होऊन कसें चालेल? तिथें बांधलें जाऊन काम केलें पाहिजे. त्याशिवाय सुटका

नाहीं. तिथें कमिट्या कश्या चालतील? लग्नें कुठें कमिटयांनीं होत असतात? सार्वजनिक कामें कमिटयांनीं होऊं शकतात. कारण, कमिटी नेमणें हें च मुळीं सार्वजनिक काम.

'आतां काय चरखा-संघ निघाला आहे तो सारें पाहून घेईल.' 'तो' म्हणजे कोण? तूं चरखासंघांत आहेस ना? मग चरखासंघ पाहून घेईल म्हणजे तूं च पाहून घेशील असा च अर्थ नाहीं का? असे तुझ्यासारखे सगळे 'तूं' जर वगळले तर चरखासंघांत काय किंवा कोणत्या हि संघांत काय, शिल्लक काय राहतें? गोवर्धनपर्वत कृष्णानें उचलला म्हणजे कोणीं उचलला? सर्व गवळ्यांनीं मिळून उचलला. सर्व गवळ्यांच्या बेरजेला च एका अर्थी कृष्ण हें नांव आहे. गवताच्या एका काडींत जी शक्ति तिच्या शंभरपट शक्ति शंभर काडयांत असें गणित सांगतें. पण ह्या शंभर काडया एकत्र बांधल्या असतां जो भारा बनतो त्याची शक्ति वास्तविक एका काडीच्या शंभरपट च नसते. ती कदाचित सहस्रपट हि असेल. हा शंभर आणि सहस्र ह्यांतला फरक कोणीं केला? समुदायानें किंवा संघानें केला. ही सामुदायिक शक्ति गुप्त रीतीनें काम करीत असते. म्हणून तिला कृष्ण-कृपा म्हणण्यास हि हरकत नाहीं. ह्याला च 'नारायण' हि म्हणतात. 'नार' म्हणजे नर-समुदाय. ह्या समुदायाचें जें आश्रयस्थान किंवा 'अयन' तें नारायण. पण 'नर "करनी" करे तो नारायण' बनावयाचा. करणी न करणाऱ्या किती हि लोकांचा समुदाय किंवा संघ बनविला तरी त्यांत नारायणीय शक्ति उत्पन्न होऊं शकणार नाहीं. एका एका काटकीनें जर तोळाभर जोर केला तर शंभर काटक्यांच्या भाऱ्यांत शंभर च तोळे नव्हे तर हजार तोळे जोर नारायणीय शक्तीनें निर्माण होईल. पण नारायणीय शक्तीचा अर्थ हा न ओळखतां जर काटकी आपलें तोळाभर जोर करण्याचें काम सोडून देईल तर नारायणीय शक्ति शून्य च होईल. व्यक्तींनीं आपापली शक्ति वापरली नाहीं तर संघांत मुळीं च शक्ति येत नाहीं. व्यक्तींनीं

आपापली शक्ति वापरली तर संघांत बेरजेपेक्षां हि ज्यास्त शक्ति उत्पन्न होते. ह्या उत्पन्न होणाऱ्या ज्यादा शक्तीसाठीं संघ असतात. व्यक्तींना हात झाडून मोकळें होण्याची सोय रहावी म्हणून संघ नसतात.

'चरखासंघाचे सभासद कां वाढत नाहींत?' कां वाढत नाहींत म्हणजे? तूं वाढवीत नाहींस म्हणून. किंवा तूं गळून पडलास म्हणून. तूं जर दाखल झाला नसलास तर दाखल हो. म्हणजे सभासद वाढतील. तूं दाखल होऊन हि हलगर्जीपणामुळें गळून पडला असलास तर ईश्वराची क्षमा माग आणि पुन्हां दाखल हो. म्हणजे सभासद वाढतील. तूं जर सभासद असलास तर वर्षाकांठीं निदान एखाद्याला तरी सूत कांतायला शिकव, नेहमीं खादी वापरण्याविषयीं त्याचें मन वळव आणि शेंवटीं सूत-सभासद होण्याविषयीं त्याला विनव. म्हणजे सभासद वाढतील.

घरचें लगीन म्हटलें म्हणजे जसें आंग मोडून काम करावें लागतें तसें सार्वजनिक कार्यांत हि व्यक्तिशः आंग मोडून काम करण्याची जरूर आहे. व्यक्तिगत प्रयत्न बंद पडला तर संघ कांहीं करूं शकणार नाहीं. हरेकानें त्याच्या आसपासचें वातावरण साफ केलें पाहिजे. म्हणजे हां हां म्हणतां सर्व साफ होईल. "केल्याविण कांहीं होत नाहीं।" असें समर्थांचें एक वचन आहे. हें वचन ऐकलें म्हणजे समर्थांनीं ह्यांत 'मोठेंसें' काय सांगितलें असें वाटतें. पण मनुष्याच्या मनाची ठेवण अशी चमत्कारिक आहे कीं काम होण्याचें एक च एक साधन—'काम करणें'—तेवढें सोडून बाहेरून कुठून तरी, कांहीं तरी, अजब रीतीनें, आयतें आपल्या हातांत येऊन पडणार आहे असें त्याला भासत असतें. त्यामुळें "केल्याविण कांहीं होत नाहीं।" हें ज्यानें सांगितलें त्यानें एक फार च मोठी गोष्ट सांगितली असें म्हणावें लागतें.

अव्यक्तावर विश्वास—कांहीं तरी अजब शक्ति, आपल्यास न दिसणारी, आपल्या सर्वांच्या कल्पनेंत हि न येणारी, ह्या विश्वांत काम करून राहिली आहे असा विश्वास—ही चांगली वस्तु आहे. पण ह्या विश्वासाचें पर्यवसान 'केल्याशिवाय च काम होऊन जाईल' अश्या आळशी कल्पनेंत होऊं नये, 'केल्याविण तर कांहीं व्हावयाचें च नाहीं पण आपल्या केल्यानें च सर्व होणार आहे असें मात्र नाहीं' अश्या निरहंकार उद्योगी वृत्तींत व्हावें. '१९२१ सारखी लाट केव्हां येईल?'—एक विचारतो. दुसरा उत्तर देतो—'अश्या लाटा मधून मधून येत असतात. ह्यापुढें हि अशी लाट येईल च.' प्रश्न विचारणारा हि आळशी आणि उत्तर देणारा हि आळशी. उत्तर चांगलें आहे. त्यांत कांहीं दोष नाहीं. पण निरुद्योगी मनुष्याची आशा वांझ होय. असली वांझ आशा आणि निराशा ह्यांत निवड करण्यासारखें विशेष नाहीं. म्हणून भूताची आळशी आठवण करीत बसूं नये किंवा आशाळभूतपणानें भविष्याकडे डोळे लावूं नये. आणि वर्तमानकाळीं 'संघ' करतो च आहे म्हणून व्यक्तिगत कर्तव्याचें भान भुलून जाऊं नये. म्हणजे सर्व यथास्थित होईल.

---

# स्वदेशीधर्म

मनुष्याचें शरीर साडे तीन हात. पण आत्मा तिन्ही लोकांना पुरून उरणारा, किंवा ऋषींच्या भाषेत, 'साडे तीन लोक' व्यापणारा. साडे तीन हात देह आणि साडे तीन लोक आत्मा ह्या मनुष्याच्या मर्यादा आहेत. त्यामुळें त्याच्या स्वधर्माला हि दुहेरी मर्यादा लागू होते. नुसता 'धर्म' म्हटला तर तो व्यापक आहे. पण 'स्व-धर्म' व्यापक असून विशिष्ट आहे.

जसा स्व-धर्म तसा च स्वदेशी-धर्म. मनुष्याचा स्वदेश विशिष्ट अर्थानें "औट हात तुझा जागा।" ह्या वचनांत तुकोबांनीं दाखवून दिला तो च. पण व्यापक अर्थानें "आमुचा स्वदेश। भुवनत्रयामध्यें वास।" असें त्यांनीं च म्हटलें आहे.

'स्व' ही वस्तु विशिष्ट आहे. आणि 'धर्म' व्यापक आहे. त्यामुळें 'स्वधर्म' अथवा 'स्वदेशीधर्म' व्यापक असून विशिष्ट झाला आहे. पण 'व्यापक असून विशिष्ट' ह्या शब्दांवरून जणूं व्यापकता आणि विशिष्टता ह्यांत विरोध च आहे असें भासतें. पण तो विरोधाभास आहे. अग्नीचा पाण्याशीं विरोध आहे. पण अग्नीचा ठिणगीशीं कोठें विरोध आहे? व्यापकाचा सङ्कुचिताशीं विरोध आहे, विशिष्टाशीं विरोध नाहीं. अधर्म संकुचित आहे. धर्म व्यापक आहे. स्वधर्म (व्यापक असून) विशिष्ट आहे. स्वधर्म ही धर्माची च ठिणगी आहे. आणि स्वदेशीधर्म हें स्वधर्माचें आर्थिक नामान्तर आहे.

"घरींचिया उजिएड करावा। पारखिया आंधार पाडावा।" हा भेद दिव्यापाशीं नाहीं. म्हणून ज्ञानेश्वरमहाराजांनीं भक्ताची

समताबुद्धि वाखाणण्यासाटीं दिव्याचा दाखला घेतला आहे. दिवा हि जवळच्याला अधिक प्रकाश देतो आणि दूरच्याला कमी प्रकाश देतो. पण त्यामुळें दिव्याची समता किंवा व्यापकता बाधित होत नाहीं. दिव्याचा प्रकाश किंवा अग्नीची उष्णता हीं सार्वजनिक स्वरूपाचीं आहेत. पण तीं सार्वजनिक असून हि दिव्याच्या आणि अग्नीच्या शरीर-मर्यादेमुळें त्यांना एकप्रकारचें खाजगी स्वरूप आलें आहे. सूर्य हा संपूर्ण सार्वजनिक भासतो. पण तो हि आपल्या ग्रहमालेपुरता सार्वजनिक आहे. ग्रहमालेच्या बाहेर पहाल तर तो हि लहानश्या दिव्यासारखा किंवा ठिणगीसारखा च आहे. सूर्य काय आणि दिवा काय, आकारांत फरक आहे, बाकी प्रकार एक च. 'जवळून दूर' हें स्वदेशीधर्माचें अपरिहार्य सूत्र आहे.

वेदांमध्यें वसिष्टऋषींनीं अग्नीचें वर्णन 'दूरे-दृशं गृहपतिम्' ह्या शब्दांनीं केलें आहे. 'दूरे-दृश' म्हणजे दूर पाहणारा. अग्नि नजर दूर टाकतो पण रसोई करतो घरची. म्हणून 'गृह-पति.' म्हणजे ह्यांत ऋषीनें अग्नीच्या दोन गुणाचें पृथक्करण केलें आहे. एक प्रकाश आणि दुसरा उष्णता. प्रकाश व्यापक आहे आणि उष्णता विशिष्ट आहे. समोरच्या डोंगराला आग लागली हें दुरून दिसतें. पण धग दुरून लागत नाहीं. वास्तविक प्रकाशाला हि 'जवळून दूर' हा कायदा लागू आहे. आणि उष्णतेला तर आहे च. पण त्यांतल्या त्यांत तुलनेनें प्रकाश व्यापक आणि उष्णता विशिष्ट असें म्हणण्यास हरकत नाहीं. अग्नि ज्याप्रमाणें दूर नजर टाकतो पण रांधतो चुलीवरचें, त्याप्रमाणें स्वदेशी-धर्माची नजर त्रिभुवन-व्यापक आहे पण प्रत्यक्ष कार्य साडे तीन हात देहाच्या आसपास आहे.

स्वदेशीधर्म म्हणजे दयाभावाची अंमलबजावणी. हा मुद्दा लक्षांत घेतला म्हणजे स्वदेशीधर्माच्या बाबतींत जे अनेक घोटाळ्याचे प्रश्न उत्पन्न होतात ते सुटतील. दयेची अमुक एक ठरीव व्याख्या नाहीं.

त्यामुळें स्वदेशीधर्माचें एकजिनसी धोरण सांगणें कठिण आहे. आईचें मन मुलाविषयीं प्रेमानें भरलेलें असतें. त्यामुळें 'भूक' म्हटलें कीं आई त्याला खायला तयार करून घालते. पण आईच्या दयेची ह्यांत परिसमाप्ति नाहीं मुलानें खायला मागितलें असतां त्याला देणें हें जसें आईचें 'दयाळु' कर्तव्य तसें पुष्कळ वेळां मुलाची आरोग्यस्थिति लक्षांत घेऊन त्यानें खायला मागितलें असतां न देणें हें हि त्या च आईचें तितकें च दयाळु कर्तव्य ठरतें. हें कटु कर्तव्य करण्यास जी आई तयार नाहीं तिला 'दया' नाहीं, 'माया' आहे. स्वदेशीधर्म मायाळु नाहीं, दयाळु आहे. "मऊ मेणाहूनि आम्ही विष्णुदास । कठिण वज्रास भेदूं ऐसे।" असें विष्णुदासाप्रमाणें दयेचें स्वरूप आहे. दयेचा निश्चित एकेरी कायदा नाहीं. मायेचा कायदा एकेरी आहे. आंधळयाला पौर्णिमा—अमावस्येचा भेद नाहीं. त्याचें आपलें एकेरी, सुटसुटीत 'अद्वैत' आहे. दयेला तारतम्य पाहणें भाग आहे. कारण, ती डोळस आहे. स्वदेशीधर्म हि दयाभावाचा विनियोग असल्यामुळें तारतम्यानें वागणारा धर्म आहे. म्हणून मँचेस्टरचें कापड विकत घेण्याचा जसा स्वदेशीधर्माला निषेध आहे तसा चीनला अफू पाजण्याचा हि निषेध आहे. देशी दारू 'देशी' असून सुद्धां स्वदेशीधर्माला ग्राह्य नाहीं. उलट, स्विट्झरलंडचीं घडयाळें (खरी जरूर असेल तर) परदेशी असून हि विकत घेण्याला बाध नाहीं.

# महाराष्ट्राची सरस्वती

इंद्रायणीनदीचे महाराष्ट्रावर अनंत उपकार झाले आहेत. भूगोलाच्या आंधळ्या नजरेला इंद्रायणीनदी एक किरकोळ नदी भासेल. आणि लांबी च मोजली तर खरोखर च ती किरकोळ नदी आहे. अथवा नदी तरी कसली? एक मोठ्यापैकीं झरा आहे असें च कां म्हणा ना? पण तो झरा नुसता पाण्याचा झरा नाहीं. तो आध्यात्मिक स्फूर्तीचा झरा आहे.

जें पाणी चवीला गोड आणि लाकडें खाल्लीं तरी जिरवून टाकणारें तें उत्तम. इंद्रायणीचें पाणी ह्या दुहेरी कसोटीला उतरलें आहे. ज्ञानाइतकें पाचक आणि भक्तीइतकें रोचक दुसरें कांहीं च दाखवितां येणार नाहीं. इंद्रायणीच्या पाण्यांत पाचक ज्ञान आणि रोचक भक्ति भरपूर भरलेलीं आहेत अशी इतिहासाची साक्ष आहे. 'ज्ञानियांचे गुरु' ज्ञानेश्वरमहाराज आणि भक्तांचे मुगुटमणि तुकोबा दोघे इंद्रायणीचें पाणी पिऊन पुष्ट झालेले.

'ग्यानबा—तुकाराम' हा भाविक मनाला मुग्ध करणारा महा-मंत्र इंद्रायणीच्या पवित्र पाण्यांतून निर्माण झाला. देहू आणि आळंदी इंद्रायणीच्या च कांठावर एकमेकांच्या पंचक्रोशींत वसलीं आहेत. ज्ञानोबांच्या आळंदीनें ज्ञानाचा पाया रचला आणि तुकोबांच्या देहूनें भक्तीचा कळस चढविला. एका च पंचक्रोशींत इतक्या विशाल उंचीचे दोन महापुरुष गाजले असें उदाहरण क्वचित च आढळतें. नदीच्या आसपासचा प्रदेश बहुधा सुपीक असतो. पण इंद्रायणीच्या कांठच्या जमीनीनें सुपीकपणाची कमाल केली. ज्ञानेश्वरमहाराज

म्हणजे ज्ञानाचा कस काढणारे च होऊन गेले. आणि तुकोबा तर मूर्तिमंत भक्तीचा रस. इतका कस आणि इतका रस ज्या पाण्यांत सांठविला होता त्या पाण्याची योग्यता अपूर्व च म्हटली पाहिजे.

इंद्रायणीनदी देहूवरून च आळंदीकडे वाहत जाते. पण भागवतधर्माची नदी आळंदीवरून देहूकडे वाहत आली आहे. म्हणजे तुकोबांनीं ज्ञानेश्वरमहाराजांच्या हातावर इंद्रायणीचा आंवळा देऊन त्यांच्या कडून चांगला च कोहळा काढून घेतला असें दिसतें! तुकोबा जातीनें कुणबी पण वाण्याचा धंदा करीत. तो धंदा त्यांना नीटसा साधला नाहीं असें म्हणतात. पण खऱ्या 'स्वहिताचा धंदा' त्यांना उत्कृष्ट साधत होता ह्यात शंका नाहीं. हा धंदा जर त्यांना साधत नसता तर पूर्वजांच्या इस्टेटीला त्यांनीं 'कळस' कसा चढविला असता? आणि वंशजांसाठीं 'अभंग' इस्टेट कशी जमवून ठेवली असती?

'ग्यानबा–तुकाराम' हा एक प्रकारचा मध्यमपदलोपी समास आहे. म्हणजे ह्यांत भागवत–धर्माच्या सर्व साधुसंतांचा समावेश आहे. थोडक्यांत दोघांचा उच्चार केला आहे. ज्ञानोबा आचार्य आणि तुकोबा प्रचारक. तुकाराममहाराजांचे अभंग महारापोरांच्या तोंडीं बसून गेले आहेत. महाराष्ट्रांत ज्ञानाचा सार्वत्रिक प्रसार तुकोबांइतका कोणीं च केला नाहीं. ज्ञानोबांनीं ज्ञानाचें भांडार भरून ठेवलें. तुकोबांनीं हमाली पतकरून तें 'भांडार फोडलें' आणि 'धन्याचा माल' गरीबगुरिबांपर्यंत पोंचविला. म्हणून महाराष्ट्रांतली जनता कृतज्ञतापूर्वक ह्या दोघांच्या नांवाचा जयजयकार करीत असते.

'ग्यानबा–तुकाराम' हा मध्यमपदलोपी समास असून ह्यांत इतर साधुसंत समजून घ्यावयाचे हें तर खरें च. पण ह्या च दोघांचा उच्चार करण्यांत हेतु आहे. सत्पुरुषांची सार्वराष्ट्रीय परिषद भरविण्याचें ठरलें तर महाराष्ट्राची बाजू मांडण्याकरितां ह्या च दोघांना पाठवावें लागेल.

हे महाराष्ट्राची बाजू उत्तम राखतील अशी खात्री असल्यामुळें महाराष्ट्रीय जनतेकडून ह्यांना च निवडण्यांत आलें आहे. इंद्रायणी ही महाराष्ट्राची सरस्वती आहे. कारण हिच्या कांठावर सारस्वताचे हे दोन अप्रतिम बगीचे तयार झाले असून त्यांतील 'फुलां–फळां–छायेचा' आनंद सर्व महाराष्ट्रास सतत लुटावयास सांपडत आहे. ज्ञानोबांनीं ज्ञानेश्वरी लिहिली गोदावरीच्या तीरीं. तथापि ज्ञानोबांची समाधि इंद्रायणीच्या कांठावर असल्यामुळें ज्ञानोबांवर हक्क इंद्रायणीचा च समजला पाहिजे. संतांचा सारा 'अट्टाहास' "शेंवटचा दीस गोड व्हावा" म्हणून असतो. त्यामुळें संतांची मृत्युतिथि ही च पुण्यतिथि होय. संतांची मृत्युतिथि तशी च त्यांची मृत्युभूमि महत्त्वाची असते. अवताराची जन्मभूमि, वीरपुरुषाची कर्मभूमि आणि संतांची मृत्युभूमि पवित्र मानलेली आहे. म्हणून ज्ञानेश्वरी जरी साक्षात इंद्रायणीच्या कांठीं लिहिली नसली तरी तिचें फळ इंद्रायणीला च मिळणारें आहे. म्हणून महाराष्ट्राची सरस्वती इंद्रायणी च.

आणि तुकोबांचें तर प्रायः सर्व जीवन देहूमध्यें च गेलें. त्यामुळें त्यांचीं बहुतेक स्मरणें इंद्रायणीच्या पाण्यावर लिहिलेलीं आहेत. देहू गाव हें सबंध तुकोबांच्या चरित्राचें स्मारक आहे. तुकोबांचें राहतें घर, त्यांचे पूर्वज विश्वंभर बोवा ह्यांची ओसरी, तुकोबांनीं ज्या देवळाचा जीर्णोद्धार केला व जेथें तुकोबा भजन करीत असत तें विठोबाचें देऊळ, त्या देवळाजवळची आणि आज देवळाच्या आवारांत दाखल झालेली मंबाजीबावांची जागा, तुकोबा जेथें नामस्मरण करीत तो भंडारा डोंगर, त्यांनीं आपले अभंग जेथें बुडविले तो इंद्रायणीचा डोह, तेरा दिवसपर्यंत ईश्वरदर्शनार्थ ज्या शिळेवर तुकोबा धरणें धरून बसले होते ती शिळा, शेंवटीं ज्या वृक्षाखालीं तुकोबांनीं 'ह्या च देहीं ह्या च डोळां' मुक्तीचा सोहळा अनुभविला तो नांदुरकीचा वृक्ष—हे तुकोबांच्या चरित्राचे साक्षीदार देहूस पहावयास सापडतात. म्हणून तुकोबांच्या अभंगाची

मालकी ज्या इंद्रायणीच्या कांठीं ते लिहिले गेले, ज्या इंद्रायणींत तुको-बांनीं ते स्वतः बुडविले, ज्या इंद्रायणीनें ते बुडविण्याचा इनकार करून कोरडेच्या कोरडे आपल्या पृष्ठभागावर उचलून धरले त्या इंद्रायणीची च होय हें उघड आहे.

इंद्रायणी ही महाराष्ट्राची सरस्वती असल्यामुळें वैदिक ऋषि ज्या मंत्रानें सरस्वतीची प्रार्थना करतात त्या च मंत्रानें आपण इंद्रायणीची प्रार्थना करूं या:

अम्बितमे नदीतमे देवितमे सरस्वति ।
अप्रशस्ता इव स्मसि प्रशस्तिमम्ब नस्कृधि ॥

—ऋग्वेद

हे उत्तम माते, उत्तम नदि, उत्तम देवि, हे 'सरस्वति' आज आमचें जीवन अप्रशस्त बनल्यासारखें आहे. आई, तें तूं प्रशस्त कर.

---

# जीवन आणि शिक्षण

हल्लींच्या चमत्कारिक शिक्षण–पद्धतीमुळें जीवनाचे दोन तुकडे पडतात. आयुष्याचीं पहिलीं पंधरावीस वर्षें मनुष्यानें जगण्याच्या भानगडींत न पडतां नुसतें शिक्षण घ्यावें आणि नंतर शिक्षण गुंडाळून ठेवून मरेपर्यंत जगावें !

ही रीत निसर्ग–योजनेच्या विरुद्ध आहे. हातभर उंचीचा बालक साडे तीन हात कसा बनतो हें त्याच्या किंवा इतरांच्या हि

ध्यानांत येत नाहीं. शरिराची रोज वाढ चाललेली असते. ही वाढ सावकाश, क्रमाक्रमानें, थोडीथोडी होत असते. त्यामुळें ती होत आहे ह्याचें भान हि राहत नाहीं. आज रात्रीं निजेपर्यंत दोन फूट उंची होती आणि उद्यां सकाळीं उठून पहावें तों अडीच फूट भरली असें होत नाहीं. अमुक एका वर्षाच्या अगदीं अखेरच्या दिवसापर्यंत मनुष्यानें जीवनाविषयीं संपूर्ण बेजबाबदार राहिलें तरी चालेल, नव्हे—बेजबाबदार राहिलें पाहिजे, आणि पुढच्या वर्षाचा पहिला दिवस उजेडला कीं लागलीं च संपूर्ण जबाबदारी उचलण्यास सज्ज झालें पाहिजे अशी हल्लींच्या शिक्षण–पद्धतीची योजना आहे. संपूर्ण बेजबाब-दारींतून संपूर्ण जबाबदारींत एकदम उडी मारावयाची म्हणजे ती एक हनुमान–उडी च झाली. असली हनुमान–उडी मारण्याच्या प्रयत्नांत हातपाय तुटले तर नवल काय ?

भगवंतानीं अर्जुनाला कुरु–क्षेत्रांत भगवद्गीता सांगितली. भगवद्गीतेचे अगाऊ वर्ग घेऊन मग त्याला कुरुक्षेत्रांत ढकललें नाहीं. म्हणून च ती गीता पचली. आम्ही ज्याला जीवनाच्या तयारीचें ज्ञान म्हणतों तें जीवनापासून अजीबात अलिप्त राखूं पाहतों. त्यामुळें सदर ज्ञानानें मरणाची तयारी होते.

वीस वर्षांचा उत्साही तरुण अभ्यासांत मग्न आहे. नाना प्रकारच्या उंच विचारांचे मनोरे बांधीत आहे. 'मी शिवाजीमहाराजां-प्रमाणें मायदेशाची सेवा करीन. मी वाल्मीकीसारखा कवि होईन. मी न्यूटनसारखे शोध करीन,' एक नी दोन, काय काय कल्पना करतो. अशा कल्पना करण्याचें भाग्य हि थोडयांना लाभतें. पण ज्यांना लाभतें त्यांची गोष्ट घ्यायची. ह्या कल्पनांचें पुढें काय होतें ? 'वितीएवढेंसें पोट' पण 'कोण तयाचा बोभाट !' त्या पोटाचा प्रश्न पुढें उभा राहिला म्हणजे बिचारा दीन होऊन जातो. जीवनाची जबाबदारी म्हणजे 'क्या चीज है' ह्याची आजपर्यंत मुळीं च कल्पना

नव्हती. आणि आतां तर डोंगर पुढें उभा राहिला. मग काय करतो ? मग पोटासाठीं वणवण हिंडणारा शिवाजी, दुःखाचें गडगाणें गाणारा वाल्मीकि आणि कधीं नोकरीचा तर कधीं बायकोचा, कधीं मुलीच्या स्थळाचा व शेवटीं श्मशानाचा, शोध करणारा न्यूटन असल्या भूमिका घेऊन आपल्या कल्पनांचें समाधान करतो. हा हनुमान-उडीचा परिणाम आहे.

'काय हो! तुम्ही पुढें काय करणार ?'—एका मॅट्रिक मधल्या विद्यार्थाला विचारलें.

'पुढें काय ? पुढें कॉलेजांत जावयाचें.'

'होय. कॉलेजांत जावयाचें खरें. पण पुढें काय हा प्रश्न राहतो च.'

'प्रश्न राहतो. पण त्याचा आतां च कश्याला विचार करा ? पुढें पाहतां येईल.'

नंतर तीन वर्षांनीं त्या च विद्यार्थ्याला तो च प्रश्न विचारला.

'अजून कांहीं विचार झाला नाहीं.'

'विचार झाला नाहीं म्हणजे ? पण केला होता का ?'

'नाहीं बुवा. विचार केला च नाहीं. काय विचार करा ? कांहीं सुचत नाहीं. त्यांतून अजून दीड वर्ष वेळ आहे. पुढें पाहतां येईल.'

'पुढें पाहतां येईल' हे शब्द तीन वर्षांच्या पूर्वीं उच्चारले ते च. पण पूर्वींच्या आवाजांत बेफिकीरपणा होता. आतांच्या आवाजांत थोडी चिंतेची झाक होती.

पुन्हां दीड वर्षानें त्या च पृच्छकानें त्या च विद्यार्थ्याला—किंवा आतां 'गृहस्थां'ना म्हणा—तो च प्रश्न विचारला. ह्या वेळीं चेहरा चिंताक्रान्त होता. आवाजांतला बेफिकीरपणा पार उडून गेला

गेला होता. "ततः किं ततः किं ततः किं ततः किम्" हा शंकराचार्यांनीं विचारलेला सनातन सवाल आतां चांगला च डोक्यांत घुमूं लागला होता. पण जवळ उत्तर नव्हतें च.

आजचें मरण उद्यांवर ढकलतां ढकलतां एक दिवस असा उगवतो कीं ज्या दिवशीं मरावें च लागतें. हा प्रसंग त्यांच्यावर येत नाहीं, जे 'मरणा आधीं च' मरून राहतात, जे आपलें मरण डोळ्यांनीं पाहतात. जे मरणाचा अगाऊ अनुभव घेतात त्यांचें मरण टळतें. जे मरणाचा अगाऊ अनुभव घेण्याला कचरतात, धजत नाहींत, त्यांच्या उरावर मरण आदळतें. समोर खांब आहे ही गोष्ट आंधळ्याला त्या खांबाचा छातीला प्रत्यक्ष धक्का लागल्यानंतर समजते, डोळसाला तो खांब अगाऊ दिसतो. म्हणून त्याचा धक्का त्याच्या छातीवर लागत नाहीं.

जीवनाची जबाबदारी म्हणजे कांहीं अगदीं मरण नाहीं. आणि मरण तरी काय एवढें मोठें 'मरण' आहे? अनुभवाच्या अभावीं सारा बाऊ वाटतो. वास्तविक जीवन आणि मरण दोन्ही आनंदाच्या वस्तु असल्या पाहिजेत. कारण आपल्या परमप्रिय पित्यानें—परमेश्वरानें—त्या आपल्याला दिल्या आहेत. ईश्वरानें जीवन दु:खाचें निर्मिलेलें नाहीं. पण आपल्याला तें जगतां मात्र आलें पाहिजे. कोणता बाप आपल्या मुलाचें जीवन तळमळीचें असावें अशी इच्छा करील? त्यांतून ईश्वराच्या प्रेमाला, करुणेला, कांहीं पार आहे? तो आपल्या लाडक्या लेकरांसाठीं सुखाचें जीवन निर्माण करील कीं अट्टाहासाचें जीवन निर्माण करील? कल्पना करयाला! प्रत्यक्ष च पहा ना. जी वस्तु आपल्याला जितकी जरुरीची ती तितकी सुलभतेनें मिळावी अशी ईश्वरानें योजना केली आहे. पाण्यापेक्षां हवेची जरूर ज्यास्त. तर ईश्वरानें पाण्यापेक्षा हवा अधिक सुलभ केली आहे. जिथें नाक तिथें

हवा ठेवली आहे. पाण्यापेक्षां अन्नाची जरूर कमी. म्हणून पाणी मिळविण्यापेक्षां अन्न मिळविण्याला अधिक परिश्रम पडतात. 'आत्मा' ही वस्तु सर्वांत अधिक महत्त्वाची तर ती प्रत्येकाला कायमची देऊन च टाकली आहे. अशी ईश्वराची प्रेमळ योजना आहे. तिचा विचार न करतां आम्ही निरुपयोगी जडजवाहीर जमा करण्याइतकें 'जड' बनलों तर आम्हांला उरीं फुटावें लागेल. पण हा आमचा जडतेचा दोष आहे. त्याचा बोल ईश्वराला नाहीं.

जीवनाची जबाबदारी ही भयानक वस्तु नाहीं. आनंदानें भरलेली आहे जर ईश्वरानें निर्मिलेली जीवनाची ही सरळ योजना लक्षांत घेऊन भलभलत्या वासनांना आळा घालूं शकलों तर. पण जशी ती आनंदानें भरलेली वस्तु आहे तशी ती शिक्षणानें हि भरलेली आहे. जो जीवनाच्या जबाबदारीला मुकला तो सर्व शिक्षण गमावून बसला म्हणून निखालस समजावें. पुष्कळांची अशी समजूत आहे कीं लहानपणापासून जीवनाच्या जबाबदारीचें भान जर मुलाला राहील तर त्याचें जीवन कोमेजून जाईल. पण जीवनाच्या जबाबदारीचें भान असण्यानें जर जीवन करपून जात असेल तर जीवन ही वस्तु जगण्याच्या लायकीची च नाहीं असें म्हणावें लागेल. पण आज ही समजूत पुष्कळ शिक्षणशास्त्रज्ञांची हि आहे. आणि ह्याचें मुख्य कारण जीवनाविषयींची दुष्ट कल्पना. जीवन म्हणजे 'कलह' आहे असा ग्रह झाला. इसापनीतींतल्या 'अरसिक' मानलेल्या, पण वास्तविक मर्म जाणणाऱ्या, कोंबड्यापासून बोध घेऊन जोंधळ्याच्या दाण्यापेक्षा मोत्याला मान देण्याचें सोडून दिलें तर 'जीवनांतला कलह' नाहींसा होऊन जीवनांत सहकार दाखल होईल. 'माकडाच्या हातीं मोत्यांची माळ' ही म्हण ज्यांनीं निर्माण केली त्यांनीं मनुष्याचें मनुष्यत्व सिद्ध न करतां खरोखर मनुष्याच्या पूर्वजांविषयींचें डार्विनचें तत्त्व च सिद्ध केलें. 'मारुतीच्या हातीं मोत्यांची माळ' ही गोष्ट ज्यांनीं रचली ते आपल्या मनुष्यत्वाला जागले.

जीवन जर भयानक वस्तु असेल, 'कलह' असेल, तर मुलांना त्यांत दाखल करूं नका आणि स्वतः हि तें जगूं नका. पण ती जर जगण्यालायक वस्तु असेल तर मुलांना त्यांत अवश्य दाखल करा. त्याशिवाय त्यांना शिक्षण मिळणार नाहीं. भगवद्गीता जशी कुरुक्षेत्रांत तसें शिक्षण जीवनक्षेत्रांत च दिलें पाहिजे—देतां येईल. 'देतां येईल' ही हि भाषा बरोबर नाहीं. तेथें च तें मिळूं शकेल.

अर्जुनापुढें प्रत्यक्ष कर्तव्य करीत असतां प्रश्न उत्पन्न झाला. त्याचें उत्तर देण्यासाठीं भगवद्गीता निर्माण झाली. ह्याला च शिक्षण म्हणावयाचें. मुलाला शेतांत काम करूं द्या. त्यांत कांहीं प्रश्न उत्पन्न झाले तर त्यांचीं उत्तरें देण्यासाठीं सृष्टिशास्त्राची किंवा पदार्थविज्ञानाची किंवा इतर, जी जरूर असेल ती, माहिती द्या. हें खरें शिक्षण होईल. मुलाला रसोई करूं द्या. त्यांत जरूर तेथें रसायनशास्त्र शिकवा. पण मुख्य मुद्दा त्याला जीवन जगूं द्या. व्यवहारांत काम करणाऱ्या माणसाला हि शिक्षण मिळत च असतें. तसें च लहान मुलाला हि मिळावें. फरक इतका च कीं मुलाच्या आसपास जरूर तेथें मार्गदर्शन करणारीं माणसें हजर असावीं. हीं माणसें हि 'शिकविणारीं' म्हणून 'नियोजित' नसावीं. तीं हि जीवन जगत असावीं, जशीं व्यवहारांतलीं माणसें जीवन जगत असतात. फरक इतका च कीं ह्या 'शिक्षक' म्हणविलेल्यांचें जीवन विचारमय असावें आणि त्यांतील विचार प्रसंगीं मुलाला समजावून सांगण्याची पात्रता त्यांना असावी. पण 'शिक्षक' म्हणून स्वतंत्र धंदा नको. 'विद्यार्थी' म्हणून कोणी 'माणसाच्या' बाहेरचा प्राणी नको. आणि काय करतां म्हणून विचारलें तर 'शिकतों' किंवा 'शिकवितों' असें उत्तर यावयास नको. 'शेती करतों' किंवा 'विणतों' अश्यासारखें शुद्ध धंदेवाईक म्हणा, व्यावहारिक म्हणा, पण जीवनांतलें उत्तर यावयास पाहिजे. ह्याला उदाहरण विद्यार्थी राम-लक्ष्मण आणि गुरु विश्वामित्र ह्यांचें. विश्वामित्र यज्ञ करीत होता,

त्याच्या रक्षणासाठीं त्यानें दशरथापाशीं मुलें मागितलीं. त्या च कामासाठीं म्हणून दशरथानें मुलें दिलीं, मुलांची हि आम्ही यज्ञरक्षणाचें 'काम' करण्यासाठीं जात आहोंत अशी जबाबदार भावना होती. त्यांत त्यांना अपूर्व शिक्षण मिळालें. पण राम-लक्ष्मणांनीं काय केलें म्हणाल तर त्यांनीं 'यज्ञरक्षण केलें,' 'शिक्षण मिळविलें' नव्हे. पण 'शिक्षण मिळालें' खरें. त्याला इलाज नाहीं.

शिक्षण हें कर्तव्यकर्माचें आनुषंगिक फळ आहे. जो जो कर्तव्यकर्म करतो त्याला तें फळत-नकळ मिळतें. मुलांना हि तें तसें च मिळालें पाहिजे. इतरांना ते ठेंचा खात खात मिळतें. लहान मुलास अजून तितकी शक्ति आलेली नसल्यामुळें फारश्या ठेंचा खाव्या लागणार नाहींत असें वातावरण त्यांच्या आसपास उभें करावें. आणि तीं हळू हळू स्वावलंबी बनतील अशी अपेक्षा आणि योजना असावी. शिक्षण हें फळ आहे. आणि "मा फलेषु कदाचन" ही मर्यादा ह्या हि फळाला लागू आहे. शिक्षणासाठीं म्हणून एखादें कर्म करणें हें हि सकाम झालें. आणि त्यांत हि "इदमद्य मया लब्धम्।"—आज मीं हें मिळविलें, 'इदं प्राप्स्ये"—उद्यां मी तें मिळवीन, इत्यादि वासना आल्या च. म्हणून ह्या 'शिक्षण-मोहांतून' सुटलें च पाहिजे. ह्या मोहातून जो सुटला त्याला सर्वोत्तम शिक्षण मिळतें. आई आजारी आहे. तिची सेवा करण्यानें मला पुष्कळ शिक्षण मिळणार आहे. पण ह्या शिक्षणाच्या लोभानें मीं आईची सेवा करतां कामा नये. तर हें माझें पवित्र कर्तव्य आहे ह्या भावनेनें मीं आईची सेवा केली पाहिजे. किंवा आई आजारी आहे आणि तिची सेवा करण्यानें माझें दुसरें कांहीं—ज्याला मी 'शिक्षण' समजतों तें—बुडत आहे तर ह्या शिक्षण बुडण्याच्या भीतीनें मी आईची सेवा टाळतां कामा नये.

प्राथमिक महत्त्वाच्या जीवनोपयोगी परिश्रमाला शिक्षणांत स्थान असावें असें कबूल करणाऱ्या कांहीं शिक्षण-शास्त्रज्ञांचें त्यावर विशेष

असें म्हणणें आहे कीं हे परिश्रम हि 'शिक्षणाच्या' दृष्टीनें च दाखल करावे. 'पोट भरण्याच्या' दृष्टीनें नव्हे. आज 'पोट भरण्याचा' जो द्वाड अर्थ प्रचलित आहे त्याला कंटाळून हें म्हणणें आहे, आणि तितक्या पुरतें तें योग्य आहे. पण मनुष्याला 'पोट' देण्यांत ईश्वराचा हेतु आहे. प्रामाणिकपणें पोट भरणें ही गोष्ट जर मनुष्याला साधली तर समाजाचीं बहुतेक दुःखें आणि पातकें नाहींशीं होणार आहेत. म्हणून च मनूनें "योऽर्थे शुचिः स हि शुचिः।"--जो आर्थिक दृष्ट्या पवित्र तो च पवित्र--असे यथार्थ उद्गार काढले आहेत. 'सर्वेषामविरोधेन' कसें जगावें ह्या शिक्षणांत सर्व शिक्षण येऊन जातें. अविरोध-वृत्तीनें शरीरयात्रा चालविणें हें मनुष्याचें प्रथम कर्तव्य आहे. हें कर्तव्य करण्यानें च त्याची आध्यात्मिक उन्नति होणारी आहे. म्हणून शरीरयात्रा सिद्ध करण्यासाठीं उपयुक्त परिश्रम करणें ह्याला च शास्त्रकारांनीं 'यज्ञ' हें नांव दिलं आहे. "उदर–भरण नोहे जाणिजे यज्ञ–कर्म" हें वामनपंडितांचें वचन प्रसिद्ध आहे म्हणून मी शरीर–यात्रा चालविण्यासाठीं परिश्रम करीत आहें ही भावना योग्य आहे. 'शरीर–यात्रा' म्हणजे माझ्या साडे तीन हात शरिराची यात्रा असें न समजतां समाजशरिराची असा उदार अर्थ चित्तांत ठसला पाहिजे. माझी शरीर-यात्रा म्हणजे समाजाची सेवा, आणि म्हणजे च ईश्वराची पूजा, इतकें समीकरण दृढ झालें पाहिजे. आणि ह्या ईश्वरसेवेंत देह झिजविणें हें माझें कर्तव्य असून तें मीं केलें पाहिजे अशी जाणीव प्रत्येकाला असली पाहिजे.

अर्थात ती लहान मुलाला हि पाहिजे त्यासाठीं त्याला आपल्या मगदुराप्रमाणें जीवनांत भाग घेण्यास अवकाश दिला पाहिजे. आणि जीवन हा मुख्य केंद्र करून त्याच्या आसपास जरुरीप्रमाणें सर्व शिक्षण उभें केलें पाहिजे.

अशानें जीवनाचे दोन तुकडे होणार नाहींत. जीवनाची

जबाबदारी अचानक येऊन पडल्यानें उत्पन्न होणाऱ्या अडचणी उत्पन्न होणार नाहींत. शिक्षण नकळत मिळत राहील. पण 'शिक्षण-मोह' चिकटणार नाहीं. आणि निष्काम कर्माचें वळण लागेल.

---

# फक्त शिक्षण

"काय हो ! तुम्ही कोणतें काम उत्तम करूं शकाल असें तुम्हांला वाटतें ?" एका देशसेवेच्छूला कोणींसा प्रश्न विचारला.

"मला वाटतें मी फक्त शिक्षणाचें काम करूं शकेन. आणि त्याची च मला हौस आहे." सदर तरुण गृहस्थांनीं जबाब दिला.

"तें तर बरोबर आहे. कारण पुष्कळ वेळां जें येत असतें त्याची हौस वाटल्याशिवाय इलाज च नसतो. पण दुसरें कांहीं काम तुम्हीं करूं शकाल कीं नाहीं ?"

"नाहीं. मला दुसरें कोणतें च काम करतां येणार नाहीं. फक्त शिकवूं शकेन. आणि तें मात्र चांगलें शिकवूं शकेन असा विश्वास वाटतो."

"अहो ! चांगलें शिकवूं शकाल खरें. पण चांगलें 'काय' शिकवूं शकाल ? कांतणें, पिंजणें, विणणें, चांगलें शिकवूं शकाल ?"

"नाहीं. तें नाहीं शिकवितां येणार."

"मग शिवणकाम, रंगकाम, सुतारी ?"

"नाहीं. असलें कांहीं च नाहीं."

"स्वयंपाक करणें, दळणें वगैरे घरगुती काम शिकवूं शकाल ?"

" नाहीं. कोणतें हि काम म्हणून कधीं केलें च नाहीं. मी फक्त शिक्षणाचें.......”

“अहो! जें जें विचारावें तें तें नाहीं म्हणतां. आणि 'फक्त' शिक्षणाचें काम करूं शकेन म्हणतां. ह्याचा अर्थ काय? बगीच्याचें काम शिकवूं शकाल?"

" हें काय विचारतां? मीं आधीं च सांगितलें ना, कीं मला दुसरें कोणतें च काम करतां येणार नाहीं म्हणून. मी मराठी साहित्य शिकवूं शकेन."—–देशसेवेच्छु जरा त्रासून म्हणाले.

“हें ठीक सांगितलेंत. ह्यानें कांहीं तरी बोध झाला. ज्ञानेश्वरीसारखा ग्रंथ कसा लिहावा हें शिकवूं शकाल?" पृच्छकांनीं विनोदानें विचारलें.

आतां मात्र देशसेवेच्छु चांगले च चिडल्यासारखे दिसले आणि तोल न सांभाळतां कांहीं तरी बोलणार, इतक्यांत पृच्छकमहाशय मध्यें च म्हणतात :

“शांति, क्षमा, तितिक्षा कशी राखावी हें शिकवाल? ”

झालें आगींत ग्यासतेल ओतल्यासारखें झालें. त्यामुळें संवाद चांगला च पेटणार होता. पण पृच्छकांनीं लागलीं च तो पाणी घालून विझवला. “तुमचें म्हणणें मी समजलों. तुम्ही लिहिणें, वाचणें वगैरे शिकवूं शकाल. आणि ह्याचा हि जीवनाला थोडासा उपयोग आहे, नाहीं असें नाहीं. पण विणकाम शिकण्याची तयारी आहे काय?”

“आतां नवीन कांहीं शिकायची हौस वाटत नाहीं. त्यांतून विणकाम तर मला येणार च नाहीं. कारण आजपर्यंत हाताला तशी कांहीं संवय नाहीं.”

“होय, त्यामुळें थोडा शिकायला वेळ लागेल. पण येणार च नाहीं असें थोडें च आहे? ”

"मला तर वाटतें येणार च नाहीं. पण समजा पुष्कळ प्रयासांनीं आलें च तरी मला त्याचा कंटाळा वाटतो. त्यामुळें तें माझ्याच्यानें होणार नाहीं असें च तुम्ही समजा."

"बरें, लिहिणें शिकवण्याचें काम करूं शकाल, तसें प्रत्यक्ष लिहिण्याचें हि काम करूं शकाल?"

"हो. करूं शकेन म्हणा. पण नुसतें लिहीत बसावयाचें म्हणजे तें हि कंटाळवाणें च होणार. तथापि तें करण्यास हरकत नाहीं."

हा संवाद येथें च संपला. त्याची पुढें फल–श्रुति काय झाली हें पाहण्याची आपल्याला गरज नाहीं.

शिक्षकाचें मानसशास्त्र कसें बनलें आहे ह्याची कल्पना वरील संवादावरून होण्यासारखी आहे.

शिक्षक म्हणजे

कोणत्या हि प्रकारची जीवनोपयोगी कर्तबगारी अंगीं नसलेला,

नवीन कर्तबगारी संपादन करण्यास स्वभावानें असमर्थ बनलेला,

कर्तबगारीला कायमचा कंटाळलेला,

'फक्त–शिक्षणा'ची घमेंड बाळगणारा,

पुस्तकांत पुरलेला,

आळशी जीव,

असा अर्थ झाला.

'फक्त शिक्षण' म्हणजे जीवनापासून तोडून वेगळें काढलेलें मुरदाड शिक्षण. आणि शिक्षक म्हणजे 'मृत–जीवी' माणूस.

'मृत–जीवी' ह्याला च कोणी 'बुद्धि–जीवी' म्हणतात. पण हा वाणीचा व्यभिचार झाला. बुद्धि–जीवी कोण? एखादा गौतमबुद्ध, एखादा सॉक्रेटीस, शंकराचार्य, किंवा ज्ञानेश्वर बुद्धिजीवनाची ज्योत पेटवून दाखवितो. बुद्धि-ग्राह्य जीवन म्हणजे अतींद्रिय जीवन असा अर्थ

गीतेंत सांगितला आहे. जो इंद्रियांचा गुलाम, जो देहासक्तीनें मारलेला, तो 'बुद्धि–जीवी' नव्हे. बुद्धीचा पति आत्मा. त्याला सोडून जी बुद्धि देहाच्या दारची बटीक बनली ती व्यभिचारिणी बुद्धि होय. असल्या व्यभिचारिणी बुद्धीचें जीवन म्हणजे च मरण. आणि तें जगणारा तो मृत–जीवी म्हणावयाचा. 'फक्त शिक्षणा'वर जगणारे जीव हे विशेष अर्थानें मृत–जीवी होत. ह्या फक्त शिक्षणावर जगणाऱ्यांना मनूनें 'भृतकाध्यापक' उर्फ 'पगार–बंद शिक्षक' असें नांव दिलें असून त्यांचा श्राद्धाच्या कामीं निषेध केला आहे बरोबर च आहे. श्राद्धांत मृत पूर्वजांची स्मृति जिवंत करावयाची असते. ज्यांनीं प्रत्यक्ष जीवन मृत करून दाखविलें त्यांचा ह्या कामीं काय उपयोग ?

शिक्षकाला पूर्वीं 'आचार्य' म्हणत. आचार्य म्हणजे आचारवान. स्वतः आदर्शजीवन आचरून राष्ट्राकडून तें आचरवून घेणारा तो आचार्य. अश्या आचार्यांच्या कर्तृत्वानें च राष्ट्रें निर्माण झालेलीं आहेत. आज हिंदुस्थानची नवीन घडी बसवावयाची आहे. राष्ट्र–निर्माणाचें काम आज आपल्यापुढें आहे. आचारवान शिक्षकां शिवाय तें होणार नाहीं.

म्हणून राष्ट्रीय शिक्षणाचा प्रश्न हा आज पहिल्या महत्त्वाचा प्रश्न आहे. त्याची व्याख्या आणि व्याप्ति आपण नीट लक्षांत घेतली पाहिजे. राष्ट्रांतला सुशिक्षित वर्ग निरग्नि आणि निष्क्रिय बनत चाललेला आहे. ह्याला उपाय राष्ट्रीय शिक्षणाचा अग्नि चेतविणें हा च आहे.

पण तो अग्नि पाहिजे. अग्नीच्या दोन शक्ति मानलेल्या आहेत. एक 'स्वाहा' आणि दुसरी 'स्वधा'. ह्या दोन शक्ति जेथें आहेत तेथें अग्नि आहे. 'स्वाहा' म्हणजे आत्माहुति देण्याची, आत्म–त्यागाची, शक्ति. आणि 'स्व-धा' म्हणजे आत्म–धारणाची शक्ति. ह्या दोन्ही शक्ति राष्ट्रीय शिक्षणांत जाग्रत असल्या पाहिजेत. ह्या

शक्ति जाग्रत असतील तर च तें राष्ट्रीय शिक्षण म्हणावयाचें. बाकीचें सारें थंडगार 'फक्त शिक्षण.'

आतांपर्यंत आपल्या राष्ट्रीय शिक्षकांनीं बरा च आत्मत्याग केला असें वरून वरून दिसतें. पण तें तितकेंसें खरें नाहीं. किरकोळ स्वार्थ-त्याग किंवा गर्भित त्याग म्हणजे आत्मत्याग नव्हे. त्याची कसोटी हि आहे. जेथें आत्म-त्यागाची शक्ति असेल तेथें आत्म-धारणाची शक्ति हि असते. आत्म-धारणाची शक्ति च नसेल तर त्याग कोणीं कसला करावयाचा? जो आत्मा आपणाला उभा च राखूं शकत नाहीं तो उडी कसली मारतो? म्हणून आत्मत्यागाच्या शक्तींत आत्म-धारण पूर्व-गृहीत आहे. ही आत्मधारणाची शक्ति-'स्वधा'-राष्ट्रीय शिक्षकांनीं अजून सिद्ध केलेली नाहीं. म्हणून जो आत्मत्याग केला म्हणून भासला तो पुष्कळसा 'भासला' च.

आधीं स्व-धा असेल तर मग स्वाहा. राष्ट्रीय शिक्षणानें, म्हणजे राष्ट्रीय शिक्षकांनीं, आतां स्व-धा संपादण्याची तयारी केली पाहिजे.

शिक्षकांनीं 'फक्त शिक्षणाच्या' भ्रामक कल्पना सोडून देऊन स्वतंत्र जीवनाची जबाबदारी, जशी शेतकऱ्यावर असते तशी, अंगावर घेतली पाहिजे. आपण विद्यार्थ्यांना हि त्यांत च जबाबदारीचा भाग देऊन त्यांच्या आसपास शिक्षणाची रचना केली पाहिजे अथवा निसर्गतः होऊं दिली पाहिजे. 'गुरोः कर्मातिशेषेण'-गुरूचें कर्म समाप्त करून-वेदाभ्यास करावा ह्या वाक्याचा अर्थ असा च घ्यावयाचा आहे. नाहींतर गुरूची व्यक्तिगत सेवा एवढा च जर 'गुरोः कर्म' ह्याचा अर्थ घेतला तर गुरूची सेवा ती अशी किती असणार? आणि त्यासाठीं किती मुलांना कितीसें काम करावें लागणार! म्हणून 'गुरोः कर्म' करणें म्हणजे गुरूच्या जीवनांत जबाबदारीनें भाग घेणें हा च अर्थ होतो. असा जबाबदार भाग घेऊन त्यांत च ज्या शंका वगैरे

उत्पन्न होतील त्या गुरूंना विचाराव्या आणि गुरूंनीं हि आपली जीवनाची जबाबदारी सांभाळून आणि त्याचें च एक अंग म्हणून त्यांची यथाशक्ति उत्तरें देत जावीं. हें शिक्षणाचें स्वरूप. ह्यांत च थोडा स्वतंत्र वेळ, प्रार्थनेच्या स्वरूपाचा, वेदाभ्यासासाठीं राखावा. प्रत्येक कर्म ईश्वराच्या उपासनेचें च करावें. पण तसें करून हि सकाळ संध्याकाळ थोडा वेळ 'उपासनेसाठीं' द्यावा लागतो. तो च न्याय वेदाभ्यासाला किंवा शिक्षणाला लागू करावयाचा. म्हणजे जीवनांतील जबाबदारीचीं कर्में च दिवसाच्या मुख्य भागांत करावयाचीं. आणि तीं सारीं शिक्षणाचीं च कर्में समजावयाचीं. पण स्वतंत्र एखाददोन समय 'शिक्षणासाठीं' म्हणून द्यावयाचें.

राष्ट्रीय जीवन कसें असावें ह्याचा आदर्श आपल्या जीवनांत उतरविणें हें राष्ट्रीय शिक्षकाचें कर्तव्य आहे. हें कर्तव्य तो करीत असतां त्याच्या जीवनांतून नैसर्गिकपणें त्याच्या आसपास शिक्षणाचे किरण पसरतील. आणि त्या किरणांच्या प्रकाशानें आसपासच्या वातावरणाचें आपोआप कार्य होऊन जाईल.अशा प्रकारचा शिक्षक हा स्वतःसिद्ध शिक्षणकेंद्र आहे आणि त्याच्या सन्निध राहणें म्हणजे च शिक्षण मिळणें आहे.

मनुष्यानें पवित्र जीवन जगण्याची काळजी घ्यावी. शिक्षणाची काळजी करण्यास तें जीवन च समर्थ आहे. त्यासाठीं 'फक्त शिक्षणा'चा हव्यास धरण्याची जरूर नाहीं.

---

# भिक्षा

मनुष्याच्या जीवनाचे तीन प्रकार होतात : भिक्षा, धंदा आणि चोरी.

√ भिक्षा म्हणजे समाजाची ज्यास्तींत ज्यास्त सेवा करून समाजापासून केवळ शरीर–धारणापुरतें कमींत कमी घेणें. तें हि नाइलाजास्तव आणि उपकृत–भावनेनें.

√ धंदा म्हणजे समाजाची विशिष्ट सेवा करून त्याचा योग्य मोबदला मागून घेणें.

√ चोरी म्हणजे समाजाची कमींत कमी सेवा करून किंवा सेवा केल्याचें नाटक करून अथवा मुळीं च सेवा न करतां आणि कधीं कधीं तर प्रत्यक्ष नुकसान करून हि समाजापासून ज्यास्तींत ज्यास्त भोग मिळविणें.

प्रत्यक्ष चोर, लुटारू, खुनी; त्याचप्रमाणें त्यांचा 'बंदोबस्त' करणारे पोलिस, सोल्जर, न्यायाधीश वगैरे सरकारी साथीदार; बंदोबस्ताच्या बाहेरचे वकील, वैद्य, शिक्षक, धर्मोपदेशक इत्यादि उच्चोद्योगी; आणि अव्यापारेषु–व्यापारी हे सारे ह्या तिसऱ्या वर्गांत येतात.

मातृ–भूमीची मशागत करणारे शेतकरी आणि जीवनाच्या प्राथमिक गरजा पुऱ्या पाडणारे कामगार हे दुसऱ्या वर्गांत येऊं इच्छिणारे आहेत. 'येणारे' नव्हेत. कारण त्यांची 'योग्य' मोबदला घेण्याची इच्छा असली तरी तिसऱ्या वर्गाच्या कर्तृत्वामुळें आज त्यांच्यापैकीं पुष्कळांना योग्य मोबदला मिळत नाहीं आणि ते जबरदस्तीनें पहिल्या वर्गांत ढकलले जात आहेत. पण जे जबरदस्तीनें पहिल्या वर्गांत ढकलले जातात ते अचूक तिसऱ्या वर्गांत येऊन बसतात.

पहिल्या वर्गांत दाखल होऊं शकतील असे फार च थोडे खऱ्या कळवळ्याचे साधुपुरुष आहेत. फार च थोडे, पण आहेत. आणि त्यांच्या च जोरावर दुनिया टिकून आहे. ते थोडे आहेत. पण त्यांचें बल अद्‌भुत आहे.

'भिक्षा-वृत्ति लोपत चालली आहे, तिचा पुनरुद्धार झाला पाहिजे' असें समर्थ म्हणतात तेव्हां त्यांचा उद्देश ह्या पहिला वर्गाचा प्रसार करण्याचा आहे.

ह्याला च गीता 'यज्ञ-शिष्ट' अमृत खाणें म्हणते. आणि हें अमृत खाणारा पुरुष मुक्त होतो असें गीतेचें आश्वासन आहे.

आज हिंदुस्थानांत बावन लाख 'भिक्षा मागणारे आहेत, तसे समर्थांच्या काळीं हि पुष्कळ 'भिक्षुक' होते. इतके असून भिक्षा-वृत्तीचा जीर्णोद्धार करण्याची जरूर समर्थांना कां भासली ?

ह्याचें उत्तर भिक्षेच्या कल्पनेंत आहे. बावन लाखांच्या भिक्षेचा जो अर्थ आहे तो चोरीचा च एक प्रकार आहे.

भिक्षा म्हणजे ज्यास्तींत ज्यास्त परिश्रम आणि कमींत कमी मोबदला. हा हि मोबदला मुळीं च घेतला नसता. पण शरिराचें चालत नाहीं म्हणून तेवढ्यापुरता घ्यावयाचा. पण तो हक्कानें नाहीं. समाजाचा आपल्यावर हा उपकार आहे अश्या भावनेनें. भिक्षेंत परावलंबन नाहीं, ईश्वरावलंबन आहे. समाजाच्या सद्भावनेवर श्रद्धा आहे. यदृच्छा-लाभ-संतोष आहे. कर्तव्यपरायणता आहे. फलनिरपेक्ष वृत्तीचा प्रयत्न आहे.

लोकसेवकाचें शरीर-रक्षण हें सामाजिक कार्य समजलें पाहिजे. विशिष्ट सामाजिक कार्यासाठीं जर एखाद्याला नियत रकम दिली तर त्या रकमेचा विनियोग योग्य पद्धतीनें, हिशोब राखून, त्या च कार्यासाठीं तो करतो. मी लोक-सेवक असेन तर माझे शरीर-धारण-कार्य हें हि

सामाजिक कार्य समजून त्यासाठीं मला नियत रकम, जरुरीपुरती, समाज देतो. त्या रकमेचा विनियोग मीं त्या च कार्यांत केला पाहिजे, योग्य पद्धतीनें केला पाहिजे, त्याचे हिशेब राखले पाहिजेत आणि सदर हिशेब समाजाच्या परीक्षणासाठीं उघडे असले पाहिजेत. म्हणजे सर्व प्रकारें एक पंच ज्याप्रमाणें वहीवाट करील त्याप्रमाणें 'निर्मम' भावनेनें मला माझ्या शरिराची वहीवाट केली पाहिजे. ही भिक्षा-वृत्ति.

कांहीं सेवक असें म्हणतांना आढळतात : " आमच्या पैश्याचा आम्ही वाटेल तसा उपयोग करूं. सामाजिक पैश्याचा हिशेब चोख राखूं, लोकांना दाखवूं, त्यांची टीका मागवूं, तिला असल्यास उत्तरें देऊं, नसल्यास क्षमा मागूं. पण आमच्या पैश्याचा हिशोब राखण्यास आम्ही बांधलेले नाहीं आणि दाखविण्यास तर नाहीं च नाहीं." जर प्रामाणिकपणें समाज-सेवा करणारा एखादा मनुष्य असें म्हणत असेल तर त्याची सेवा हा 'धंदा' झाला. प्रामाणिक धंदा, पण 'धंदा.' भिक्षा-वृत्ति नव्हे.

भिक्षा म्हणते, 'तुझा' पैसा कुठला? जसा खादीच्या कार्यांसाठीं, तूं खादीचा ज्ञाता म्हणून, तुला पैसा सोंपवावा तसा तुझ्या शरिराच्या कार्यांसाठीं, तूं तत्संबंधीं ज्ञाता म्हणून तुला पैसा सोंपविला. खादीसाठीं दिलेला पैसा जर 'तुझा' नव्हे तर तुझ्या शरिरासाठीं दिलेला पैसा 'तुझा' कसा? दोन्ही कार्यें सामाजिक च आहेत.

"तुमची किती गरज आहे?" एका खादी-प्रचारकाला विचारलें. " मासिक ३० रुपये."

" तुम्ही तर एकटे अहां. मग इतकी गरज कशी ?"

" दोनतीन गरीब विद्यार्थ्यांना मी मदत करीत असतों."

" गरीब विद्यार्थ्यांना अश्या रीतीनें मदत करणें अनुचित नाहीं असें आपण गृहीत धरूं, पण समजा खादीच्या कार्यांसाठीं तुम्हांला पैसे

दिले असले तर त्यांतून राष्ट्रीय शिक्षणाच्या कार्यासाठीं खर्च कराल का ?"

"तसें करतां येणार नाहीं."

"मग तुमचें शरीर-पोषण हें जें एक सामाजिक कार्य त्यासाठीं तुम्हांला द्यावयाच्या रकमेंतून गरीब विद्यार्थ्यांना मदत करणें हें जें दुसरें सामाजिक कार्य त्यासाठीं खर्च कसा करतां येईल ?"

हा हि भिक्षा-वृत्तीचा महत्त्वाचा मुद्दा आहे. भिक्षा-वृत्तीच्या मनुष्याला दानाचा अधिकार नाहीं. दान झालें तरी 'मी' करणार आणि भोग हि 'मी' च करणार. भिक्षेंत 'मी' ला च स्थान नाहीं. म्हणून दोहींना नाहीं.

"नको गुंफों भोगीं नको पडों त्यागीं।" हें भिक्षावृत्तीचें सूत्र. भिक्षा-वृत्ति म्हणजे 'घर मोठें करणें', मोठी जबाबदारी अंगावर घेणें. भिक्षा बेजबाबदार नाहीं.

भिक्षा मागणें म्हणजे 'मागण्याचें सोडून देणें.' 'मागा म्हणजे मिळेल' असें बायबलमध्यें वाक्य आहे. त्याचा अर्थ देवापाशीं मागा म्हणजे मिळेल असा आहे. पण समाजापाशीं ? 'मागूं नका म्हणजे मिळेल.'

'भिक्षा मागणें' हे शब्द विसंवादी आहेत. कारण भिक्षा म्हणजे च न मागणें.

'भिक्षा मागणें' हे शब्द पुनरुक्त आहेत. कारण भिक्षा हें च स्वतःसिद्ध मागणें आहे. भिक्षा मागावी लागत नाहीं. कर्तव्याच्या झोळींत हक्क पडलेले च आहेत.

---

# ‘पूर्णात् पूर्णम्’

श्रुतीचें वचन आहे, “पूर्णात् पूर्णमुदच्यते।” ‘पूर्णांतून पूर्ण’ हा नैसर्गिक विकासाचा नियम आहे. ह्याचा अर्थ काय? जर आधींचा च पूर्ण आणि मागून हि पूर्ण तर ‘विकास’ कसला? अपूर्णांतून पूर्ण म्हटलें म्हणजे ‘विकास’ समजतो. पण ‘पूर्णांतून पूर्ण’ ही भाषा च अर्थशून्य भासते.

अर्थशून्य भासते खरी, पण त्यांत खोल अर्थ आहे. ‘पूर्णांतून पूर्ण’ म्हणजे लहान पूर्णांतून मोठें पूर्ण. नुकतें च जन्माला आलेलें मूल हि पूर्ण आहे. वीस वर्षांचा तरुण हि पूर्ण आहे. पहिलें लहान पूर्णाचें उदाहरण आहे. दुसरें मोठया पूर्णाचें आहे. बालकाला एक डोळा होता किंवा अर्धें नाक होतें आणि तरुणाला दोन डोळे झाले किंवा पुरतें नाक आलें असें नाहीं. दोघांना हि दोन डोळे आणि दोन डोळयांमध्यें एक च नाक. दोघे हि पूर्ण. एक लहान आणि दुसरा मोठा एवढा च फरक.

दोन इंचांची सुरेखा ही हि पूर्ण सुरेखा आणि चार इंचांची सुरेखा ही हि पूर्ण सुरेखा. पहिली लहान आणि दुसरी मोठी. दोन इंच व्यासाचें वर्तुळ हें हि पूर्ण वर्तुळ आणि चार इंच व्यासाचें वर्तुळ हें हि पूर्ण वर्तुळ. पहिलें लहान आणि दुसरें मोठें.

फळयावर काढलेलें आंवळयाएवढें वर्तुळ विकासक काचांतून पाहिलें तर भोपळयाएवढें दिसलें. म्हणजे विकासक काचानें काय केलें? कसला ‘विकास’ केला? अपूर्ण वर्तुळाचें पूर्ण वर्तुळ बनविलें? कीं लहान पूर्ण वर्तुळाचें मोठें पूर्ण वर्तुळ बनविलें? विकासक काचानें एवढें च केलें कीं जें आंवळयाएवढें पूज्य होतें त्याचें भोपळयाएवढें पूज्य केलें!

आणि खरोखर च शिक्षणशास्त्र ह्यापेक्षां कांहीं च करूं शकत नाहीं. शिक्षणशास्त्राची व्याख्या च करावयाची तर 'आंवळयाएवढया पूज्यांतून भोपळयाएवढें पूज्य' अशी खुशाल करावी. शिक्षणानें आंवळयाचा भोपळा बनेल किंवा समर्थांच्या भाषेंत मूर्खांचा पढत मूर्ख बनेल किंवा फार तर, अर्धवट शहाण्याचा दीड शहाणा बनेल.

पण हा विनोद सोडून देऊन त्यांतला भाव ग्रहण केला तर निसर्गाच्या विकासाचें 'पूर्णांतून पूर्ण' हें सूत्र कसें, तें ध्यानांत येईल. पंहाटे पांच वाजतां समोरचा वृक्ष मला अंधुक दिसत आहे. सबंध दिसत आहे, पण अंधुक. साडे पांच वाजतां थोडा स्पष्ट दिसूं लागला. पूर्वीसारखा च सबंध दिसत आहे, पण थोडा स्पष्ट. सूर्योदय झाल्यानंतर हि सबंध वृक्ष दिसतो, पण अत्यंत स्पष्ट. पांच वाजतां पाव वृक्ष दिसला, साडे पांच वाजतां अर्धा दिसला आणि सूर्योदयानंतर सबंध दिसला असें होत नाहीं. तिन्ही वेळां संपूर्ण दिसला. पण पहिल्या वेळीं अस्पष्ट संपूर्ण, दुसऱ्या वेळीं स्पष्ट संपूर्ण, तिसऱ्या वेळीं अति-स्पष्ट संपूर्ण. 'अस्पष्ट, स्पष्ट, अतिस्पष्ट' हा विकास सूर्यप्रकाशानें केला. पण तिन्ही वेळां 'संपूर्णा'चा च विकास केला. लहान पूर्णांतून मोठें पूर्ण, अस्पष्ट पूर्णांतून स्पष्ट पूर्ण, हा नैसर्गिक विकास होय.

'अपूर्णांतून पूर्ण' म्हणजे काय, आणि 'पूर्णांतून पूर्ण' म्हणजे काय, हें समजण्यासाठीं आपण एक दृष्टांत घेऊं. समजा, समुद्राच्या तीरावर आपण उभे आहों. आपल्याला समुद्रांत आतां जहाज वगैरे कांहीं च दिसत नाहीं. थोडया वेळानें एक जहाज दिसूं लागलें. म्हणजे जहाजाचें नुसतें वरचें टोंक दिसूं लागलें. आणखी थोडया वेळानें मधला भाग दिसूं लागला. आतां संपूर्ण जहाज दिसूं लागलें. संपूर्ण पण दूर असल्यामुळें अस्पष्ट. ह्यापुढें जसजसें तें जवळ येऊं लागलें तसतसें तें अधिक अधिक स्पष्ट दिसूं लागलें. पहिल्या क्षणीं संपूर्ण

जहाज दिसेपर्यंतच्या दर्शनाला आपण 'अपूर्णांतून पूर्ण' म्हणूं. नंतरच्या दर्शनाला आपण 'पूर्णांतून पूर्ण' म्हणूं.

एक शिक्षक विद्यार्थ्यांना हिंदुस्थानचा भूगोल शिकवीत आहे. त्यानें मुलांना आधीं सबंध हिंदुस्थानचा नकाशा दाखविला. नंतर त्यांतले निरनिराळे प्रांत सांगितले. पुढें सर्व प्रांतांतल्या नद्या दाखविल्या. मग सर्व प्रांतांतलीं ऐतिहासिक, धार्मिक, व्यापारी महत्त्वाचीं स्थानें दाखविलीं आणि अशी च सूक्ष्म सूक्ष्म माहिती देत गेला. हा शिक्षक विद्यार्थ्यांच्या ज्ञानाला 'पूर्णांतून पूर्णांकडे' नेत आहे. दुसरा एक शिक्षक असा च विद्यार्थ्यांना हिंदुस्थानचा भूगोल शिकवीत आहे. पण प्रथम त्यानें एका जिल्ह्याची अगदीं सूक्ष्म माहिती विद्यार्थ्यांना दिली. नंतर दुसऱ्या जिल्ह्याची. असें करतां करतां अखेर एका प्रांताची माहिती झाली. आतां ह्या विद्यार्थ्यांना एका प्रांताची अगदीं सूक्ष्म माहिती झाली. पण इतर प्रांतांची शून्य. पुढें इतर प्रांतांची अशी च सूक्ष्म सूक्ष्म माहिती. अखेर हिंदुस्थानची माहिती. 'हिंदुस्थानचा भूगोल शिकविणें' ह्या मुद्द्यापुरतें बोलावयाचें तर हा शिक्षक विद्यार्थ्यांच्या ज्ञानाला 'अपूर्णांतून पूर्णांकडे' नेऊं पाहत आहे असें म्हणतां येईल.

आत्म्याच्या विकासाचें पूर्णांतून पूर्णांकडे हें सनातन सूत्र आहे. कोणत्या हि आत्मवान वस्तूच्या विकासाला तें च सूत्र लागू होणारें आहे.

क्ले मॉडलिंगच्या ( म्हणजे मातीचे पुतळे वगैरे बनविण्याच्या ) कलेविषयींच्या एका पुस्तकांत पुतळा अपूर्णांतून पूर्णांकडे घेऊन जाण्याच्या रीतीचा निषेध केला आहे. सुरवातीला मातीला वाटेल तसा आकार देऊन शेंवटीं इष्ट आकार आला म्हणजे झालें! अशा कल्पनेनें काम करूं नये. अगदीं सुरवातीपासून अखेरपर्यंत केव्हां हि कोणीं पाहिल्यास त्याला काय चाललें आहे हें ध्यानांत येईल असें

काम करावें. तर च पुतळ्यांत कला संचरते असा अनुभव त्या पुस्तकात नमूद केला आहे. नाहींतर पुष्कळ चित्रकार म्हणतांना आढळतात कीं "आतां काय पाहतां? सगळें झालें म्हणजे पहा." सुरवातीला वेडावांकडा आकार देऊन त्यावर थापत बसावयाचें! असल्या 'थापेबाजीनें' कला साधावयाची नाहीं. कला म्हणजे आत्म्याचा अमर अंश. म्हणून 'पूर्णांतून पूर्ण' ह्या आत्मविकासाच्या सूत्राला धरून च कलेचा अवतार होणें शक्य आहे.

राष्ट्र-निर्माण ही फार च मोठी कला आहे. 'पूर्णात् पूर्णम्' हें सूत्र आंखून रचना केली तर च ती साधणार आहे.

---

# कै. राजवाडे

मराठ्यांच्या इतिहासाचे एकनिष्ठ पुजारी श्री. राजवाडे ह्यांचें ऐहिक जीवन आतां त्या च इतिहासांत कायमचें सामील झालें आहे. अनादि भूत आणि अनंत भविष्य ह्यांच्या कचाटींत सांपडलेला वर्तमान काळ कोठें दडून राहिलेला असतो तें लक्षांत हि येत नाहीं. बघतां बघतां तो भूतकाळांत दाखल होतो. म्हणून त्याच्याकडे बघण्याचें सोडून त्याला कर्मयोगांत राबवून घेणें हें च त्याच्यासंबंधींचें मनुष्याचें कर्तव्य आहे. तें जो करतो तो च खरा इतिहासज्ञ होय. काल-पुरुषाची चपळता, मनुष्याच्या शारीरिक जीवनाची क्षणिकता आणि आत्म्याची अमरता पटवून देणें हें च इतिहासज्ञानाचें कार्य आहे. इतिहासज्ञानाचें हें कार्य ज्याच्या जीवनांत मुरलेलें दिसेल त्याला इतिहासज्ञान झालें आहे

असें समजलें पाहिजे. मग त्यानें इतिहासाचीं बुकें पाहिलेलीं असोत किंवा नसोत. वास्तविक इतिहास त्यानें च पाहिला, ज्यानें वर्तमान वापरला. राजवाडे ह्यांनीं आपल्या आयुष्याचा प्रायः प्रत्येक क्षण वापरण्याचा प्रयत्न केला. आणि म्हणून च त्यांना इतिहास-ज्ञ म्हणावयाचें. त्यांना मिळालेल्या क्षणांचा त्यांनीं जनतेपुढें चोख हिशेब मांडला आहे. 'तीस वर्षांत तीस मौलिक ग्रंथ' हा थोडक्यांत हिशेब चुकता झाला. राजवाड्यांचे प्रचंड परिश्रमानें तयार झालेले ग्रंथ वाचून समजण्याची आपली योग्यता नसेल किंवा कदाचित आपल्याला तितका अवकाश नसेल. पण "रिकामा जाऊं नेदी एक क्षण" एवढा बोध जर आपण त्यांच्या चरित्रावरून घेतला तर त्यांचे सर्व ग्रंथ वाचल्याचें श्रेय आपण मिळविलें.

राजवाड्यांची एवढी अद्भुत बुद्धिमत्ता पण मराठी वाङ्मयाचा अभ्यास त्यांना सबंध आयुष्यभर पुरून उरला. 'मराठी आमची मातृभाषा आहे, तिचा अभ्यास कशाला पाहिजे?' असें ज्यांना वाटतें त्यांनीं राजवाड्यांचें लिखाण थोडें पहावें. म्हणजे त्यांचे डोळे उघडतील. तसें च 'मराठींत एवढें अभ्यास करण्यासारखें काय आहे?' ह्याचा हि उलगडा होण्यास राजवाड्यांचें लिखाण उपयोगी पडणारें आहे. राजवाड्यांचें उदाहरण घेऊन आम्हीं मातृभाषेविषयींची आमची उदासीनता अथवा तुच्छ-बुद्धि सोडून दिली पाहिजे.

राजवाड्यांनीं आपलें सर्व लिखाण मराठींत च लिहिल्यामुळें त्यांच्या कीर्तीचा पाया कमी मजबूत रचला गेला असें पुष्कळांना वाटतें. पण हा महाभ्रम आहे. राजवाड्यांनीं कीर्तीची पर्वा न करतां आमच्या अज्ञाण देशबंधूंची कदर धरून मराठींत लिखाण लिहिलें ह्यांत त्यांनीं आपल्या कीर्तीचा फार च मजबूत पाया रचला आहे. त्याऐवजीं त्यांनीं इंग्रजींत ग्रंथ-रचना केली असती

तर मात्र त्यांनीं आपल्या कीर्तीचा पाया मजबूत न घालतां "तांतडीची भिंत पायाविण" रचली असें म्हणावें लागलें असतें. त्यांनीं मराठींत लिखाण लिहिलें म्हणून च त्यांच्याकडून तरुणांना इतिहास-संशोधनाची च नव्हे पण इतर सेवेची हि स्फूर्ति झाली आणि दीक्षा मिळाली हें विसरून चालणार नाहीं. जर त्यांनीं इंग्रजींत लिखाण लिहिलें असतें तर अशी स्फूर्ति तरुण लोकांना मिळण्याचा संभव फार च कमी झाला असता. कदाचित पोकळ कीर्ति दुनियेंत वाजत राहिली असती. पण भरीव काम झालें नसतें. राजवाड्यांनीं कीर्तीच्या मोहाचा त्याग केला हा त्यांचा मोठा त्याग होय. प्रस्तुत लेखकानें वयाच्या सोळाव्या वर्षीं त्या वेळपर्यंत प्रसिद्ध झालेलें राजवाड्यांचें बहुतेक लिखाण अतिशय आवडीनें वाचलें होतें. त्या वेळीं जरी तें नीटसें समजत नव्हतें, तरी स्फूर्ति उत्पन्न होण्याइतकें समजत होतें. तें च इंग्रजींत लिखाण असतें तर त्याचा काय उपयोग झाला असता ?

राजवाडे आपल्या पूर्व-संस्कृतीचे अभिमानी होते. पण त्याहून ते सत्याचे अधिक अभिमानी होते. त्यामुळें आपल्या संस्कृतींत त्यांना जे जे दोष आहेत असें वाटलें ते ते त्यांनीं स्पष्टपणें मांडले आहेत. आमचें सगळें च चांगलें होतें म्हटलें म्हणजे आजची गुलामगिरी कशी आली ह्याची कांहीं च उपपत्ति लागत नाहीं. म्हणून आमचें कुठें तरी चुकलें होतें हें ओळखणें जरूर आहे.

'आजची आमची ही गुलामगिरी कां?' ह्या प्रश्नाचें उत्तर शोधून काढण्यांत राजवाड्यांच्या सूक्ष्म बुद्धीला हि थकवा आला आणि निराश होऊन त्यांनीं अखेर सर्व जबाबदारी संतांवर टाकून दिली. 'संतांनीं राष्ट्र दुबळें केलें' असें त्यांच्या थकलेल्या बुद्धीला भासलें आणि भासल्याबरोबर त्यांनीं अगदीं सडेतोडपणें तें जाहीर केलें. त्यानंतर त्याचा अनुवाद पुष्कळांनीं केला. पण अगदीं प्रथम कोणाची हि भीडभाड न धरतां राजवाड्यांनीं च तें मांडलें. त्याचा निषेध हि

अनेक शास्त्रें पिऊन पचविलेल्या दुसऱ्या एका इतिहासज्ञानें च केला. राजवाड्यांचा हल्ला व रानड्यांचा बचाव दोन्ही हि पाहण्यासारखे आहेत. दोघांत हि कळकळ ओतप्रोत भरलेली आहे. म्हणून रानड्यांचा बचाव हा संतांना जितका प्रिय होईल तितका च राजवाड्यांचा हल्ला हि प्रिय होणारा आहे. अर्जुनानें वाहिलेली बाणांची लाखोली किरात-वेषधारी शंकराला भक्तांनीं वाहिलेल्या फुलांच्या लाखोलीप्रमाणें च गोड नाहीं वाटली?

आणि संतांना काय? "तुका म्हणे माझें। अवघें संतांवरी ओझें" ह्या त्यांच्या च उक्तीप्रमाणे त्यांच्यावर कोणीं किती हि ओझें टाकलें म्हणून भार थोडा च वाटणार आहे? संत सर्व सृष्टीला आत्मरूप पाहतात. म्हणून जगांतल्या कोणत्या हि व्यक्तीचें पाप हें आपलें च पाप आहे असें त्यांना वाटतें. अश्या स्थितींत राष्ट्र कोणीं का बुडविलें असे ना, 'तुम्हीं च बुडविलें' म्हणून जर कोणी संतांना म्हणाला, तर तें त्याचें म्हणणें ते सहज च स्वीकारतील. त्यांतून राज-वाड्यांसारख्या तळमळीच्या राष्ट्रप्रेमी पुरुषानें सर्व बाजूंनीं निराश झाल्यानंतर काढलेल्या उद्गारांतला भाव संत कसा समजणार नाहींत?

रानडे काय आणि राजवाडे काय, दोघे हि देशाची सेवा करणारे होते. दोघे हि आपआपल्या परी संत च होते. तथापि संतांच्या कार्याविषयीं त्यांच्यांत मतभेद झालेला दिसतो. पण तो हि वरवरचा मतभेद आहे. खोल नाहीं. मंबाजीबावा हि तुकाराममहाराजांना शिव्या देत आणि महाराजांची पत्नी आवली हि शिव्या देई. 'मेल्यानें माझा संसार बुडविला' म्हणे. पण आवलीच्या शिव्यांत आणि मंबाजीबावाच्या शिव्यांत अंतर होतें. आवलीच्या शिव्या वरवरच्या होत्या. तिचें हृदय तुकाराममहाराजांविषयीं प्रेमानें भरलेलें होतें. त्यांना भाकर पोंचविल्या-शिवाय तिच्यानें खाणें होत नसे. राजवाड्यांचें हि तसें च होतें. त्यांना संतांविषयीं आंतून प्रेम होतें. संतांच्या ग्रंथांचा त्यांनीं अभ्यास

केला होता. संतांच्या आंगचे कांहीं सद्‌गुण त्यांच्या ठिकाणीं वसत होते. पण आजची आमच्या राष्ट्राची दीनवाणी दशा, आळस आणि पुरुषार्थहीनता पाहून त्यांचें हृदय तळमळे. त्यांतून संतांच्या वचनांचा हि ह्या दुर्गुणांना आधार घेतला जातो असें दिसून आल्यामुळें 'इंद्राय तक्षकाय स्वाहा' ह्या न्यायानें त्यांनीं संतांवर च हल्ला चढविला.

राष्ट्रांतले आळशी लोक संतांच्या वचनांचा दुरुपयोग करून घेतात हा कांहीं त्या वचनांचा दोष नव्हे. त्याला उपाय उद्योगी माणसांनीं संतांच्या वचनांचा सदुपयोग करून दाखविणें हा च आहे. पण मनुष्य तापला म्हणजे त्याला भान राहत नाहीं. मग तो 'इंद्राय तक्षकाय स्वाहा' ची भाषा बोलतो. अश्यानें तो इंद्राला तर मारूं शकत च नाहीं (कारण, एक तर तसें करण्याचा इरादा हि नसतो. पण इरादा असला तरी तो मरणें शक्य नसतें.) पण तक्षकाचें आयुष्य मात्र निष्कारण वाढून बसतें. 'बुद्ध, शंकराचार्य आणि तुकाराम ह्यांनीं राष्ट्र बुडविलें' ही भाषा किती हि कळकळीनें निघालेली असली तरी ती आपल्या हेतूला अचूक मारणारी ठरते. पण माणूस त्रासला म्हणजे असें कांहीं तरी बोलून जातो. त्याचा अक्षरशः अर्थ घेऊं च नये. भाव पहावा म्हणजे झालें.

पण वैतागून निघालेली भाषा सोडून दिली तर प्रायः बहुतेक सर्व प्रसंगीं राजवाडे ह्यांच्या सूक्ष्म प्रज्ञेला परिस्थितीचें अचूक निदान करण्याची शक्ति होती असें दिसून येतें. अशी शक्ति दीर्घ चिंतना-शिवाय प्राप्त होत नसते. पण राजवाड्यांचें जीवन चिंतनमय असल्यामुळें एखाद्या बाबतींत प्रत्यक्ष त्यांनीं भाग घेतला नसला तरी त्याविषयींचे त्यांचे विचार स्पष्ट आणि निर्णायक स्वरूपाचे बनत असत. ह्याला उदाहरण असहकारितेच्या चळवळीविषयीं त्यांनीं 'चित्रमयजगतां'त लिहिलेला लेख. सदर लेखांत असहकारितेच्या

चळवळींतील नैतिक शक्तीचा त्यांनीं मुक्त-कंठानें जयजयकार केला होता.

राजवाडे ह्यांचें मराठीभाषेवर अत्यंत प्रेम होतें. आणि त्या भाषेची योग्यता वाढावी म्हणून त्यांनीं अतिशय कसोशीनें जन्मभर प्रयत्न केला. तथापि त्यांचें इंग्रजीभाषेशीं वांकडें नव्हतें. इंग्रजी-भाषेचें वैभव ते ओळखून होते. इंग्रजी भाषेंतले सर्वोत्तम विचार आपल्या भाषेंत यावे असें त्यांना वाटे. त्यासाठीं त्यांनीं 'भाषांतर' नांवाचें एक मासिक कांहीं दिवस चालविलें होतें. त्यांतून प्लेटोच्या 'रिपब्लिक' वगैरे ग्रंथांचें भाषांतर देत असत. राजवाडे ह्यांची स्वतःची योग्यता पाश्चात्त्यांतील पहिल्या दर्ज्याच्या विचारकांच्या तोडीची होती. अश्या गृहस्थानें 'भाषांतराचें' काम हातीं घ्यावें ह्यावरून 'कसें हि करून मातृभाषेचें वैभव वाढावें' ह्याविषयीं त्यांना किती उत्कंठा होती ह्याची कल्पना येईल.

आणि 'मातृभाषेचें वैभव कां वाढवावें?' ती 'आमची' भाषा म्हणून? एवढा च अर्थ घेतला तर ज्ञानेश्वरमहाराजांसारख्या 'हें विश्व चि माझें घर' अश्या उदार वृत्तीच्या महापुरुषानें 'माझा मऱ्हाटा बोल' म्हणून कसे उद्गार काढले असते? ज्ञानेश्वरांनीं कां म्हणून मराठीभाषेसाठीं अट्टाहास केला? ते काय संकुचित अभि-मानाला वश होते? अशी कल्पना च करतां येत नाहीं. मग त्यांनीं मराठीभाषेचा कां कैवार घेतला? त्यांनीं कैवार घेतला, कारण ती अज्ञान लोकांची भाषा, स्त्रीशूद्रांची भाषा, तिचें वैभव न वाढविलें तर दीनजनांचा उद्धार तरी कसा व्हावा? आणि राजवाड्यांचा तरी जन्मभर मराठीभाषेसाठीं प्रयत्न करण्यांत दुसरा काय हेतु?

नेणत्यांचा, गरिबांचा, उद्धार व्हावा ही तळमळ. म्हणून राजवाडे नेहमीं साध्या राहणीनें राहत. सुशिक्षित लोक चार अक्षरें शिकले, कीं

'टाकम टिका' करूं लागतात ह्याबद्दल त्यांना वाईट वाटे. "प्रयोग-शाळेमध्यें लंगोटी लावून काम केलें तर काय ऑक्सिजन काम करीत नाहीं ?" असें त्यांचें एक वचन आहे. सुशिक्षितांनीं मंदरपर्वताप्रमाणें ज्ञानसमुद्राचा ठाव पहावा आणि तें ज्ञान शेतकऱ्याच्या भाषेंत आणावें, शेतकऱ्याप्रमाणें लंगोटी लावून सुशिक्षितांनीं आपलें ज्ञान-क्षेत्र नांगरावें, त्यांत मेहनतमशागत करून भरपूर पीक काढावें आणि ज्या अशिक्षितांच्या जिवावर आमचें जीवन चाललें आहे त्यांना त्या ज्ञानाचा भाग देऊन ऋणमुक्त व्हावें, अशी त्यांची शिकवण होती.

मागें एकदां 'महाराष्ट्रांतील कर्त्या पुरुषांची मोजदाद' त्यांनीं महाराष्ट्रापुढें मांडून, आम्हाला कोणकोणत्या क्षेत्रांत किती काम करावयाचें आहे, आणि एकंदरींत आम्ही किती मागसलेले आहोंत इकडे ध्यान खेंचलें होतें. त्यांत त्यांनीं ज्या कर्त्या पुरुषांचीं नांवें घेतलीं होतीं, त्यांपैकीं पुष्कळ राजवाड्यांच्या पासंगाला हि पुरणारे नव्हते. तरी पण " अर्भकाचे साठीं। पंतें हातीं धरिली पाटी" ह्याप्रमाणें त्यांनीं त्यांतल्या त्यांत जीं कार्यकर्तीं माणसें होतीं त्या सर्वांचीं नांवें यादींत घातलीं होतीं. ह्यावरून राष्ट्रातल्या अगदीं लहानांतल्या लहान प्रयत्नाकडे हि त्यांचे कसे डोळे लागून राहिले होते हें दिसून येतें.

राजवाड्याचे गुण थोर होते. त्यांचें कार्य हि तसें च होतें. त्यांचें अनुकरण करण्याचा प्रयत्न आपण यथाशक्ति करूं या.

---

# खेडेगांवचें काम

असहकारितेच्या चळवळीपासून खेडेगांवांकडे लक्ष वेधलें गेलें आहे. खेडेगांवांचें महत्त्व समजूं लागलें आहे. कित्येक सेवक खेडयांतून काम हि करूं लागले आहेत. आणि थोडयांना कामांत यश हि आलें आहे. पण पुष्कळांना यश आलें नाहीं.

ह्यापूर्वी सुशिक्षितांची नजर खेडयांकडे वळली च नव्हती. आधीं तर नजर परक्यांकडे होती. इंग्लंडमधील जनता अनुकूल करून घेतली पाहिजे, सरकारला परिस्थिति समजावली पाहिजे वगैरे. पुढें नजर स्वकीयांकडे वळली. पण शहरांकडे, सुशिक्षितांकडे. सुशिक्षितांत राष्ट्रीय आकांक्षा उत्पन्न केल्या पाहिजेत ह्या धोरणानें सारी चळवळ चालली होती. असहकारितेंत खेडयांकडे लक्ष लागलें. पुढें विधायक कार्यक्रमाच्या चळवळींत खेडयांत प्रवेश करण्याची, खेडयांतील जनतेची सेवा करण्याची, प्रत्यक्ष प्रेरणा झाली. आणि आज जें अल्प–स्वल्प फळ आलेलें दिसत आहे, तें ह्या प्रेरणेचें च फळ आहे. इतक्या वर्षांच्या दीर्घ अनुभवानें "तुझें आहे तुजपाशीं। परि तूं जागा चुकलासी" इतकें पटलें. तरी पण कामाची नुकती च सुरवात असल्यामुळें पुष्कळ ठिकाणचें खेडयांतलें काम निष्फळ झालें आहे.

ह्यांत नवल नाहीं. सुरवातीला हें असें व्हावयाचें च. त्यानें निराश होण्याचें कारण नाहीं. आणि निराश होण्यासारखी स्थिति हि नाहीं. कारण थोडया ठिकाणीं खेडयांतले प्रयोग यशस्वी हि झाले आहेत. शिवाय जे प्रयोग अयशस्वी झाल्याचे भासतात ते हि भासतात च. दगड फोडतांना मारलेले पहिले कांहीं घाव निरुपयोगी भासतात. पण

त्यांचा परिणाम होत च असतो. ह्या ठिकाणीं फोडावयाचा दगड म्हणजे खेड्यांतली जनता नव्हे पण आमच्या सुशिक्षितांचें पारखें हृदय.

आतां कोठें आमच्या मनांत खेड्यांत जावयाचें उगवलें आहे. पण खेड्यांत जावयाचें तें आम्ही अजून आमच्या शहराच्या थाटांत जाऊं पाहतों. त्यामुळें आमचें काम जमत नाहीं. खेड्यांत खेडवळ होऊन गेलें पाहिजे. हें आमच्या अयशस्वितेचें मुख्य कारण आहे.

खेड्यांत गेलेला सुशिक्षित मनुष्य अजून खेडवळ तर बनूं शकला नाहीं च. पण आज तो 'परोपकाराच्या' हौशींत जातो. तो स्वतःला काहीं खेडेगावच्या लोकांपासून शिकण्यासारखें आहे हें विसरतो.

'काय हे अज्ञानांत लोळत पडले आहेत!' असें त्याला वाटतें. आपलें स्वतःचें घोर अज्ञान त्याला दिसत नाहीं. आणि आपण स्वतः काय केलें पाहिजे हें विसरून तो काम करवून घेण्याच्या नादीं लागतो. त्यामुळें अजीबात अलग फेंकला जातो.

(१) आमच्या [illegible] संवई सोडून देऊन आम्हीं खेड्यांत गेलें पाहिजे.

(२) खेडेगांवच्या लोकांना 'शिक्षण देण्याची' वृत्ति राखून जाऊं नये.

(३) स्वतः कामाला लागावें.

हे तीन महत्त्वाचे मुद्दे आम्हीं ध्यानांत वागविले पाहिजेत.

कित्येक वेळां एखादा मनुष्य एखाद्या गांवांत जाऊन बसतो आणि नुसता तो एकटा हि जें काम—गांवच्या मदतीशिवाय—करूं शकला असता तें सबंध गांवभर चळवळ करून तो करूं शकत नाहीं असें आढळून येतें. आपल्या कामाचा पुरा हिशोब—प्रत्येक

क्षणागणिक—त्यानें राखला पाहिजे. खेडेगांवच्या माणसांना उद्योगी माणसांविषयीं मान असतो. जो सुशिक्षित मनुष्य खेडेगांवांत जाऊन कोणाला कांहीं शिकवावयाचें आहे हा विचार सोडून रात्रंदिवस कामांत मग्न होऊन राहील आणि आपल्या चारित्र्याची चौकी करील तो त्या खेडेगांवांत आपोआप उपयुक्त होईल. आणि "नभामाजीं तारांगणें। तैसे लोक" त्याच्या भोंवतीं जमा होतील. हिंदुस्थानची खेड्यांतली जनता कृतज्ञ आहे आणि गुण पारखण्याची शक्ति तिच्यांत भरपूर आहे.

ग्रामरचनेचें कार्य चारित्र्यबळाशिवाय होणार नाहीं. आणि खेडेगांवच्या जनतेचें चारित्र्याचें माप प्राथमिक' सद्गुणांवर अवलंबून असतें. हें च खरें माप आहे. प्राथमिक सद्गुण म्हणजे नीतीचे मूलभूत सद्गुण. उदाहरणार्थ आळस नसणें, निर्भयता, प्रेम इत्यादि. वरवरचे उपार्जित गुण वक्तृत्व, विद्वत्ता वगैरे खेडेगांवांत फारसे उपयुक्त नसतात. खेडेगांवांत काम करणाऱ्याला भक्तीचा जिव्हाळा पाहिजे, भाव पाहिजे. हा प्राथमिक सद्गुणाचा राजा आहे.

पण आमच्या लोकांच्या पवित्र भावनांमध्यें अजून आम्ही रमलों नाहीं. हें आमच्या निष्फलतेचें फार च मोठें कारण आहे. लोकांच्या खुळ्या समजुती आमच्यांत नसाव्यात. पण त्यांच्या ज्या मोलवान भावना आहेत त्या तर आमच्यांत असल्या पाहिजेत? पण त्या नसतात. भजनाचा आम्हांला कंटाळा वाटतो. ईश्वराच्या नामोच्चारानें आमच्या हृदयाला भावनेचा पूर यावा तो येत नाहीं. देव–धर्म–संत ह्यांच्याविषयीं नीटशी कल्पना नसलेल्या अडाणी जनतेला हि त्यांविषयीं जो भक्तिभाव वाटतो तो वास्तविक, त्यांच्यासंबंधीं यथार्थ ज्ञान असणाराला शतपट अधिक वाटला पाहिजे. पण आम्हांस ईश्वरासंबंधीं किंवा साधुसंतांसंबंधीं मुळीं च ज्ञान नसतें इतकें च काय पण भान हि नसतें. आणि असल्यास

विपरीत ज्ञान भरपूर असतें. त्यामुळें जनतेच्या हृदयांत आमचें हृदय मिसळूं शकत नाहीं. अस्पृश्यतेसारख्या ज्या विपरीत भावना धर्माच्या नांवाखालीं जनतेंत रूढ झाल्या आहेत त्या काढून टाकण्याचा त्याचा च प्रयत्न सफल होईल किंवा त्यानें च प्रयत्न हि करावा, ज्याच्या हृदयांत जनतेच्या हृदयातल्या पवित्र भावनांचा बोल उमटत असेल. जनतेंतल्या योग्य भावना ज्याच्यामध्यें नाहींत तो जनतेंतल्या अयोग्य भावना कश्या काढणार?

लोकांच्या योग्य भावनांशीं मिसळूं न शकणें हा जसा एक दोष, तसा च दुसरा लोकांच्या शारीरिक परिचयाची फाजील आकांक्षा बाळगण्याचा दोष, आमच्या कार्याला घातक होतो. कोणीकडून लोकांशीं खूप परिचय झाला पाहिजे ह्याबद्दल अट्टाहास करून भलभलत्या उद्योगांत निष्कारण डोकें घालण्यानें काम नासतें. अतिपरिचयाकांक्षेनें आम्हांला लोकांविषयीं आदर वाटेनासा होतो. लोकांच्या सूक्ष्म सूक्ष्म व्यवहारांत अनाहूत लक्ष घालण्यानें आम्ही त्यांची सेवा करूं शकत नाहीं. सेवकाला परिचयापेक्षां प्रेमादराची अधिक जरुरी आहे. लोकांशीं थोडा कमी परिचय असून त्याच्याविषयीं अधिक आदर राहिला तर तो सेवकाला इष्ट आहे.

पण 'लोकांशीं खूप परिचय झाला पाहिजे' हें म्हणणें चांगल्या चांगल्या सेवावृत्तीच्या लोकांकडून हि ऐकण्यांत येतें. पण त्याच्या मुळाशीं अहंकार लपलेला असतो. सेवकानें सेवा-वृत्तीची मर्यादा ओळखली पाहिजे. आम्ही काहीं असे मोठे परिस नाहीं लागून राहिलों कीं कोणाचा हि कश्या हि प्रकारें आमच्याशीं संबंध आला कीं आपलें त्याचें सोनें होऊन जावें! सेवेच्या निमित्तानें लोकांशीं जो परिचय होईल तो तेवढा अवश्य होवो, पण परिचयाचीं साधनें हुडकून काढण्याची सेवकाला कांहीं जरूर नाहीं. खऱ्या सेवकापाशीं सेवा आपोआप हजर होते, त्याला प्रसंग शोधीत बसावे लागत नाहींत. शरिरानें परिचय

वाढवावा आणि त्याबरोबर मनानें जनतेविषयीं अनादर वाढवीत जावा ह्यांत कांहीं च लाभ नाहीं.

ह्याशिवाय आमच्यांतील एक दोष म्हणजे त्यागाची जाणीव. आम्हीं थोडाबहुत त्याग केलेला असतो. पण त्यागाची जाणीव त्यागाला मारून टाकते. त्याग करण्यांत कांहीं आम्ही कोणावर उपकार करीत नाहीं. शिवाय आमचा त्याग शहरांत 'त्याग' मानला गेला, तरी खेडेगांवच्या हिशोबानें त्याची मोठीशी किंमत नसते. खेडेगांवांत फार च मोठया त्यागाची अपेक्षा असते. खुद्द खेडेगांवचे लोक, सक्तीच्या कां होईना, त्यागानें च राहत असतात. त्या मानानें आमचा त्याग मोठासा नसतो. आणि त्याची हि 'जाणीव'! त्यामुळें सेवा नीट होऊं शकत नाहीं.

हे दोष काढून टाकण्याचा प्रयत्न केल्यास आमचें खेडयांतलें काम निष्फळ होणार नाहीं.

---

# 'दास-नवमी'

माघ वद्य नवमीचा दिवस 'दास-नवमी' ह्या नांवानें महाराष्ट्रांत ओळखला जातो. त्या दिवशीं सज्जनगडावर दासांनीं देह ठेवला.

दास-नवमीचा उत्सव जुना आहे. त्याचें स्वरूप सांप्रदायिक होतें, पण राष्ट्रीय जागृतीच्या उदयापासून त्याला सार्वजनिक स्वरूप आलें आहे.

माघ वद्य नवमीच्या च दिवशीं सिंहगडावर वीर तानाजी मालुसरे ह्याचा देह पडला. त्यामुळें ह्या तिथीला 'वीर–नवमी' हें हि नांव शोभण्यासारखें आहे.

'दास' आणि 'वीर'. काय फरक आहे? रामदासांना मारुतीची मूर्ति बनविण्याचा नाद असे. ते दोन प्रकारचे मारुति बनवीत. एक 'दास'मारुति आणि दुसरा 'वीर' मारुति. रामाची चरणसेवा करीत असलेला तो 'दास'मारुति आणि लंकेंत पराक्रम गाजविणारा तो 'वीर'. एका मुलाला विचारलें, 'तुला दासमारुति आवडतो का वीर–मारुति?' तो म्हणाला 'दास–मारुती'. 'कां?' 'मारुति दास होता म्हणून च तो वीर बनला'. हें त्या मुलाचें उत्तर अक्षरशः खरें आहे. मारुतीचें खरें शौर्य हि त्यानें दास्यभक्तीच्या जोरावर रामाला जिंकलें ह्यांत च आहे. ज्यानें रामाला जिंकलें त्यानें रावणाला जिंकलें ह्यांत काय मोठें केलें? रावणाला जिंकणारा तो 'वीर' आणि रामाला जिंकणारा तो 'दास,' अशी व्याख्या केली तर 'दास' हा च खरा 'वीर' ठरेल ह्यांत काय शंका आहे? "हें चि शूरत्वाचें अंग। हारी आणिला श्रीरंग" असें तुकोबांनीं च म्हटलें आहे ना?

आणि तानाजीला आम्ही 'वीर' म्हणत असलों तरी तो आपल्याला देशाची अल्प सेवा करणारा तुच्छ सेवक च समजत होता. त्याला 'दास' म्हणवून घेण्यांत च भूषण वाटत असे. म्हणून 'वीर–नवमी' ह्या नवीन शब्दाची—तो किती हि समर्पक असला तरी—आपल्याला कांहीं जरूर नाहीं. 'दास'नवमींत च दास–नवमी हि आली आणि वीर–नवमी हि आली.

तानाजीला विशेष लिहितां वाचतां येत नव्हतें. 'विशेष' म्हणतों. नाहींतर उद्यां एखाद्या इतिहास–संशोधकाला राग यावयाचा, आणि तो तानाजीला सही करतां येत होती म्हणून सिद्ध करीत बसावयाचा!

पण कांहीं म्हटलें तरी तानाजी विद्वान नव्हता ह्यांत मुळीं च शंका नाहीं. त्याला मराठी भाषा हि कदाचित 'शुद्ध' बोलतां येत नसेल. पण त्याला आत्म्याची भाषा येत होती. त्या भाषेंत तो प्रवीण होता. आणि त्या च भाषेंत त्यानें आपला अद्भुत ग्रंथ सिंहगडावर लिहून ठेवला आहे.

समर्थांनीं दासबोध लिहिला. तानाजीनें त्याचें पटन केलें नव्हतें पण त्याच्या तो आचरणांत होता.

"देवाच्या सख्यत्वासाठीं । पडाव्या जिवलगांसीं तुटी ।
सर्व अर्पावें सेवटीं । प्राण तो हि वेंचावा ।।"

हें समर्थांच्या उपदेशाचें सार. तानाजीनें तें जसें आचरिलें तसें आचरणारे कोण आहेत? समर्थांनीं "आधीं केलें मग सांगितलें." तानाजीनें 'आधीं केलें' आणि 'मग'? मग हि 'केलें' च. करणाराच्या शब्दांत जोर असतो. आणि करणाराच्या मौनात तो नसतो काय? माझ्या देशा! तानाजीच्या मौनाचा अर्थ तुला समजतो काय?

तानाजीची स्वकार्य-निष्ठा अद्‌भुत होती. शिवाजीमहाराजांना त्यांच्या प्रत्येक कृत्यांत तानाजीनें साथ दिली. तानाजीचें चरित्र हें शिवाजीच्या चरित्रांतलें 'सुंदर-कांड' आहे. तानाजीशिवाय शिवाजीचें चरित्र 'अळणी' आहे. तानाजीसारखे कार्य-निष्ठ सेवक मिळाले म्हणून स्वराज्याची इमारत उठली.

परमार्थांत प्रयत्न-वाद आणि प्रपंचाविषयीं दैव-वाद स्वीकारावा अशी संतांनीं व्यवस्था लावली आहे. तानाजीनें ह्या व्यवस्थेप्रमाणें च आपला संसार देवावर सोंपविला होता. घरचें लगीन टाकून धर्मक्षेत्र सिंहगड गांठला. 'लगीन देव पाहून घेईल, मला माझें धर्म-कर्तव्य केलें पाहिजे' अशी भावना राखली. आज लगीन आटोपून उद्यां

किल्ल्याकडे जाऊं ही भाषा सहन झाली नाहीं. आजचा दिवस कर्तव्याचा आहे हें ज्यानें ओळखलें त्यानें जीवनाचें रहस्य ओळखलें.

तानाजीचें स्मरण सूर्याजीच्या स्मरणाशिवाय केव्हां हि अपुरें च राहणार. तानाजी पतन पावल्यावर बावरलेले लोक पाठीमागें पळत सुटले. ज्या दोराच्या मदतीनें ते वर चढले होते त्याच्या आशेनें ते मागें जाऊं पाहत होते. सूर्याजीनें तो दोर च कापून टाकला. "तो दोर मीं मघां च कापून टाकला आहे" ह्या मंत्रानें किल्ला सर केला. यशस्वितेचा हा महामंत्र सूर्याजीनें जगाला दिला. 'आशेचा दोर' कापून टाकल्याशिवाय पुढें पाऊल पडत नाहीं. म्हणून मागचें सर्व साफ करून च बाहेर पडलें पाहिजे. पाठीमागें 'लिगाड' ठेवतां कामा नये. गीतेंत हि भगवंतांनीं ही च गोष्ट सांगितली आहे.

अश्वत्थमेनं सु-विरूढ-मूलम् । असंग-शस्त्रेण दृढेन छित्वा ॥
ततः पदं तत् परिमार्गितव्यम्—

वैराग्याच्या शस्त्रानें आधीं आशेचा वृक्ष समूळ छाटून टाकून मग पुढल्या पदाचा शोध घ्यावा.

तानाजी पडला तेव्हां शत्रूला क्षणभर आपला जय झाल्याचें भासलें. पण चेंडू जमिनीवर पडला तरी तो पुन्हां वर उसळी मारण्यासाठीं पडतो. त्याप्रमाणें मृत्यूनंतर हि तानाजीनें पुनः उसळी मारली. तिला स्थूल दृष्टीचे इतिहासकार सूर्याजीची स्फूर्ति म्हणतात. पण त्या वेळचा तो सूर्याजी म्हणजे तानाजीचा च अवतार होता. "गड आला पण सिंह गेला" ह्या शिवाजीराजांच्या स्मारक वचनांत हा च भाव होता.

तानाजीसारख्याचें पवित्र चरित्र किती हि गाइलें तरी थोडें च. आणि थोडें हि आचरलें तरी पुष्कळ.

पाइकावांचून नव्हे कधीं सुख ।
प्रजांमध्यें दुःख न सरे पीडा ।।
तरी व्हावें पाईक जीवाचे उदार ।
सकळ त्यांचा भार स्वामी वाहे ।।

—तुकाराम

# प्रासंगिक

## १. राष्ट्रीय छात्रालय

राष्ट्रीय विद्यालयांत अंत्यजांना स्थान असलें च पाहिजे. ज्या विद्यालयांत अंत्यजांना प्रवेश नाहीं त्याला 'राष्ट्रीय' विद्यालय म्हणतां येणार नाहीं हें उघड आहे. पण राष्ट्रीय छात्रालयाला हा च नियम लागू आहे किंवा कसें, ह्याविषयीं पुष्कळांना शंका आहे. वास्तविक, ही शंका अस्थानीं आहे. विद्यार्थ्यांच्या जीवनाशीं विद्यालयापेक्षां छात्रालयाचा च अधिक संबंध असतो. विद्यार्थ्यांचें चारित्र्य छात्रालयांत घडतें. तेथें अस्पृश्यता-निवारणाची विशेष अवश्यकता आहे. अंत्यजांच्या संसर्गानें इतर मुलें बिघडतील ही धास्ती वृथा आहे. गुणांचा किंवा दोषांचा मक्ता कोणत्या हि जातीला नाहीं. अंत्यजांचीं मुलें म्हणजे जणूं दोषांचीं आगरें आणि इतर मुलें सारीं निर्दोष, ही भावना चुकीची आहे. ही भावना काढून टाकणें हा च अस्पृश्यता-निवारणाचा अर्थ आहे. अंत्यजांच्या संसर्गानें ब्राह्मणांचीं मुलें अस्वच्छ बनतील हा जसा एक संभव, तसा ब्राह्मणांच्या संसर्गानें अंत्यज दांभिक बनतील हा हि दुसरा संभव असूं शकेल. "बरा देवा कुणबी केलों। नाहींतर दंभें

असतों मेलों" असें तुकारामानें नाहीं का म्हटलें ? पण त्या दुसऱ्या संभवाचें कारण देऊन अंत्यजांचीं व ब्राह्मणांचीं मुलें एकत्र नसावींत असा युक्तिवाद आम्ही करीत नाहीं. ह्यांत विष आहे. कोणत्या हि दोन व्यक्ति एकत्र नांदूं लागल्या म्हणजे एकमेकांचे गुणदोष एकमेकांना लागावयाचे च. अश्या स्थितींत एकमेकांचे दोष एकमेकांना लागूं नयेत आणि गुण तेवढे लागावे अशी काळजी घेणें हें शिक्षणशास्त्राचें काम आहे. तें काम टाळून दोन मुलें एकत्र येऊं नयेत अशी खबरदारी राखावयाची तर त्यासाठीं छात्रालयाची जरुरी नाहीं. कोणतीं हि दोन मुलें एकत्र राखण्यांत जो कांहीं धोका असेल त्याहून अधिक धोका अंत्यज व इतर मुलें एकत्र राखण्यांत आहे असें मानण्याचें कारण नाहीं. लहान मुलें म्हटलीं म्हणजे सर्व सारखीं च असतात. लहानपणीं आपण ईश्वराजवळ असतों. त्यामुळें जशी सत्पुरुषांची तशी च मुलांची एक स्वतंत्र जात असते. त्यांना भेदांचीं शिंगें फुटलेलीं नसतात. हीं शिंगें पुढें मोठेपणीं फुटावयाचीं असतात. तीं फुटूं न देणें हें च शिक्षणाचें ध्येय. म्हणून शिक्षणाच्या प्रांतांत नसत्या भेदभावांना जागा देणें म्हणजे शिक्षणाच्या मुळावर घाव घालण्यासारखें आहे.

---

## २. सव्य-साची

शरीर, इंद्रियें आणि बुद्धि ह्या सर्वांकडून ज्यास्तींत ज्यास्त काम कसें घेतां येईल इकडे कर्मयोगी पुरुषाचें लक्ष असलें पाहिजे. त्या दृष्टीनें पाहतां 'उजव्या हाताकडून आपण जसें काम घेऊं शकतों तसें डाव्या हाताकडून हि घेतां आलें पाहिजे' ही गांधीजींची सूचना विचार करण्यासारखी आहे. डाव्याउजव्या हातांतला फरक जणूं ईश्वरानें च

करून ठेवला आहे असें आपणांस भासतें. त्यामुळें त्याविषयीं आपण विचार करीत नाहीं. परंतु कर्मयोगाचा सतत अभ्यास करणाऱ्या मनुष्याला ही विषमता जाणवल्याशिवाय राहत नाहीं. जेलमध्यें खडी फोडतांना डाव्या हातानें हि खडी फोडतां आली असती तर चांगलें झालें असतें असें मनांत येऊन जातें. पण त्या दिशेनें आपण प्रयत्न करीत नाहीं. दळतांना उजव्या हाताप्रमाणें च डाव्या हातानें वैरण घालून वेगानें दळतां आलें पाहिजे. त्याशिवाय चांगलें दळतां आलें असें समजूं नये. डाव्या हाताला योग्य शिक्षण मिळाल्यास थोड्या वेळांत अधिक काम होईल. सरकी काढण्याच्या आश्रमांतील रेच्याला दोन्ही बाजूंस हत्ता आहे; त्यामुळें आलटून पालटून दोन्ही हातांकडून काम घेतां येतें व तितक्या च वेळांत जवळ जवळ दीडपट काम होतें असा अनुभव आहे. शरिराचा संपूर्ण विकास होण्याला हि ह्या गोष्टीची जरूर आहे. दोन्ही अंगांना सारखा व्यायाम मिळाल्यास शरिराची सुंदर वाढ होईल. मलखांबावर उजव्या बाजूनें उडी घेतली कीं डाव्या बाजूनें घेतली च पाहिजे. एका व्यायामशास्त्रज्ञाविषयीं असें सांगतात कीं एकदा मलखांब करीत असतांना पाय निसटून तो उजव्या बाजूवर पडला. तेव्हां वैषम्य-दोष टाळण्यासाठीं तो मुद्दाम दुसऱ्या बाजूनें तसा च पडला. हा अतिरेक समजावयाचा. पण त्यांत मुद्दा आहे. महाभारतांतील आदर्श कर्मयोगी म्हणजे अर्जुन. दोन्ही हातांनीं शस्त्र चालविण्याचें त्यानें साध्य करून घेतलें होतें. म्हणून त्याला महाभारतकारांनीं 'सव्य-साची' ही पदवी दिली आहे. त्यावरून अर्जुन हा त्या काळचा एक अपवाद होता हें तर उघड च आहे. पण म्हणून तें उदाहरण सोडून देण्याची जरूर नाहीं. त्याचें शक्य तितकें अनुकरण करणें हिताचें आहे. शिक्षणशास्त्रानें इकडे लक्ष द्यावें.

---

*

## ३. भाषेची शुद्धि

मराठीभाषेंत पुष्कळ उर्दू शब्द दाखल झाले आहेत. ते सर्व शब्द काढून टाकून मराठी भाषेची शुद्धि करावी असा एक विचार निघाला आहे. भाषाशुद्धीचा असला प्रयत्न पूर्वीं शिवाजीमहाराजांच्या वेळीं झाला होता आणि ती च परंपरा आज आम्हीं पुढें चालवावी असें ह्या विचारकांचें म्हणणें आहे. शिवाजीमहाराजांचे वेळीं असला घातुक प्रयत्न झाला होता हें म्हणणें इतिहासाला धरून नाहीं. शिवाजी महाराजांना गुरुस्थानीं असलेल्या रामदासांच्या ग्रंथांत भरपूर मुसलमानी शब्द वापरलेले आहेत. फार उदाहरणें देण्याची जरूर नाहीं. "राजी राखावें सकळाला। कठिण आहे" ह्यांतला 'राजी' शब्द, "एकांतीं नाजुक कारभार" ह्यांतला 'नाजुक' शब्द, हीं उदाहरणें पुरेत. अश्या सर्व शब्दांची तपासणी केल्यास मुसलमानी शब्द टाळण्याच्या ऐवजीं बेमालूमपणें वापरण्याचा प्रयत्न दिसून येईल. "शिवतां होतसे ओवळें" असलें रामदासांचें सोवळें नव्हतें. परकीय शब्द भाषेंत दाखल झाल्यानें भाषा बिघडते म्हणणें ठीक आहे. पण त्यांत विवेक पाहिला पाहिजे. 'मला स्टेशनवर जावयाचें आहे' ह्यांतला 'स्टेशन' शब्द भाषा बिघडवीत नाहीं. पण 'हे आमचे फाधर आहेत' ह्यांतला 'फाधर' शब्द भाषा बिघडवितो. 'फाधर' शब्द वापरण्यांत 'बापाची' लाज आहे. म्हणून त्यानें मराठी भाषा बिघडते. असले शब्द जे आम्हा सुशिक्षितांच्या गुलाम मनोवृत्तीमुळें भाषेंत येऊं पाहत आहेत ते भाषेंतून अवश्य काढून टाकले पाहिजेत. भाषेचा स्वभाव स्वीकारून तिच्याशीं अगदीं मिसळून गेलेले किंवा जाण्यासारखे शब्द काढून टाकण्यांत काय मुद्दा? मत्स्येंद्रनाथानीं गोरखनाथाला सांगितलें,

'बच्चाको धो डालो' तर त्यानें बच्चाला धोतरासारखें आपटून धोपटून धुऊन काढलें आणि दोरावर वाळत देखील घातलें! तश्या-सारखें च हें नाहीं का?

---

## ४. चरख्याचा अभ्यास

सूत कांतण्याच्या धंद्याचें राष्ट्रीय महत्त्व ओळखून त्याचा अभ्यास राष्ट्रीय शाळांत झाला पाहिजे ही गोष्ट पुष्कळांना पटली आहे. आणि त्याप्रमाणें कित्येक शाळातून सूत कांतण्याचा अभ्यास हि केला जातो. पण त्या अभ्यासाचें धोरण पद्धतशीर ठरवलें पाहिजे. ठरलेल्या वेळात कसेंबसें सूत कांतणें बस नाहीं. कर्म यथासांग झालें तर च त्याचा उपयोग होतो. नाहींतर त्याचें फळ गांठीं पडत नाहीं. असा कर्माचा विचित्र स्वभाव आहे. शाळेंत चरख्याचा शिक्षणदृष्ट्या अभ्यास झाला पाहिजे. त्या अभ्यासाचे मुख्य मुद्दे येथें नमूदतों.

( १ ) धंद्याचा अभ्यास—म्हणजे सरकी काढणें, पिंजणें, पेळू करणें, कांतणें ह्या सर्व बाबतींत ज्यास्तींत ज्यास्त गतीनें चांगलें काम करतां येणें. ( सरकी काढणें, पिंजणें, पेळू करणें, सूत कातणें ह्या चारी वस्तूंचा समावेश कांतण्यांत केला पाहिजे. )

( २ ) कलेचा अभ्यास—ज्यास्तींत ज्यास्त बारीक सूत कातणें, नुसत्या हातांनीं सूत कांतणें, साध्या चातीवर सूत कांतणें, सर्व तंतु समांतर होतील अश्या प्रकारें पिंजणें, पेळू न करतां कांतणें वगैरे.

(३) उपांगांचा अभ्यास—रेचा, पिंजण, चरखा, चात ह्यांची दुरुस्ती करण्याइतकें सुतारी, लोहारी वगैरेचें ज्ञान असणें.

(४) यंत्रशास्त्राचा अभ्यास—रेचा, पिंजण आणि चरखा ह्यांतील मुद्दे समजण्याइतकें यंत्र-शास्त्राचें ज्ञान. घर्षण म्हणजे काय, तें कसें टाळावें, चक्राचा चातीशीं संबंध, चात कोणत्या कारणांमुळें कांपते इत्यादि.

(५) चरख्याच्या अर्थशास्त्राचा अभ्यास—ग्रामरचना, संपत्तीची विभागणी, बेकारीचा सवाल, परदेशी कापडावर बहिष्कार, कापसाच्या जगांतलें हिंदुस्थानचें कार्य, स्वावलंबन, स्वराज्य इत्यादि अनेक दृष्टींनीं कांतण्याचा उपयोग तपासणें.

(६) कांतण्याच्या इतिहासाचा अभ्यास—कांतण्याच्या कलेचा उगम आणि विकास कसा झाला, हिंदुस्थानांतून ही कला कशी लुप्तप्राय झाली इत्यादि.

(७) धर्मदृष्ट्या अभ्यास—हिंदु, बौद्ध, मुसलमान, खिस्ती वगैरे धर्मांची कांतण्याविषयींची वृत्ति, स्वदेशीधर्म, अविरोधाचें जीवन, साधेपणा, गरिबांविषयीं कळकळ, परिश्रमाची मान्यता, अस्पृश्यता-निवारण, स्त्रियांचें शील इत्यादि.

हे कांहीं मुद्दे मांडले आहेत. ह्या सर्व मुद्द्यांचा नीट अभ्यास झाला पाहिजे. कांतण्याचा एका बाजूनें शेतीशीं व दुसऱ्या बाजूनें विणकामाशीं संबंध आहे. त्यामुळें शेतीच्या ( कापसापुरत्या ) आणि विणकामाच्या सामान्य माहितीची कांतण्याच्या ज्ञानाला पुस्ती जोडली पाहिजे.

## ५. अस्पृश्यता-निवारणाचा यज्ञ

अस्पृश्यता-निवारणाविषयीं प्रश्न निघाला म्हणजे कित्येक म्हणतात—"अहो, ह्या गोष्टी व्हावयाच्या च आहेत. काळाचा ओघ च तसा आहे. त्यासाठीं इतका आग्रह राखण्याची काय जरूर आहे?" काळाचा ओघ अनुकूल असला म्हणजे प्रयत्नाची जरूर च नाहीं. आणि काळाचा ओघ प्रतिकूल असला तर प्रयत्नाचा काहीं उपयोग नाहीं मिळून दोन्ही बाजूंनीं 'प्रयत्न नको' हा भावार्थ. प्रपंच प्रयत्न-पूर्वक केला पाहिजे आणि धर्म मात्र दैवावर सोडला तरी चालेल ह्याचा अर्थ काय? ही धर्माची फसवणूक नव्हे काय? पण धर्म कधीं फसूं शकत नाहीं. धर्माला फसविण्याच्या प्रयत्नांत मनुष्य आपल्या आत्म्याला च फसवीत असतो. धर्माच्या बाबतींत 'कमींत कमी काय केलें पाहिजे हो?' ही कृपण-वृत्ति जशी अयोग्य, त्याप्रमाणें 'होत च आहे,' 'होणार च आहे,' हा दैववाद हि अयोग्य. होणार च आहे म्हणजे काय?' केल्याशिवाय होणार आहे? मुलाचें लग्न केल्याशिवाय होत नाहीं आणि अस्पृश्यता-निवारण केल्याशिवाय कसें होईल? आणि 'काळाचा ओघ' म्हणजे तरी काय? समाजाच्या सामुदायिक कर्तृत्वाला च 'काळाचा ओघ' म्हणतात. त्यामधून माझें कर्तृत्व जर मीं काढून घेतलें तर तें सामुदायिक कर्तृत्व तितक्या अंशानें दुबळें पडेल. आणि हा च न्याय सर्वांनीं स्वीकारला तर तें अजीबात उडून हि जाईल. पण काळाचा ओघ अस्पृश्यता-निवारणाला अनुकूल आहे' ह्याचा अर्थ 'अंत्यज आतां जागे झाले आहेत, ते आपल्याकडून करवून घेणार च आहेत, मग आपण कश्याला करा?' असा असेल तर ठीक च आहे. तसें हि होईल. पण त्यानें आत्मशुद्धीचें पुण्य लाधणार नाहीं. ज्ञानदेवांनी

म्हटल्याप्रमाणें दूध उतास गेल्यानें होमाचें श्रेय मिळत नाहीं. अग्नीनें आहुति घेणें आणि अग्नीला आहुति देणें ह्यांत अंतर आहे. पहिल्या क्रियेला आग लागणें म्हणतात, दुसरीला यज्ञ करणें म्हणतात. आम्हीं आत्मशुद्धीच्या यज्ञ-कुंडांत अस्पृश्यतेची आहुति न दिल्यास सामाजिक बंडाची आग लागून अस्पृश्यता जळून जाणार ही वस्तु निश्चित आहे. परमेश्वर आम्हांस सद्बुद्धि देवो.

---

## ६. मनुष्य यंत्र नव्हे

पुष्कळ वेळां सतत काम करण्याचा प्रश्न निघाला म्हणजे बहुधा उद्गार ऐकूं येतो, 'मनुष्य कांहीं यंत्र नाहीं.' हें वाक्य म्हणजे तो एक आळसाचा महामंत्र च होऊन बसला आहे. 'मनुष्य यंत्र नाहीं' हें म्हणणें ठीक आहे. पण त्याचा अर्थ काय? मनुष्य यंत्रापेक्षां कमी आहे असा अर्थ? यंत्रापेक्षां मनुष्य कमी कसा असेल? यंत्र जड. मनुष्य चैतन्ययुक्त. चैतन्यवान मनुष्य जडापेक्षां कमी कसा असेल? यंत्र बिचारें, वेळेवर तेल न मिळालें कीं आवाज करूं लागलें च. इंजनांत कोळसे कमी झाले कीं इंजन बंद पडलें च. मनुष्याचें तसें नाहीं. मनुष्याला हि तेल लागतें, कोळसा लागतो. पण 'कोळसा' मिळाला नाहीं तरी पुष्कळ वेळ मनुष्य टिकाव धरूं शकतो. एकवीस दिवसांच्या उपवासांत हि महात्माजी शेवटपर्यंत कांतीत होते च कीं नाहीं! 'मनुष्य यंत्र नाहीं.' पण त्याचा अर्थ तो यंत्राहून ज्यादा आहे. तो यंत्री आहे. तो यंत्राप्रमाणें सतत काम करूं शकतो इतकें च काय, पण जिथें यंत्र बंद पडतें तिथें हि तो कांहीं वेळ काम चालवूं शकतो.

मात्र, त्याची स्वतःची इच्छा पाहिजे. दुसऱ्यानें लादून होणार नाहीं. आणि दुसऱ्याला लादण्याचा अधिकार हि नाहीं.

---

## ७. अगस्त्यऋषि

हिवाळ्यांत पहाटेच्या वेळेला दक्षिणेकडे अगस्त्याचा तारा नजरेस येतो. मोठा ठळक तारा आहे. सारखा चमकत असतो. ग्रह सोडून तारे म्हणून जेवढे, तेवढे सारे च चमकतात. पण अगस्त्याची चमक विशेष आहे. हा नेहमीं च दक्षिणेकडे राहणारा आहे. अगस्त्य वैदिक ऋषि होते. ऋग्वेदाच्या पहिल्या मंडळांत ह्याचीं पुष्कळ सूक्तें आहेत. हे मोठे तपस्वी होते. ह्यांची पत्नी लोपामुद्रा. ही पतीला त्यांच्या कार्यांत नेहमीं मदत करणारी होती. तिनें आपली स्वतःची म्हणून 'मुद्रा' शिल्लक च ठेवली नव्हती. इतकी ती पतिरूप होऊन पतीच्या मुद्रेंत 'लोपून' गेली होती. पतीबरोबर ती हि तपश्चर्या करी. एकदा तिनें पतीस विचारलें, "आपण इतकी तपश्चर्या करतों पण त्याचें फळ काय?" अगस्त्यांनीं उत्तर दिलें, "आपले कष्ट कांहीं फुकट गेले नाहींत. कारण देव रक्षण करीत आहेत." हे नेहमीं कुदळीनें खणण्याचें काम करीत, असें वेदांत वर्णन आहे. हे मूळ उत्तरे-कडचे. पण ह्यांनीं कुदळीच्या जोरावर दक्षिणेकडे वसाहत केली. ऐतिहासिक माहितींतला पहिला वसाहतवाला अगस्त्य. ह्यांनीं पहिल्या प्रथम विंध्य पर्वतांतून वाट फोडून काढली. म्हणून च ह्यांना 'अग-स्त्य' म्हणजे डोंगर फोडून काढणारा असें नांव पडलें. सर्व पर्वतांत हिमालय मोठा आहे. तरी वयानें तो लहान च आहे असें शास्त्रज्ञांचें मत आहे.

ह्या 'कालचा पोर' म्हाताऱ्या विंध्यपर्वताशीं स्पर्धा करूं लागला. तेव्हां विंध्याला तें सहन झालें नाहीं. म्हणून तो हि उंच वाढूं लागला. दोहोंच्या स्पर्धेत बिचाऱ्या हिंदुस्थानची हवा गुदमरूं लागली. इतक्यांत अगस्त्यऋषि कुदळीनें खणत खणत विंध्याजवळ येऊन पोहोंचले. महान ऋषि जवळ आलेले पाहून विंध्यानें त्यांना साष्टांग नमस्कार घातला. ऋषींना वाटलें, ह्याला नम्रतेचा पाठ द्यावा. म्हणून त्यांनीं त्याला उठण्याविषयीं अनुज्ञा दिली नाहीं आणि ते तसे च दक्षिणेकडे निघून गेले. त्यामुळें त्या पर्वताची उंची कायमची कमी झाली. अशी ह्यांच्या कर्तृत्वाविषयीं आख्यायिका आहे. "ह्या उग्र ऋषींनीं दोन्ही वर्णांचें पोषण केलें." असें त्यांच्या जीवनाचें रहस्य वेदांत सांगितलें आहे. हे दोन वर्ण कोण? समाजांत कांहीं शरीरकष्ट करणारे आणि कांहीं बुद्धिप्रधान कामें करणारे असे दोन प्रकारचे लोक असतात. ते च हे दोन वर्ण. अगस्य हे एक मंत्रद्रष्टे ऋषि असून कुदळीवर उपजीविका करणारे मजूर हि होते. अश्या रीतीनें दोन्ही वर्णांचा मिलाफ त्यांच्या ठिकाणीं झाला होता. आजचा ब्राह्मण–ब्राह्मणेतर प्रश्न सोडविण्याला अगस्त्यऋषींचें उदाहरण उपयोगी आहे. सर्वांनीं मजुरीचा मंत्र स्वीकारला पाहिजे. अगस्त्यांची कुदळ ही मजुरीची मूर्ति आहे. ह्या देवतेची सर्वांनीं उपासना केली पाहिजे. हें तत्त्व नेहमीं डोळ्यांपुढें रहावें म्हणून अगस्त्यऋषींना तारकांमध्यें स्थान दिलेलें आहे. ह्या दक्षिणेच्या ताऱ्याचा संदेश आम्हीं अवश्य ग्रहण केला पाहिजे.

---

## ८. पुतळा कां नाहीं !

शिकंदरबादशहाच्या राजधानींत एक सुंदर बगीचा होता. त्यांत प्राचीन आणि विद्यमान पराक्रमी पुरुषांचे पुतळे उभारलेले होते. एकदा शिकंदराची राजधानी पाहण्यासाठीं कोणी परदेशस्थ बडा मुसाफर आला होता. तो शिकंदराचा पाहुणा म्हणून शिकंदरच्या पाहुण–घरांत उतरला होता. शिकंदर त्याला तो ऐतिहासिक बगीचा दाखविण्यासाठीं आपल्याबरोबर घेऊन गेला. शिकंदरनें पुतळा दाखवावा, पाहुण्यांनीं "हा कोणाचा पुतळा ?" म्हणून विचारावें, "हा अमक्या अमक्या 'सुप्रसिद्ध' पुरुषाचा पुतळा" म्हणून शिकंदरनें माहिती द्यावी, असा क्रम चालला होता. शेंवटीं सर्व पुतळे पाहून झाल्यावर पाहुण्यानें विचारलें—"महाराज, आपला पुतळा कोठें दिसत नाहीं ?" शिकंदर म्हणतो—"माझा पुतळा उभारला जावा आणि पुढच्या पिढ्यांनीं 'हा कोणाचा पुतळा ?' म्हणून सवाल करावा त्यापेक्षां तो उभारला जाऊं नये आणि 'शिकंदरचा पुतळा कां नाहीं !' म्हणून लोकांनीं विचारावें हें मला अधिक बरें वाटतें."

---

## ९. माणसाचा धर्म

परवां एका जैन मुलाला प्रश्न विचारला, 'तूं कोण रे – जैन कीं माणूस ?' प्रश्न ऐकून मुलाला गंमत वाटली. पण जरा सुद्धां विचार न करतां त्यानें सरळ उत्तर दिलें—'माणूस.' एक लहान मुलगा सुद्धां ही गोष्ट समजूं शकतो कीं मी आधीं माणूस आहे आणि

मागून सर्व कांहीं आहे. पण मोठीं माणसें ही साधी गोष्ट समजूं शकत नाहींत. मनुष्याचा परम धर्म कोणता ह्याची चर्चा करकरून नीति-शास्त्रानें उत्तर दिलें—'माणुसकी.' तो मुलगा तरी काय म्हणाला? हें च. माणुसकीचा मुख्य धर्म सांभाळून आपण जगांत वागलें पाहिजे. हिंदु, मुसलमान, ब्राह्मण, ब्राह्मणेतर सर्वांनीं ही गोष्ट लक्षांत ठेवली पाहिजे कीं आपण 'माणसें' आहों. माणुसकी सोडून आपण हिंदु किंवा मुसलमान, ब्राह्मण किंवा ब्राह्मणेतर राहूं शकत नाहीं. हिंदु सुद्धां एक माणूस असतो. जो माणूस नाहीं तो हिंदु कसा असेल? तसा च मुसलमान आणि तसे च इतर. लढण्याची जरूर पडली तर लढा, झगडा. त्याला कोणी हरकत घेऊं शकत नाहीं. पण माणुसकी सोडूं नका. तो मुलगा कदाचित विचारील, 'का हो, माणुसकींत लढणें येतें का?' त्याला आपण उत्तर काय देणार म्हणा, पण माणुसकींत लढणें न आलें तर निदान लढण्यांत तरी माणुसकी राखावी!

---

# वाचकांस विज्ञापना

संतांच्या बरोबर सात पावलें चालण्यानें हि मैत्री जडते असें वृद्धांचें वचन आहे. मग 'महाराष्ट्र-धर्मा'च्या निमित्तानें ज्या सज्जनांशीं आज इतकीं वर्षें परिचय घडला त्यांच्या मैत्रीची अपेक्षा करण्यास कोणती हरकत ?

जर हरकत नाहीं, तर त्यांच्या पाशीं इतकें च मागावयाचें कीं त्यांनीं ह्यापुढें व्यक्तिगत स्नेहसंबंध राखून योग्य ती सेवा घ्यावी.

नमावे पाय हें माझें उचित ।
आशीर्वादें हित तुमचिया ॥

# सूचि

विषय, विशेषनामें, वचनें आणि दृष्टान्तादिक ह्यांची ही साधारण सूचि आहे. वचनें मूळ ग्रंथ वा पुरुष ह्यांच्या नांवाखालीं दिलीं आहेत. दृ=दृष्टान्तादिक. अंक पृष्ठ दर्शवितात.